# अन्नदाता उपाशी !

जमीनदारी पिळणुकीनें गांजलेल्या
कोंकणांतील शेतकरी वर्गात होऊं
घातलेल्या शेतकरी क्रांतीचें
रणशिंग ऐकवणारी कादंबरी

विठ्ठल वामन हडप




पुणें २ : कोल्हापूर

आदर्श वाङ्मय प्रकाशन

संपादक : विठ्ठल वामन हडप





प्रथमावृत्ति

ऑगस्ट १९४७



दोन रुपये आठ आणे



प्रकाशक :
यशवंत विठ्ठल हडप,
आदर्श वाङ्मय प्रकाशन,
३९५।५ सदाशिव, पुणें २

मुद्रक :
कृ. ह. सहस्रबुद्धे,
श्री ज्ञानेश्वर प्रेस,
कोल्हापूर.

# ओळख

या कादंबरींतील खडतर शेतकरी जीवनाची करुण कहाणी वास्तवतापूर्ण आहे. यांत वर्णिलेल्या काजरोळी गांवच्या संगमनाथ इनाम देवस्थानचा व तेथील गांवकुठारी घडामोडींचा स्थूल सांगाडा मला रत्नागिरी जिल्ह्यांतील देवगड तालुक्यांतील कोटकामतें या माझ्या जन्मगांवीं तीन तपांपूर्वी तशाच स्वरूपाच्या घडलेल्या रोमांचकारी घडामोडींत सांपडला. त्या गांवीं माझ्या लहानपणीं मी मराठी शाळेंत असतांना अण्णा ठाकूर या नांवाच्या उपद्व्यापी जमीनदाराचा गांवच्या शेतकरी कुळांकडून खून झालेला मला अजूनही चांगला आठवतो. कादंबरींत वर्णन केल्याप्रमाणें जमीनमोजणीबाबतच्या भानगडी, जमीनदारांनीं तयार केलेल्या बनावट कबुलायती, त्यांची सरकारदरबारीं चलाखीनें झालेली शाबिती, त्या कबुलायतींच्या जोरावर जमीनदारांनीं आपल्या शेतकरी कुळांचा आरंभिलेला अमानुष छळ, व त्या छळाचें एका जमीनदाराच्या खुनांत झालेलें भीषण पर्यवसान ही सारी सत्यकथा आहे.

जगण्यापेक्षां मरणें बरें इतक्या खडतर जीवनाला विटून शेतकऱ्यांनीं जिवावर उदार होऊन त्या दुःखाला कारण होणाऱ्या आपल्या धनी जमीनदाराचा खून केल्याचीं आणखीही उदाहरणें त्या सुमाराला रत्नागिरी जिल्ह्यांत त्या टापूंत घडलेलीं माझ्या स्मरणांत आजही अगदीं ताजीं आहेत. त्यांचा कार्यकारणभाव मी माझ्या शब्दांत देण्यापेक्षां आज 'सरकार' असलेल्या कॉंग्रेसच्या अधिकृत शब्दांत दिलेला अधिक चांगला :

"...दख्खनमध्यें चालू असलेली पद्धति रयतवारी पद्धति या नांवानें प्रसिद्ध आहे... तथापि वस्तुस्थिति अशी आहे कीं, शेतकऱ्यांपैकीं शेंकडा ऐशीं टक्के शेतकरी शेतजमिनीवांचूनच आहेत. त्यांना जमीन कसावयाची झाली तर खंडानें जमीन घ्यावी तेव्हां ते जमीन कसणार... जमाखर्चाची तोंडमिळवणी करण्यासाठीं शेतकरी कर्ज काढतो, व मुद्दल व व्याज फेडतां येईनासें झालें कीं जमीन गहाण टाकतो... शेतकऱ्याचा कर्जबाजारीपणा इतका वाढला आहे कीं त्याच्याकडे जमिनीची मालकी फक्त नांवाला उरली आहे...भांडवलशाही समाजव्यवस्थेची रचनाच मुळीं अशी करंटी आहे कीं, जीवनासाठीं कलह करावा तर जीवन अधिकाधिकच निकृष्ट

होत जातें. त्याचा प्रत्यय खंडाचा प्रश्न तपासूं लागलें कीं येत जातो. जमिनीवरून शेतकरीवर्ग उठत जाईल तसतशी खंडानें जमिनी करणारांची गर्दी जमीनदारांचे दाराशीं होऊं लागते. मालकांचा भाव चढतो. खंडाची पद्धति सध्यां जुलमी झाली आहे. महाराष्ट्रांत अर्धेलीची बटई पद्धति सर्व-साधारण आहे. स्वतःपाशीं ज़मीन नाहीं ती दुसऱ्यापासून कसावटीसाठीं घेतलेली असते. ती संधी मालकांनीं दिली ह्याचा मोबदला म्हणून शेत-करी एकंदर पिकापैकीं अर्धा वाटा मालकाला देतो. लागवडीचा खर्च तो सोसतो आणि मालक चावडी भागवतो. मंदीच्या काळांत ह्या पद्धतींतील अन्याय्यता चट्कन् डोळ्यांत भरते. एकंदर उत्पन्नाच्या किंमतीचा निम्मा हिस्सा उत्पादेनाच्या खर्चांतच जिरून खंडाच्या स्वरूपांत राहिलेलें अर्धें उत्पन्न तो जमीनदाराला खंड म्हणून घालतो... भांडवलशाही समाजाची रचनाच अशी विपरीत आहे कीं ऐतखाव् मालकवर्गाला जितकें मिळतें त्याच्या दशांशही निढळाचा घाम गाळणाऱ्या शेकऱ्याच्या पदरीं पडत नाहीं... रयतवारी भागांतील खंडाचा प्रश्न सोडविण्यासाठीं खंडाबाबत कांहींतरी उपाय कायद्यानें योजणें अतिशय जरूरीचें आहे. वार्षिक कबुलायतीच्या पद्धतीमुळें खेडोपाड्यांत जमीनदारांकडून खंडाची मागणी वाटेल तशी वाढविण्यांत येत असते, व त्यामुळें महाराष्ट्रांतील कित्येक भागांत जमीनदार व कुळें यांच्यांत झगडे उत्पन्न झाले आहेत... हे लढे म्हणजे शेतकऱ्यांमध्यें धुमसत असलेल्या सार्वत्रिक असंतोषाचीं चिन्हें होत."

[ महाराष्ट्र प्रांतिक कॉंग्रेस कमिटीनें नेमिलेल्या शेतकी कमिटीचा अहवाल; ता. २२ मे १९३६.]

कोंकणांत जमीनदारांविरुद्ध शेतकऱ्यांमध्यें धुमसत असलेल्या सार्वत्रिक असंतोषाचीं चिन्हेंच प्रस्तुत कादंबरींत कथारूपानें उजेडांत आणण्यांत आलीं आहेत. मुंबईच्या विद्यमान 'कॉंग्रेस' सरकारनें नुक्ताच कूळकायदा मुंबई इलाख्यांत जारी केला आहे. शेतकरी–कामगार जनतेच्या कल्याणासाठीं जमीनदार–भांडवलदारांना शेतकरी–कामगारांचें 'विश्वस्त' (Trustees मान्य करणाऱ्या 'रामराज्य'वाल्या आपल्या कॉंग्रेस सरकारकडून जारी कर-ण्यांत आलेला हा कूळ कायदा म्हणजे रुक्मिणी व सत्यभामा यांच्या आंगणांतील पारिजातक वृक्ष होय. श्रीकृष्णानें तो वृक्ष लावला आपल्या कमी आवडत्या

सत्यभामेच्या अंगणांत; पण तो अशा युक्तीनें कीं त्या वृक्षाचा सारा विस्तार रुक्मिणीच्या अंगणांत वाढावा. शेतकरी–कामगार राज्य आमची कॉंग्रेस ज्या कायद्यांनीं स्थापन करणार आहे, त्यांतल्या कूळकायद्याचें स्वरूप असें आहे.

पण सुदैवानें—किंवा पिळणूक करणारे जमीनदार–भांडवलदार आणि पिळले जाणारे शेतकरी–कामगार यांचे खरोखर पूर्णतः परस्परविरुद्ध व विसंवादी असलेले हितसंबंध एक मानण्यासाठीं ओढून ताणून चंद्रबळ आणूं पाहणाऱ्या समन्वयवादी सत्य–अहिंसावाल्यांच्या दुर्दैवानें—महाराष्ट्रांतील शेतकरी जनता आतां पुराणकालीन सत्यभामेइतकी भोळी राहिलेली नाहीं. हें कटु सत्य आजच आमच्या भोगवट्याला येऊं लागलें आहे, व तें उद्यां अधिक येऊं घातलें आहे अशीं स्पष्ट चिन्हें दिसत आहेत. शेतकरी–जमीनदार लढ्याचा हा उत्तरार्ध ‘ अन्नदाता उपाशी ’मधील पूर्वार्धाप्रमाणेंच एका स्वतंत्र आगामी कादंबरीचा विषय शोभणारा असल्यानें त्याविषयीं तूर्त इतकेंच पुरे.

प्रस्तुत कादंबरी सन १९३६ मध्यें ‘ धरणीकंप ’ या नांवानें आराखड्याच्या स्वरूपांत प्रसिद्ध झाली. तेव्हांपासून ती चांगलीच गाजली व लोकप्रिय झाली. पण तिच्यांत बराच अव्यवस्थितपणा, तंत्रदुष्टता, फाफटपसारेवजा अकारण विस्तार असे व कथानकाच्या गुंफणीच्या दृष्टीनेंही अनेक दोष राहिले होते. ते दोष दूर करून कादंबरी आमूलाग्र पुन्हा नवी लिहायची असा संकल्प असल्यानेंच ‘ धरणीकंप ’ दुर्मिळ झाली असतांही तिची पुनरावृत्ति मीं मुद्दाम काढली नाहीं. त्या संकल्पानुसार त्याच कथानकावर प्रस्तुत कादंबरीची पुनर्रचना मीं केली आहे. अर्थात् ‘ धरणीकंप ’ आतां बाद झाली. ह्या पुनर्लेखनाच्या कामीं आगामी नवोदित पुरोगामी लेखक चि. यशवंत हडप यांचा मला अनेक परींनीं उपयोग झाला आहे.

ही कादंबरी वर्गीय लढ्यांतील वास्तव सत्य ज्यांना अनुभवानें पुरेपूर पटलें आहे अशा समाजवादी विचारसरणीच्या क्रांतिकारकांना, त्याप्रमाणेंच मुख्यतः ज्यांच्या जीवनावर व ज्यांच्यासाठीं ही कादंबरी लिहिली त्या लोकक्रांतिवीर शेतकरी–कामगार वर्गाला आवडली व पटली तर नवल नाहीं. परंतु महाराष्ट्राचे जुन्या पिढींतील साहित्यश्रेष्ठी श्री. नरसिंह चिंतामण ऊर्फ

ात्यासाहेब केळकर यांचीही मुक्तकंठ प्रशंसा तिला लाभली हें विशेष. ही ादंबरी जवळ जवळ तपापूर्वी आरंभींच्या स्थूल व बेहिशेबी ऐसपैस स्वरू-ांत प्रसिद्ध झाली, तेव्हां तात्यासाहेब तिच्यावरील अभिप्रायांत म्हणतात :

"...अलीकडे कोंकणचा परिचय मला अधिकाधिक होत असल्यामुळें ुमच्या ( कादंबरींतील ) स्वभावचित्रणांत मला तन्मयतेनें शिरतां आलें. आणि वास्तववादी लेखनाचें तुम्हीं एक नमुनेदार उदाहरण लोकांसमोर ठेविलें आहे असें मला वाटेंत. प्रादेशिक म्हणून अपरिचित अशा चाली-ीति व स्थलवर्णनें कादंबरींत आलीं असतां सहृदय व जिज्ञासू वाचक त्यानें ोंधळून न जातां आपण नवीन कांहीं शिकलों याचाच त्याला आनंद वाटतो. ुण्यांत बसून तुमची कादंबरी वाचीत असतां मी देवगड व कोट-ामतें यांच्या दरम्यान भ्रमण करीत आहें असें वाटलें. तुम्हीं कादंबरी मतप्रतिपादनार्थ लिहिली आहे हें उघड दिसतें. पण ललितकला तुम्हांला जितकी हस्तगत झाली आहे तिचीही साक्ष पटते. कोंकणांतील खोत, इनामदार, गांवकर, धनी यांनीं यापूर्वी काय वैभव भोगलें असेल तें असो. पण आतां गढ्या व किल्लेकोट यांच्या पडक्या उध्वस्त वास्तूप्रमाणें त्यांची स्थिति होत चालली असून रयत व कुळें हीं उदयोन्मुख झालीं आहेत. ही उलथापालथ सर्वस्वीं स्वाभाविक अशीच आहे..."

[ ता. २२ नोव्हेंबर १९३६ ].

तात्यासाहेबांचें हें एक तपापूर्वीचें मनमोकळें मत या कादंबरीच्या दृष्टीनेंच केवळ नव्हे तर जुन्यापुराण्या गढ्या व किल्लेकोट यांच्या पडक्या उध्वस्त वास्तूवर पिसाटाप्रमाणें थैमान घालणाऱ्या खोत, इनामदार, गांवकर, धनी अशा उन्मत्त भुतांखेतांच्या भवितव्यतेच्या दृष्टीनेंही फार मोलाचें आहे.

खासबाग, कोल्हापूर
ता. १० जुलै १९४७

विठ्ठल वामन हडप

# अन्नदाता उपाशी !

•

कोंकणचा कष्टाळू शेतकरी, कोटकामते
या माझ्या जन्मभूमींतील जमीनदारांनी
गांजलेला शेतकरीवर्ग, माणुसकीकरितां
झगडणारा शूर वारली कातकरी शेतकरी.
शेतकरी-क्रांतीचा झेंडा एकजुटीनें हातीं
धरणारा साऱ्या महाराष्ट्रांतील शेतकरी
या अन्नदात्यांच्या चरणीं.

पुढील प्रकाशन

## जागा झालेला देश

रशियांतील कामगार–शेतकरी क्रांतीच्या विराट, उदात्त व सत्य स्वरूपाचें मंगल दर्शन घडविणारी कादंबरी.

## गो दा रा णी

शूर वारली शेतकरी लाल झेंड्याखालीं उभा राहून लढत असलेल्या क्रांतियुद्धाची आजची रोमांचकारी शौर्यकथा.

# अन्नदाता उपाशी!

## १

" शंकऱ्या झोंपला आहे; तोंवर मी जरा काजरादेवीला जाऊन येत्यें. ही इतक्यांतच माघारी येत्यें. " असें समोर खळ्यांत परशाशेजारीं बसलेल्या आपल्या म्हाताऱ्या सासऱ्याला सांगून जमना एका हातांत नारळ व दुसऱ्या हातांत हळदकुंकू घेऊन बाहेर निघाली.

" तूं जातेस ? " रामरावानें विचारलें.

" होय. एकदां बोललेला नवस फेडून टाकलेला बरा. म्हणजे जिवाला रुखरुख नको. इतक्यांतल्या इतक्यांत काल दुसऱ्यान्दा आपली पाडी चुकली. लगेच मनांत शंका आली, मागच्या वेळीं ती चुकली तेव्हां नारळ ठेवीन म्हणून देवीला बोललेला नवस फेडला नाहीं म्हणून आज पुन्हा पाडी चुकली, का वाघानें धरली, का कुठें दरडीवरनं खालीं पडली,—त्यापेक्षां देवाचं देणं वेळच्या वेळीं दिलं म्हणजे बरं असतं. "

" रघू आज गांवाहून आला म्हणजे नेऊन टेवील कीं नारळ. नाहींतर अंमळशानं जाईन मी काठी टेंकीत टेंकीत. " रामराव म्हणाला.

" नको. मी हातासरसं काम उरकून येत्यें. आत्तां येईन मी माघारी. " असें म्हणून जमना पुढें निघून गेली.

ज्या काजरादेवीला नवसाचा नारळ ठेवण्यासाठीं त्या दिवशीं सकाळींच जमना जात होती, ती देवी त्यांच्या राहत्या वृंदावन शेतांतून थोडें पुढें जातांच लागणाऱ्या काजरघाटीनें चढून वर गेलें, कीं सुमारें फर्लांगाच्या अंतरावर असणाऱ्या काजऱ्याच्या राईत होती. तिच्या नांवावरूनच त्या रत्नागिरी जिल्ह्यांतील खेड्याला काजरोळी हें नांव पडलें असावें. राईत सुमारें दोन हात उंचीची ओबडधोबड दगडी मूर्ति होती. तीच काजराई.

जमना अर्धी घाटी चढून गेली असेल नसेल, तोंच तिचे धनी–जमनाच्या घरांत खंडानें असलेल्या वृंदावन शेताचे मालक बाबा देसाई वळचणकर नदी उतरून देवगडीं जाण्यासाठीं आले ते घाटी चढूं लागले.

तोंच एकदम जमनाच्या पायांखालच्या पातेऱ्यांतून कांहीं तरी सळसळत गेल्याचा भास झाला. जमनेनें काय सळसळतें म्हणून वळून पाहिलें, तों तिला एक घणसें फुरसें पायाखालून जातांना दिसलें. 'अगबाई!' असें म्हणून जमनेनें एकदम अंगावर शहारे आल्यासारखें केलें.

फुरशावर ती दगड फेकणार तोंच तिला बाबा देसाई खालून येतांना दिसले. त्याबरोबर तिच्या कपाळाला तिरस्काराच्या आठ्या पडल्या. तिला वाटलें, तें फुरसें मारायलाही नको आणि धन्यांची भेट व्हायलाही नको. ती हातांतील दगड बाजूला फेंकून देऊन व देवीला अर्पण करण्यासाठीं बरोबर घेतलेला नारळ आणि हळदकुंकवाचा करंडा उचलून घेऊन झपझप घाटी चढून जाऊं लागली.

त्या दिवशीं जमनानें काजराईसमोर नारळ ठेवून नमस्कार करून मागें वळायला व बाबा तिथें पोंचायला एक गांठ पडली. तिला पाहतांच बाबा थबकले. ती धन्यांसमोर खालीं मान घालून घाटी उतरूं लागणार तोंच ते किंचित् आडवे जाऊन कांहीं तरी निमित्तानें तिच्याशीं बोलूं लागले.

इकडच्या तिकडच्या पांच चार भाकडकथा झाल्यावर बाबांनीं एकदम जमनाला विचारलें, "अग! तुझ्या अंगावरचं लुगडं फाटलं आहे. देवगडाहून तुला नवं लुगडं आणूं का?"

जमना त्या प्रश्नाचा अर्थ ओळखून चुकली. ती एकदम उत्तरली, "नको."

"कां, नको कां? नवरा आणि सासरा रागावेल म्हणून?" बाबांनीं लोचटपणें विचारलें.

कशी तरी पिडाटाळ करायची म्हणून जमना बोलून गेली, "होय."

बाबांनी मनांत तर्क केला, ही आपल्याला वश आहे हें तर खचित; पण नवऱ्याला आणि सासऱ्याला भिते आहे. त्यांनीं वाढत्या धीरानें तिला विचारलें, "आमची ही इतक्यांतच बाळंत व्हायची आहे. तिच्या आंगाला लावायला अथवा सोबतीला म्हणून तुला बोलावून घेतों, म्हणजे कुणाला

कांहीं वाटायला नको. त्या तुझ्या मेहेनतीबद्दल म्हणून तुला लुगडं—चोळी देईन; म्हणजे काम झालं. सांग मला तूं कसल्या रंगाचं लुगडं आवडतं तुला?"

चाळीस वर्षांचें वय त्या गृहस्थाचें. घरांत बायको व चार कच्चींबच्चीं. तरीही एक रखेली चंद्रा भावीण राजरोस ठेवलेलीच होती. आणि तरीसुद्धां जमनासारख्या आपल्या कुळांच्या तरण्याताठ्या देखण्या बायकांवर राजश्रींचा डोळा! आपणाला जमना वश होईल, निदान गरजू व परिस्थितीनें नाडलेली म्हणून तरी वश होईल, अशी अटकळ जी बाबांनीं त्या दिवशीं आपल्या मनाशीं केली होती, ती अगदींच अस्थानीं नव्हती. आजवर कैक गरीब शेतकऱ्यांच्या तरुण बायका-लेकी-बहिणी-सुना कोळ्याच्या जाळ्यांत माश्या अडकतात तशा त्यांच्या सत्ताजालांत अथवा मोहजालांत, पण मुख्यतः स्वतःच्या पोटापाण्याचा प्रश्न सोडविण्याला असमर्थ ठरल्यामुळें, केव्हां ना केव्हां अडकून सुटल्या होत्या. त्यांतल्या कांहीं अनाथ म्हणून भाकरीतुकड्याच्या आशेनें त्यांच्या हातीं लागल्या होत्या, कांहीं अब्रूला भिऊन फसल्या होत्या, कांहींनीं धन्यांची मर्जी संपादन करण्यासाठीं त्यांच्या नीच वासनेला होकार दिला होता. पण या सगळ्याच्या मुळाशीं एक पोट! देवस्थानचा शिपायी व घरचा गडी या दोन नात्यांनीं बाबांच्या घरांत वावरणारा बापू देवळी तरी इतके दिवस जो दरमहा पंधरा रुपये पगाराच्या त्या नोकरीवर कायम टिकला होता, याला कारण त्याची पाटाची बायको आवडी. एका हाताचीं पांचही बोटें कांहीं सारखीं नसतात. आवडी चारित्र्यानें तितकीशी खंबीर नव्हती हें अगदीं खरें. म्हणूनच ती नवऱ्याला न जुमानतां धन्यांशीं अत्यंत खेळीमेळीनें वागत होती. पण बापूला पोटासाठीं तें सारें डोळ्यांवर कातडें ओढून सहन करणें प्राप्त होतें. लहानपणीं लग्न व अठराव्या वर्षीं वैधव्य प्राप्त झाल्यामुळें बदनाम झालेली अशी ती धन्यांच्या वजनानें त्याला प्राप्त झालेली. तिचा बाप सोनू चुनेकर बाबांचें कूळ. धन्यानें अमक्याशीं तुझी मुलगी पाट लावूंदे असें सोनूला सांगितलें, आणि खुद्द तिलाही सर्वतोपरी सुस्थितीचें आमिष दाखविलें, म्हणून तें जमलें. बापूला प्रारंभींदेखील हें माहीत नव्हतें असें नाहीं. पण ह्या संबंधांत धन्यांनींच पुढाकार घेतला, मग त्याचें काय जातें? त्याला बायको दुसरी करतां आली असती. त्याला दरमहा पंधरा रुपये पगार

मिळत होता, व शिवाय घरीं शेतवाडीही थोडीशी खंडानें करतां येत असे. कोंकणच्या हलाखीच्या स्थितींत पंधरा रुपये पगार म्हणजे कांहीं नाहीं तरी शाळामास्तरची योग्यता झाली. त्याच्याच दर्जाचा कोणीही वाटेचा चोर त्याला मुलगी देता असता. पण मग धन्यांच्या मर्जीविरुद्ध वागल्यामुळें धन्यांनीं त्याला नोकरीवरून कमी केलें असतें. मग त्याला मुलगी कुणीं दिली असती व त्याचें पोट कसें भरलें असतें ?

अशा त्या शेतकरी वर्गांतील जमना ही एक स्त्री होती. धनी अतिप्रसंगाची भाषा बोलूं लागले, ते सभ्यता व माणुसकी सोडून फार पुढें गेले, असें पाहतांच ती प्रथम गप्प राहिली. तिला आशा होती कीं यावरून तरी धनी काय उमजायचें तें उमजतील, आणि मुकाट्यानें आपल्या वाटेनें निघून जातील.

•

पण जमनेच्या त्या स्तब्धतेचा अर्थ मौनसंमति असाच बाबांनीं आपल्या मनाशीं घेतला, व दोन पावलें पुढें जाऊन जमनेच्या पदराचें टोंक हातांत धरायचा प्रयत्न करीत तिला विचारलें, " जमना ! तूं बोलत कां नाहींस ? बोल ना; कोणत्या रंगाचं लुगडं आणूं तुला ? काळी चंद्रकळा आणूं, कीं रास्ता ?—"

" थोर लोक तुम्ही, बाबा! तुम्हांला असलं करणं शोभत नाहीं. " जमना रागानें उद्गारली.

बाबा बेफिकीरपणें जणूं काय आपल्या हातून कांहींच अपराध घडला नाहीं, अशा भावनेनें देवगडच्या मार्गाला लागतां लागतां जमनाला म्हणाले, " बरं बरं ! माहित आहे मला सारं! "

जमनाला ती धमकी ऐकून भाजलेल्या जागीं फुरसें डसल्यासारखें वाटलें. काजरघाटी उतरून आपल्या मांगरांत जाईतों तिनें कर कर विचार केला. आणि घरीं गेल्यावर तिनें दोनप्रहरीं रामराव एकटाच घरांत आहे व नवरा वायंगणाला पाणी द्यायला गेला आहे अशी संधी पाहून रामरावाला सकाळीं घडलेला वृत्तांत सांगितला. तेव्हांच पूर्वी मुंबईत घडलेला तसला प्रकारही आपल्या नवऱ्याच्या तापट स्वभावाची म्हाताऱ्याला ताजी ओळख करून

देण्यासाटीं म्हणून तिनें सांगून टाकला व शेवटीं सुचविलें, "त्यांच्यापाशीं यांतलं कांहींच बोलूं नका हं!"

म्हातारा सुजाण होता. त्याला लेकाच्या स्वभावाची माहिती होती, तशीच सुनेच्या वर्तनाविषयींही खात्री होती. ती सून त्याची केवळ नांवाला व नात्याला; पण एरव्हीं ती त्याला पोटच्या मुलीइतकी प्यार होती. घरांत रागावण्याची वेळ आलीच तर तो सुनेचा कैवार घेऊन लेकाला रागें भरे. आधींच त्याला वाटे कीं, आपली सूनबाई नाजुक आहे, तशांत मुंबईकरीण. तिचा बाप मुंबईंत पोलिसांत नोकरीला असल्यानें लग्नापूर्वीं बरेच दिवस ती मुंबईत राहिलेली होती. तिला कोंकणांतल्यासारखे काबाडकष्ट करायची संवय नव्हती. म्हाताऱ्याचें लक्ष होतें कीं सून मुंबईहून आली तेव्हां किती गोरी व टवटवीत होती! तिचे कपडेलत्ते कसे गरीबींतलेच पण नीटनेटके होते! तीच कोंकणांत आल्यावर शेतांतल्या राबण्यानें किती काळवंडली! तिचे तेव्हांचे कपडे फाटूं लागून नवीन घेण्याची वेळ आली होती. इतक्या दिवसांची मोलमजुरींतली व शेतकींतली कमाई म्हणून जे काय चार पैसे कधीं मधीं मिळत त्यांची त्या लेकाच्या शिलकेंत भर घालून त्यानें इतक्या वर्षांत सातशें रुपये पुंजी जीव म्हणून जमविली होती. ती रक्कमदेखील त्यानें घरांत ठेवली नव्हती; ती दहीबावच्या बापटशास्त्री सावकारपाशीं ठेव म्हणून ठेवली होती. बापटाची काजरोळी गांवांत बरीच सावकारी होती. वृंदावन शेताला लागलेली जांभळीची फाळी व किंजळभोम हीं देसायांचींच दोन शेतें त्यानें पांच वर्षांपूर्वीं खरेदी घेतलीं होतीं. त्यांतलें किंजळभोम हें शेत तर अवघ्या चारशें रुपयांत त्याला मिळालें होतें. तें ठिकाण रामरावाच्या घरठाणाला लागून असल्यानें रामरावाला तें मिळालें तर खरेदी घ्यायचें होतें. सध्यां तें त्याच्याकडेच खंडानें होतें व त्याचा खंड दुपिकी आठ मण भात तो सावकाराला घाली. तें ठिकाण बापटशास्त्र्यानें रामरावाला पुढेंमागें खरेदी देण्याचें कबूल केलें होतें. त्या आशेवर रामरावानें आपले सातशें रुपये त्या सावकारापाशीं ठेवले होते.

त्या पैशांना आतां रामरावाचें घर जळाल्यामुळें नवाच खर्च उत्पन्न झाला होता. घराला कांहीं नाहीं तरी दीडदोनशें रुपये रोख खर्च करावा लागणार, ते इतक्यांतच जाऊन मागून आणायचा रामरावाचा विचार

होता. त्या एक दोन दिवसांतच तिकडे जाऊन येण्याचें त्यानें ठरविलें होतें. त्या पैशांतून सूनबाईला दोन घडोतीं, नातवाला थोडे कपडे, व पावसाळ्या-साठीं आपणाला एक आणि लेकाला एक अशीं दोन कांबळीं आणायचें त्यानें योजिलें होतें.

आज जमनाचा वृत्तांत ऐकून रामरावाला एकदम वाटलें, सूनबाई अंगावर धड कपडाही नाहीं म्हणून खट्टू असेल का ? तसल्या मोहाला ती कधीं बळी पडणार नाहीं हें त्याला पूर्णपणें माहीत होतें, तरी तिचें कपड्यां-विषयींचें दैन्य पाहूनच बाबांना तिच्यापाशीं तो विषय काढण्याचें धैर्य झालें कीं नाहीं ? जमनाला त्यानें प्रेमानें आपुलकीच्या भाषेंत सांगितलें, " त्याची तुला कांहीं काळजी नको. पण तूं आतां कधीं शेतांत कामाला जाऊंच नकोस ना ? आणि गुरंढोरं रानांत लावायला तर कधींच जाऊं नकोस. आम्ही दोघे आहों, आम्ही करूं तें बाहेरचं सारं काम. " नातू जवळच खेळत होता, त्याला उचलून त्याचा पापा घेत तो पुढें म्हणाला, " ह्या माझ्या पांखराला तेवढा सांभाळ, आणि आम्हांला दोन वेळ भाकरीतुकडा करून घाल म्हणजे झालं. तुला घडोतीं देखील आणायचीं आहेत, आणि ह्या शंकऱ्यालाहि कपडे आणायचे आहेत. आज संध्याकाळीं दहीबावला जाऊन सावकाराकडून पैसे आणतों. घर देखील बांधायचं आहे. पैसे आणले म्हणजे सारीं कामं एकदम उरकतील. "

मायेचा एक शब्द लाखांच्या संपत्तीहून अधिक मोलाचा असतो. जम-नाला सासऱ्याच्या तोंडून आपल्या मुलाविषयीं कळकळीचे उद्गार ऐकून इतकी धन्यता वाटली कीं तिला तुळाच नाहीं. ती हरखलेल्या वृत्तीनें म्हणाली, " मला घडोतीं सध्यांच आणायची कांहीं गरज नाहीं. आहेत यांच्यावर आणखी सहा महिने—वर्षभर मी सहज काढीन. प्रथम आपलं घर उभं होऊं दे. बाळाचे कपडे देखील आजच आणायचं नडलेलं नाहीं. माझी जुनी गरम बंडी आहे, ती उसवून पावसाळ्यापुरत्या दोन गरम बंड्या शिवून आणूं. उगाच खर्च नको. तुम्हां दोघांना मात्र दोन मुंडाशीं आणि दोन कांबळीं प्रथम आणा. कारण शेतांत पाऊसपाण्यांत वावरायचं असतं तुम्हांला. "

" बरं आहे. पाहतों मग काय करायचं तें. तूं आतां मला थोडा चहा करून देतेस का ? "

"चहा !—" असें म्हणून जमना चपापली.

"कां ? साखर नसेल घरांत; एवढंच ना ? मग गुळाचा कां करीनास ? माझी छाती जरा दुखते आहे. ती शेकायला हवी आहे. लोटीभर चहा करून दे मला."

जमनेला तेवढ्यांत आठवण झाली, कुणकेश्वराहून शिवरात्रीच्या जत्रेंतून रामरावानें शंकरसाठीं साखरेच्या पुतळ्यांचीं गांठलीं आणलीं होतीं त्यांतलें एक गांठलें शिल्लक होतें. तें मोडून चहांत साखरेऐवजीं घालून चहा करण्यासाठीं ती आंत गेली.

चहा पितां पितां रामरावानें त्याची चव पाहून बाहेरूनच जमनेला विचारलें, "घरांत साखर होती वाटतं चहापुरती ?"

जमना आंतून उत्तरली, "होय."

"तुला चहा ठेवला आहेस का थोडा ? कीं यांतला ठेवूं मी ?" रामरावानें शेवटचे दोन घोट पातेलींत उरले असतांना विचारलें.

"ठेवला होता. तो मी घेतला देखील." जमना उत्तरली. पण खरोखर तिनें चहा ठेवलाही नव्हता व घेतलाही नव्हता.

रामरावाला सुनेची ही संवय माहीत होती. त्यानें पातेलींतला चहा तसाच ठेवून जमनाला हांक मारून सांगितलें, "पहा थोडा चहा शिल्लक आहे, घेऊन जा."

जमना तो चहा घेऊन आंत गेली. रामरावानें चहा पिऊन समाधानाची ढेंकर दिली ती ऐकून आपले श्रम सार्थकीं लागल्याचें समाधान जमनाला वाटलें. उरलेला चहाही तिनें घेतला नाहीं, शंकरसाठीं ठेवून दिला.

तोंच शंकर जागा झाला, व खायला मागूं लागला. जमनानें चहा पुढें केला. पण तो चहा कांहीं केल्या घेईना.

"मग काय देऊं तुला मी ?" जमनानें विचारलें.

"माझं पुतळ्यांचं गांठलं दे." शंकर रडव्या हट्टी स्वरांत म्हणाला.

"गांठल्याचा तुझ्या आजोबांसाठीं चहा केला. त्यांतलाच हा तुला ठेवला आहे." असें म्हणून जमनानें पुन्हा चहाचा पेला त्याच्यापुढें केला.

"मला नको जा चहा. मी आजोबांना जाऊन सांगतों." असें म्हणून शंकर रडत रडत आजोबांपाशीं आला.

म्हाताऱ्याला तें कळलें मात्र, आणि त्यानें जमनावर असा तोंडाचा पट्टा सोडला कीं ज्याचें नांव तें. आवेशाच्या भरांत तो तेव्हां जमनाच्या आई-बापांचाही उद्धार एकवार करून गेला. जमना आंतून निमूटपणें तें सारें ऐकत होती. पण तिनें कांहीं उत्तर दिलें नाहीं, कीं तें मनाला लावूनही घेतलें नाहीं.

अंमळशानें म्हाताऱ्यालाच आपण उगीच रागावलों असें वाटूं लागलें. तो कडकडाट पाहून शंकर गप्प बसला होता. त्याला खाऊ म्हणून एक शहाळें फोडून खोबरें काढून देतां देतां तो जमनेला उद्देशून म्हणाला, "मी काय साखरेशिवाय चहा घेतला असता तर मरत होतों? आपण सारी धडपड करतों ती पोरासाठीं. त्याच्या तोंडचं काढून कधीं असं मोठ्या माणसांना देऊं नये. थांब. मी आजच संध्याकाळीं जाऊन पैसे घेऊन येतों. आणि येतांना शेरभर साखऱ्याही आणतों. देवानं दिलं असून हाल कां उगाच?"

त्याच दिवशीं सायंकाळीं, रामराव अंमळ आजारी होता तरी जमना नको नको म्हणत असतां काठी टेकीत टेकीत दहीबावीला बापट-शास्त्र्यांकडे पैसे मागण्यासाठीं गेला. तो दिवेलावणीच्या वेळीं जेव्हां उदा-सवाणा माघार आला, तेव्हांच जमनानें व रघुनाथानेंहि ओळखलें कीं पैसे कांहीं मिळाले नाहींत.

"सावकार मोठा लबाड दिसतो. गोडीगुलाबीनं त्याच्याकडून पैसे येती-लसं दिसत नाहीं." रामराव कांबळें खुंटीवर ठेवून गुडगुडी पेटवीत म्हणाला.

"कां? काय झालं?" रघुनाथानें प्रश्न केला.

"तो म्हणतो कीं सध्यां त्याच्यापाशीं पैसेच द्यायला नाहींत. आणखी एका महिन्यानं पाहूं म्हणतो. पाहूं महिन्यानंतर तरी देतो का. नाहींतर त्याची परमेश्वरी आपणांकडे आहेच. फिर्याद लावावी लागेल एखाद्या वकिलाला गांठून. इतके दिवस नुसतं झुलवतो आहे. जमीनही नांवावर करून देत नाहीं, आणि पैसेही देत नाहीं."

आणखी दोन दिवसांनीं बापटशास्त्र्यानें त्याच काजरोळी गांवांत एका शेतकऱ्याचें घरभाट ठिकाण पांचशें रुपये रोख मोजून लिलावांत घेतलें. अर्थात् त्याच्यापाशीं रामरावासारख्या गरिबाला त्याच्या देण्यांतून दोनशें रुपयेही देण्याला नव्हते; पण गरीब शेतकरी कर्जात बुडाला असतांना त्याचें हजार रुपये किंमतीचें ठिकाण थोड्या किंमतींत लिलावांत घ्यायला पांचशें रुपये होते!

●

त्या गोष्टीला महिना झाला.

सकाळीं जमना आपल्या झोंपडीच्या परसांत रात्रीचीं उष्टींखरकटीं घाशीत असतां परसाच्या कुंपणांतून तिला दुरून त्या काजरोळी गांवचा पोलिस-पाटील गंगाराम देवळी बरोबर आणखी चार गडीमाणसें घेऊन येतांना दिसला. गंगारामचे हात रिकामेच होते. बरोबरच्या चौघां गड्यांपैकीं एकाच्या खांद्यावर काथ्याच्या वाल्यांचीं गुंडाळीं होतीं. इतर तिघांच्याही खांद्यावर कुऱ्हाडी होत्या.

ती मंडळी, तीं दोरखंडें व त्या कुऱ्हाडी पाहून तिनें तेव्हांच अंदाज केला कीं धन्यानें आपल्या वृंदावनांतलें आणखी एखाद दुसरें झाड विकलें असावें व तें तोडून नेण्यासाठीं ही मंडळी इकडे आली असावी. पण गंगाराम त्या मंडळीबरोबर कशाला, याचा तिला नीटसा उलगडा होईना. ती तशीच हात धुवून परसाबाहेर आली. तोंवर गंगाराम त्या चौघां गड्यांसह त्या झोंपडीलगतच्या मोठ्या व जुनाट फणसाच्या झाडाखालीं येऊन उभा राहिला होता.

पूर्व दिवशीं सायंकाळींच काजरोळी गांवचे प्रमुख पिढीजाद वतनदार खोत बाबा देसाई यांच्या गड्यानें येऊन त्या फणसावरचे एकूण एक लहान मोठे, पाडाला आलेले व कच्चे देखील फणस तोडून नेले होते. जमनाचा नवरा रघुनाथ राणे व सासरा रामराव हे दोघेही तो अमावस्येचा दिवस असल्यानें मोकळेच घरांत होते. पण त्यांना त्या गड्यानें फणसाचीं फळें तोडतों असें एका शब्दानें सांगितलेंही नाहीं. निदान थोडीं तरी फळें झाडावर असूं देत लेंकरांबाळांसाठीं, असें रामरावानें विनविलें असतां

त्याचेंही ऐकलें नाहीं. गोष्ट खरी; तें ठिकाण आदिलशाहीपासून अथवा त्याच्याही पूर्वीपासून देसायांच्या मालकीचें होतें. तथापि त्यापूर्वी ती जमीन अगदीं पडीक होती. कवळकाडीखेरीज व रानाखेरीज तिथें दुसरें कसलेंही पीक असें काढायची सोय नव्हती. तशा स्थितींत ती जमीन खंडानें घेणारें पहिलें कूळ भेटलें तो रामरावाचा पूर्वज होय, असेंही लोक म्हणत. रामरावाचा तो कोणी पूर्वज ती जमीन डोंगरपायथ्याशीं पाडून नांगरून पिकाला आणीत असतांना त्याला जमिनींत एक जुनें वृंदावन सांपडलें. त्यावरून त्याचें वृंदावन हें नांव पुढें कागदोपत्रीं रूढ झालें होतें. ज्या फणसाच्या झाडाविषयींचा प्रश्न आज उत्पन्न झाला होता, तें रामरावाच्या पित्याचें हातझाड होतें. म्हणूनच त्या झाडाचा खंड गेल्या वर्षापावेतों त्याच्याकडून धनी घेत नसे. वृंदावनांत आणखीही आंबे–फणसांचीं व माड–पोफळींचींही अनेक झाडें होतीं. तीं सर्वच्या सर्व रामरावाचे पूर्वज, स्वतः रामराव व क्वचित् त्याचे मुलगे, भाऊ, बहिणी, बायको यांचीं हातझाडें होतीं. त्या सर्व झाडांचा मिळून अलाहिदा खंड रामरावाला दरसाल धन्यांना पावता करावा लागे. त्यांत त्याच्या लेंकरांबाळांसाठीं तें एक फणसाचें झाड तेवढें पूर्वीच्या धन्यानें त्याला फुकट पिकवून खायला दिलें होतें.

रामरावाचे समकालीन धनी रावसाहेब देसाई हे नुकतेच तीन वर्षांपूर्वी वारल्यावर देसाई वतनाचा–अर्थात् रावसाहेबांचा वडिलार्जित हिस्सा जो त्या वतनांत होता त्याचा कारभार त्यांचे एकुलते एक चिरंजीव बाबा यांच्याकडे आल्यापासून हळू हळू त्यांचे मालकी हक्क निरनिराळ्या स्वरूपांनीं विस्तार पावूं लागले होते. त्यांच्या मतें रामरावानें तें फणसाचें झाड इतकीं वर्षें पिकवून खाल्लें तेंच फार झालें. आतां देखील त्यानें त्याचा खंड देऊं नये म्हणजे काय ?

त्याप्रमाणें गेल्या सालींच बाबांकडून रामरावाकडे त्या झाडाबद्दल खंडाची मागणी केली गेली. ‘ तुमच्या वडिलांनीं हें माझ्या वडिलांचें हातझाड म्हणून आम्हांला फुकट पिकवून खायला दिलें असल्यानें त्याचा खंड तुम्ही मागूं नये व मी तो देणार नाहीं ’ असें रामरावानें सांगितलें. त्या एका कारणावरून धन्यांशीं त्याचें थोडें वितुष्ट आलें होतें. म्हणून गेल्या सालीं रामरावाची खोड मोडण्यासाठीं त्या फणसाच्या झाडाची मोठी फांदी त्यांनीं

मुद्दाम तोडविली. धरतें झाड असें तोडलें म्हणजे भितें आणि धेरनासें होतें. तो फणस कापा असून अगदीं जातिवंत होता. त्याचा एकेक फणस एका गड्याच्या ओझ्याचा असे, व गराही लहानशा सोनकेळ्या एवढा मोठा, रंगानें हळखुंडाच्या कांडीसारखा पिंवळा धमक आणि चवीला मधासारखा मधुर असे. फणसही त्याला थोडेथोडके लागत असें नाहीं. बुंध्यापासून तों अगदीं वरपावेतों फांद्यांच्या टोंकांनाही लहानमोठीं फळें एकसारखीं लटकत असत. कोंकणांत एखादें अगदीं लहान व गरीबसें शेतकरी–कुणब्याचें कुटुंब अशा एखाद्या धरत्या फळझाडावर धान्याखेरीज वरखर्च व कपड्यालत्त्यांचा सारा खर्च सुखानें भागवूं शकतें. कल्पवृक्षच ते शेतकऱ्यांचे. असल्या त्या कल्पवृक्षावर कुऱ्हाड हाणून बाबा देसायांचा फायदा असा कांहींच झाला नाहीं. लांकडेंही ज्या गड्यानें फांदी तोडली तोच घेऊन गेला. पण त्यामुळें फणस मात्र ह्या वर्षीं बराच कमी बाजाला आला.

आज रघुनाथचें वय पाहूं गेल्या चौवीस वर्षांचें होतें. पण त्या मानानें त्याची घडाडी फार दांडगी होती. तो मुंबईच्या ‘ लाल बावटा युनियन ’चा एक सुजाण सभासद होता. एवढें सांगितलें कीं पुरे. भांडवलवाले व कामगार यांमधील झगडा त्याच्या चांगला परिचयाचा होता व भांडवलशाहीविरुद्ध कामगारांनीं आपलें हितसंरक्षण करण्यासाठीं पद्धतशीर रीतीनें कसें झगडावें हें त्याला पुष्कळच चांगलें कळत होतें. तो कोंकणांत आपल्या जन्मभूमींत येतांना नोकरी गमावून आला, तरी कामकरी वर्गाच्या हित-संरक्षणास्तव शहरांतून चालू असलेल्या चळवळीची त्याच्या हाडींमाशीं भिनलेली शिकवण त्याच्याबारोबर आली. वृक्षापासून फळ तोडून अलग केलें तरी फळांतला चवदारपणा फळांतच राहतो, वृक्ष कांहीं तो शोषून घेऊं शकत नाहीं.

बाबांनीं आपलें नाक कापून रामरावाला अपशकून करण्याच्या हेतूनें मागच्या वर्षीं तें फणसाचें झाड जायबंदी करविलें व त्यानंतर काल त्या फणसावर लटकलेले सारे लहानमोठे फणस गड्याकडून तोडून नेवविले. तो प्रकार रामराव व रघुनाथ यांच्यासमोरच झाला. रामराव व जमना यांनीं मनांतून ओळखलें कीं, धनी हा एक महिन्यापूर्वींच्या काजरघाटीवरच्या प्रकाराचा आपणांवर सूड घेत आहेत. तरी बरें कीं, तो प्रकार रघुनाथला

माहीत नव्हता. रघुनाथ धन्याच्या ह्या अरेरावीला हरकत करण्यासाठीं पुढें धावून गेलाही. पण म्हाताऱ्यानें त्याला आपल्या गळ्याची शपथ घालून अडवून धरलें. नाहींपेक्षां तेव्हांच प्रकरण हातघाईवर आलें असतें. रघुनाथचें देखील म्हणणें धन्यानें झाडाचे फणस मुळींच तोडून नेऊं नयेत असें कांहीं नव्हतें. जमीन धन्याची, त्या अर्थी जमिनींतील झाडेंही—तीं आपल्या पूर्वजांचीं हातझाडें असलीं तरी तीं धन्याचींच होत, हा कायदा त्याला माहीत होता. असल्या कायद्यांचा जुलमीपणा त्याला सुजाणपणामुळें इतरांपेक्षां विशेष जाणवत असला तरी त्याला त्या कायद्यासमोर मान नमविण्याखेरीज गत्यंतर नव्हतें.

ती कालची वेळ काल निघून गेली. रात्रौ रामराव व रघुनाथ ह्या बापलेकांचीं धन्याच्या अरेरावीबद्दल पुष्कळशीं खारट तुरट खलबतें झालीं. तें सारें जमनानें ऐकलें होतें. त्यावरून तिला त्या फणसाच्या भांडणाचें मूळ पूर्णपणें माहीत झालें होतें. गांवचा पोलीसपाटील गंगाराम देवळी दुसऱ्या चौघां यमदूतांसह सकाळींच तिथें येऊन थडकला, त्याबरोबर तिला दाट शंका आली कीं कालच्या भांडणावरून चिडून धन्यानें तें फणसाचें झाड तोडण्यासाठींच तर ह्या लोकांना पाठविलें नसेल ना ?

घरांत तेव्हां पुरुष कुणी नव्हते. रामराव व रघुनाथ हे बापलेक मिरच्या व ल्होवी शिंपण्यासाठीं शेतांत गेले होते. जमनाचा शंकर पाळण्यांत झोपीं गेला होता. जमनाला तो एकंदर रागरंग पाहून वाटलें, पुरुषांना बोलावून आणावें का ?

पण पुन्हा तिला वाटलें, अगोदर चौकशी करावी, व मग जरूर तर पुरुषांना हांक मारावी. म्हणून ती तशीच त्या फणसाच्या झाडाखालीं गंगाराम व ते चौघे गडी झाड कसें तोडावें व कोणत्या बाजूनें वाले बांधून ओढून घ्यावे म्हणजे रामरावाच्या राहत्या मांगरावर पडणार नाहीं याचा विचार करीत उभे होते तिथें जाऊन उभी राहिली.

तोंच गंगारामाचें जमनाकडे लक्ष गेलें. तो तिला म्हणाला, " मुद्दाम झाडाखालीं मांगर तुझ्या सासऱ्यानं बांधला आहे, झाड तोडतांना त्याच्यावर पडलं तर आम्हीं जबाबदार नाहीं. "

" म्हणजे, हें झाड तोडणार तुम्ही ?"

" होय. तोडणार. " गंगाराम आढ्यतेनें उत्तरला.

" कां म्हणून ?"

" तें विचारणारी तूं कोण ?"

" आणि तें तोडणारे तुम्ही कोण ? आमचं हातझाड आहे हें. "

" तुमचं नाहीं, तुमच्या बापाचं आहे. आमचं हातझाड आहे म्हणे !"

" तुम्हांला काय बोलायचं असेल तें बापयेमंडळी घरीं आल्यावर त्यांच्याशीं बोला. माझ्याशीं नका बोलूं. "

" तुझ्या बापयांशीं बोलायला मी भिईन कीं काय मोठी धमकी घालतेस ती ?" लगेच गंगाराम बरोबरच्या गड्यांकडे वळून म्हणाला, " चढा रे वर एकजण, आणि त्या मोठ्या खांद्याच्या टोंकाशीं वाला बांधून तोडायला लागा."

एकजण गडी वाला कमरेला बांधून झाडावर चढूं लागला.

जमना किती धीट झाली तरी ती स्त्री पडली. तशांत प्रसंग होता गांवच्या पोलीसपाटलाशीं. गंगारामाची बहीण बाबा देसायांची राख होती. व अलीकडे पांच वर्षें त्या ठिकाणाचा सारा वसूल धन्यांच्या सांगण्यावरून रामराव त्या चंद्रा भावणीकडे पावता करीत असे. बाबा देसायांनीं चंद्राला पोटगीदाखल गांवांतलीं एकंदर तीन ठिकाणें आपल्या वतनांतून तोडून दिलीं होतीं, त्यांतलें वृंदावन हें एक ठिकाण होतें. त्या जोरावर गंगाराम भांडत होता.

आतां इथें जास्त बोलून आपली शोभा करून घ्यायची, त्यापेक्षां पुरुषांना हांक मारून आणावें हें चांगलें, असा विचार करून जमना वायंगणाकडे निघून गेली.



कुऱ्हाडीचे चार पांच घांव फणसाच्या फांदीवर पडतात न पडतात, तोंच रघुनाथ व रामराव हे दोघेही तिथें येऊन पोहोंचले.

ते बापलेक धांवून येतील अशी गंगारामची अपेक्षा होतीच. त्यानें रघुनाथला पाहतांच आपण होऊनच बोलायला प्रारंभ केला, " कसं काय रघुनाथ ? कुठवर आला तुमचा तंटा ?"

" तंटा आमच्या जन्माला पुरून उरायचा. तो इतक्या तडकाफडकीं थोडाच संपतो ? पण तूं देखील एका अर्थानं त्यांतलाच कीं !" रघुनाथ म्हणाला.

" मी त्यांतलाच म्हणजे ?" गंगाराम फणसाच्या विषयाला बगल देण्याच्या हेतूनें कांहींतरी नवीन विषयाची लांबण लावयाची म्हणून बोल-ण्यासाठीं चार पावलें पुढें सरसावला. त्याचा प्रश्न काजरोळी गांवांत आजकाल उत्पन्न झालेल्या धारेकरी–जमीनदार व शेतकरी यांच्यामधील वितुष्टाविषयींचा होता.

" तें आपण बोलूं मग सावकाश केव्हांतरी." फणसाच्या फांदीवर बसून एक गडी फांदीच्या मुळाशीं घाव घालीत होता, त्याला रघुनाथनें हातानें थांबायला खूण केली व गंगारामला म्हटलें, " पण आज तूं हें काय आरंभलं आहेस ?"

वर चढलेल्या गड्यानें कुऱ्हाड थांबविलेली गंगारामच्या तेव्हांच ध्यानीं आली. त्यानें किंचित् रागानें त्याच्याकडे पाहून विचारलें, " तूं रे कां खोळंबलास ? दुपारच्या आंत सारा फणस तोडून झाला पाहिजे. खेळून पळा नाहीं यायचा."

पुन्हा वरच्या गड्यानें कुऱ्हाडीचा एक घाव फांदीच्या मुळाशीं घातला. तोंच रघुनाथानें दोन पावलें पुढें जाऊन दरडावणीच्या स्वरांत त्या गड्याला म्हटलें, " अरे! धाकू! थांब म्हणून सांगितलं ना मीं तुला ?"

धाकू थांबला. रघुनाथचा शब्द त्याच्याच्यानें मोडवला नाहीं.

" कां थांबलास तूं ?" गंगारामनें धाकूला जोरानें दरडावून विचारलें.

" तो काय म्हणतो ऐका तर खरे !" धाकू म्हणाला.

खालीं बाकीचे तिघे गडी फांदी तुटून पडतांना तिचा तोल सांभाळ-ण्यासाठीं त्याला बांधलेले वाले ज्या मोकळ्या जागेंत फांदी पडल्यानें रामरा-वाचा मांगर बचावेल अशी त्यांची अटकळ होती तिकडे नीट तणावून उभे होते, ते वाले तसेच मोकळे सोडून सर्वजण पुढें आले.

" झाड आमचं आम्ही तोडतों आहों; तुला हरकत करायचं कारण नाहीं." गंगाराम ताठरपणानें रघुनाथला म्हणाला.

" झाड तुमचं ? तुमचं झाड हें ? " रघुनाथनें विचारलें.

" नाहीं तर काय झाड तुझं ? कीं तुझ्या वाडवडलांचं ? " गंगारामनें चिडून विचारलें.

" इतका चिडतोस कशाला गंगाराम ? पोलिसपाटिलकी तुझी औट घटकांची आहे. पण शेतकी तुझी–आमची जन्माची आहे. तूंही आमच्या-सारखंच एक कूळ आहेस. माझ्या वाडवडलांचं हें हातझाड आहे. आमच्या धन्यांनीं तें आम्हांला फुकट खायला सोडून दिलं आहे. हें तुला माहीत नाहीं काय ? " रघुनाथ म्हणाला.

" फुकट खायला दिलं असेल. मी कुठं नाहीं म्हणतों ? त्याप्रमाणें तुम्ही तें आजवर फुकट खाल्लं नाहीं का ? पण तुम्हीच आमच्याशीं शिरजोरपणानं वागूं लागल्यावर आम्हीं तरी तुमची गय काय म्हणून करायची रे ? "

" आम्हीं गय काय म्हणून करायची म्हणे ! " जमना तेव्हां आपल्याशीं तिरस्कारानें म्हणाली, " आम्हीं झाड लावलं, रक्ताची पांवळी करून शिंपलं, त्या आमची ह्या झाडावर कांहींच सत्ता नाहीं. आणि याची एक बहीण भावीण आहे, ती धन्यांच्या स्वाधीन करून तिच्या जिवावर हा ह्या ठिका-णाचा मालक म्हणून मिरवतो आहे ! काय जगाचा न्याय आहे तरी ! "

चंद्राची आई बया ही देखील चंद्राप्रमाणेंच तेथील देवळांतली भावीण होती. ती काजरोळी गांवाला लागूनच असलेल्या दहीबाव खेड्यांतील बापटशास्त्री या सुखवस्तु सावकार ब्राह्मणानें ठेवलेली होती. गंगाराम हा त्या बापटाचाच मुलगा. शिवाय देवळालगत त्याची थोडी जमी-नही होती. त्याच जमिनींत बापटानें बयाला लहानसें घर बांधून दिलें होतें. पुढें थोड्या दिवसांनीं बयाचें त्या बापटशास्त्र्याशीं वितुष्ट आल्यामुळें तो तिच्या घरीं येईनासा झाला. तरी बयाचें घर बयाकडेंच राहिलें. परंतु बापटशास्त्री निवर्तल्यावर त्याचा मुलगा वडिलार्जित जमीनजुमल्याचा कारभार पाहूं लागला, तेव्हां तो बयापाशीं राहत्या घराखालच्या जाग्याबद्दल खंडचिठ्ठी मागायला चुकला नाहीं. बयानें त्याला खंडचिठी दिली नाहींच, उलट त्याच्या बापाचा व आपला संबंध पुन्हा एकदां आवेशानें जाहीर करून त्या निमित्तानें त्याची टर करायलाही तिनें कमी केलें नाहीं. पुढें थोड्या

दिवसांनीं गेल्याच वर्षीं बया वारली, व तिच्या सुतकांतच तिच्या परसांतल्या आंब्याच्या झाडावरचे आंबे दंडेलीनें उतरून नेण्याचा प्रयत्न बापट-शास्त्र्याच्या मुलानें करून पाहिला होता. तेव्हां ह्याच गंगारामनें घरभाट आपल्या मालकीचें आहे असें सांगून त्या मूळ मालकाच्या तोंडाला तर पानें पुसलींच; पण आंबे उतरायला आलेल्या गड्याला मारून झोडून त्याचें आंबे उतरायचें जाळेंहि त्यानें हिसकावून घेतलें होतें. तेव्हां याच बाबा देसायांनीं त्याला पोक्त कायदेशीर सल्ला दिली होती कीं, 'बारा वर्षां-पेक्षां जास्त काळ जागा तुझ्या ताब्यांत आहे. तुझें त्यांत घर आहे व खंडाची कबुलायत वगैरे कांहीं नाहीं. तूं बापटाला आंत पायसुद्धां टाकूं देऊं नकोस.'

याप्रमाणें गंगारामनें आयत्या बिळावर नागोबा बनणें मात्र योग्य, आणि आपल्या पूर्वजांनीं इतक्या पिढ्यान् पिढ्या जी जागा परिश्रमपूर्वक नांवा-रूपाला आणली, नाना प्रकारचीं झाडें लावून तिचें सौंदर्य व मोल वाढ-विलें, त्या फणसावर मात्र आपली कांहीं सत्ता नाहीं, हा न्याय कुठचा?—असा रघुनाथच्या प्रश्नाचा आशय होता.

"गेल्या वर्षी बापटाचा गडी तुझ्या परसांतल्या आंब्याचे आंबे काढा-यला आला तेव्हां त्याचं तूं काय केलंस?" रघुनाथनें विचारलें.

"माझ्या आईला थोरल्या बापटांकडून ती जागा बक्षिस मिळाली होती. ती आमच्या मालकीची होती." गंगाराम उत्तरला.

"त्या जागेची मालकी मिळवायला तूं किंवा तुझ्या वाडवडिलांनीं कितीसं रक्त आटवलं आहे रे?" रघुनाथ रोखठोक म्हणाला. यापेक्षांही रोखठोक प्रश्न त्याच्या अगदीं जिभेवर नाचत होता. तुझ्या आईनं बाप-टाची रखेली होऊन त्याचं घर धुवून आणलं, म्हणून तूं त्या जागेचा मालक काय? आणि माझ्या पूर्वजांपासून आम्हीं जागा पिकालायक पाडून धन्याला नवी उत्पन्नाची बाब निर्माण करून दिली, म्हणून आम्ही जन्मभर धन्याचे गुलाम—त्याचं कूळ काय? त्या जागेंत आम्हीं लावलेल्या फळझाडांपैकीं एखाद्या फणसावरच्या फळावरही आमची सत्ता नाहीं काय?"

रघुनाथ बोलला तेंच अधिक बोलला असें रामरावाच्या मनाला जाणवलें. त्यानें ह्या जगांत रघुनाथपेक्षां पंचवीस पावसाळे जास्त काढले

असल्यानें बाबांची गांवकुठारी वृत्ति व गंगारामची आपल्या अधिकाराच्या जोरावर गांवांत कुणालाही कोणत्याही भल्या बुऱ्या निमित्तानें छळून वठणीवर आणण्याची खुमखुमी यांची त्याला पूर्ण अटकळ होती. गांवांतल्या गोष्टी पूर्वी अनेकदां तशा विकोपाला गेलेल्या त्याला माहीत होत्या. तो आपल्या मुलाची बाजू सांभाळून घेण्याच्या इराद्यानें मध्येंच म्हणाला, " त्याच्याशीं आम्हांला कांहीं करायचं नाहीं. गंगाराम! तूं म्हणतोस तें एका अर्थी खरं आहे. आम्ही कशीं झालों तरी धन्यांचीं कुळं! धन्यांच्या पायांच्या कृपेनं त्यांच्याच जमिनींत गोळाभर अन्न पिकवून खाऊन आमचे पिंड आजवर पोसले. धन्यांना आवडणार नाहीं अशी कोणतीही गोष्ट आम्हीं करूं नये हें खरं आहे. धन्यानं मारलं आणि पावसानं भिजविलं, दाद मागायची कुणाकडे आणि दाद घेणार तरी कोण? आज धन्यांची आमच्यावर गैरमर्जी झाली आहे, ती देवदयेनं केव्हां दूर होईल तेव्हां होईल.—"

" हें झाड चंद्रापासून मीं व्यापारासाठीं पंचवीस रुपयांना विकत घेतलं आहे. " गंगाराम उत्तरला.

ते गंगारामचे शब्द कानीं पडले मात्र, आणि सर्पाच्या शेपटीवर पाय पडतांच सर्प संतापून फुत्कारत फणा वर उभारतो, तसा रघुनाथ एकदम बोलून गेला, " धन्यांच्या सांगण्याखेरीज दुसऱ्या कुणालाही आम्ही ओळखीत नाहीं. उद्यां कुणाच्या परवानगीनं झाड तोडायला दिलंस असं म्हणून धनी रागावले तर?"

" धन्यांच्या तर्फेनंही मीच इथं उभा आहें. मी झाड तोडणार. पुढं तुझं म्हणणं काय?" असें म्हणत गंगारामनें बरोबरच्या गड्यांकडे वळून त्यांना सूचना केली, " अरे! तुम्ही हातपाय जोडून उभे काय राहिलां? तुम्हांला इथें कशाला आणलं मीं? तोंड पाहायसाठीं?"

" बळजबरीनं तूं हें झाड तोडणार?" रघुनाथनें वाढत्या संतापानें गंगारामला विचारलें.

" आजच काय अडलं एवढं धन्यांचं, हेंच झाड तोडायचं?" रामरावानें विचारलें, " त्यांना झाड विकायचंच होतं, तर मीं मागेंच त्यांना

सांगितलं होतं कीं मी तें विकत घेईन. म्हणजे पैसे त्यांना मिळाले असते, व आमच्या परसांतलं पोर जिवंत राहिलं असतं. बाकी झाड आम्हांलाही तोंडावंच लागलं असतं. एरव्हीं घराच्या लांकूडसामानाची भर कशी होणार? पावसाळा हळुहळू डोकीवर येऊं लागला; तोंवर गुरं बाहेर कावणांत राहतील. पण पावसांत हें त्यांचं घर त्यांना मोकळं करून द्यायला हवंच. अर्थात् स्वतःला राहण्यासाठीं नवी खोपटी आम्हांला आतां बांधणंच भाग आहे."

बोलतां बोलतां म्हाताऱ्याचा कंठ दाटून आला. मोठा मुलगा भानू अकालीं मृत्युमुखीं पडल्यामुळें त्याचा एक हातच तुटल्यासारखा झाला होता. आणि तें दुःख जगाच्या रहाटीकडे पाहून म्हातारा अंमळ गिळतो न गिळतो, तोंच अकस्मात् घराला आग लागून आंतल्या कपड्यालत्त्यासह व दाणागोट्यासह अगदीं राखरांगोळी होऊन गेली! माणसें कुणी दगावलीं नाहींत हेंच विशेष. आपल्या एका भाऊबंदानें कांहीं देवदेवस्की केल्यामुळें आपली अशी वाताहत उडत आहे असा रामरावाचा भोळा समज होता. त्याचा मांगर घरापाशींच वृंदावनांत बांधलेला तयार होता, म्हणून त्याला ताबडतोब तिथें डोकें टेकायला जागा तरी मिळाली. पण पावसाळ्यांत गुरें व गवतकाडी ठेवण्यासाठीं मांगर मोकळा करणें अवश्य असल्यानें त्यापूर्वी लहानसें कामचलाऊ खोपट तरी त्याला उभें करणें भागच होतें.

"धन्यांना हें झाड खरोखर विकायचं नव्हतं." असें सांगून गंगारामनें रामरावाच्या शब्दांमुळें धन्यांवर उलटणारी बाजू सांभाळून घेण्याचा उद्योग आरंभिला. "चंद्राला नवं घर या वर्षी बांधायचं झालं तर अनायासें उपयोग होईल, म्हणून ते मला म्हणाले कीं, ठिकाण एका सावकाराला खरेदी द्यायचं आहे; त्यापूर्वी तें झाड तोडून घरीं आणून ठेवा कसे!"

"एकूण धन्यांनीं मला झाड विकायचं नाहीं म्हणून सांगितलं तें उगीचच तर? मी कांहीं त्यांच्याकडे फुकट झाड मागत नव्हतों. पैसे आजचे उद्यां दिले असते इतकंच काय तें. पण मी कांहीं कुठें पळून जात नव्हतों." रामराव म्हणाला.

"अरे, पण मी तुला मग हेंच झाड सगळं म्हणशील तर सगळं अथवा मागशील तितकीं लांकडं विकत द्यायला तयार आहें ना? लोकांकडून घेतों तितका नफा तुझ्याकडून घेणार नाहीं. मग तर झालं?"

रघुनाथला ती पहिली हकिकत कांहींच माहीत नव्हती. ती आतां कळ-तांच त्याच्या तळपायाची आग मस्तकाला जाऊन झोंबली. ' डोंगर तोडून जमीन पाडली—झाडं लावून जोपासलीं आम्ही, आणि त्यांच्या विक्रीवर हजार—आठशें रुपये हा धनी मिळवणार ! ' तो मनांतल्या मनांत संतापानें तळमळूं लागला, ' ह्या एका झाडावर—त्याच्या एका फळावर देखील आमची सत्ता नाहीं अं ? आणि त्या दीडदमडीच्या बाजारबसवीची—तिच्या जिवावर चैनींत जगणाऱ्या ह्या देवळ्याची मात्र सत्ता ! आम्हीं जतन करून वाढवलेल्या झाडांचीं फळं बुचाडून धन्यांचीं रांडापोरं खाणार, त्या झाडांच्या लांकडांवर धन्यांच्या रांडापोरांचे इमले उभे राहाणार; आणि आम्ही झोंपडीपुरत्या लांकूडफांट्यालाही महाग ? '

तो तसाच गडी फणसाची फांदी तोडण्याच्या तयारीला लागले होते त्यांच्याकडे धावत गेला. त्यांना त्यानें निक्षून सांगितलें, " खबरदार फणसाचं एक पान तरी तोडाल तर ! झाड आमचं आहे. चला निघा—व्हा आपापल्या घरीं चालते. "

" एकूण इतका वेळ सामोपचारांनीं सांगितलं त्याचा हाच उपयोग काय ? " गंगारामनें मागें पाय घेणाऱ्या गड्यांकडे पाहून चिडून लगेच रघुनाथकडे वळून विचारलें.

" मला सामोपचार नकोत आणि दामोपचार नकोत. मी माझं झाड कुणालाही तोडूं देणार नाहीं. " रघुनाथ उद्गारला.

" नाचणे दे म्हटल्यावर नाचणे देणारा नाहींस तूं !—मग गळ्याशीं बेतलं म्हणजे मात्र पीठदेखील दळून देशील ! मी ह्या गांवचा पोलिसपाटील म्हणून तुला आज्ञा करतों आहे, अशी दंडेली पुन्हा करशील तर खबरदार ! खाशीं हाडं नरम करून टाकीन, माहीत नाहीं अजून ! " गंगारामनें धमकावलें.

" कोण ? तूं—तूं माझीं हाडं नरम करणार ? आणि तीं पोलिसपाटीलकीच्या जोरावर काय ? पण हा रघुनाथ असल्या धमकावणीला भीक घालणारा नाहीं बरं का ! याद राखून ठेव. माझ्या घरांत येऊन माझ्याशीं अरेरावी ? धन्यांच्या लग्याबांध्याचा असलास तर धनी तुला डोकीवर घेऊन खुशाल नाचूं देत. आम्ही नाहीं तुला डोकीवर घेऊन नाचणार ! "

"डोकीवर घेऊन नको नाचूंस. पण मी पोलिसपाटील या नात्यानं बोलतों आहें. तुला माझा अधिकार माहीत आहे ना? कीं हातकड्या घालून तुझी गांवांतून खाशी मिरवणूक काढली पाहिजे?" गंगारामनें पोलिसपाटीलकीच्या तोऱ्यांत प्रश्न केला.

"मला माहीत आहे,—तूं मला हातकड्या घालशील, खोटींनाटीं कुभांड माझ्यावर रचशील, मला शिक्षा देववून तुरुंगांत लोटशील. काय पाहिजे तें करशील. साऱ्या गांवाला आग लावायला तूंच एकटा कारण आहेस. पण लक्षांत ठेव, केव्हां ना केव्हां तुझ्याही पापाचे घडे भरल्याखेरीज राहाणार नाहींत."

"ते माझ्या पापाचे घडे भरले कीं उचलून डोकीवर घ्यायला हांक मारीनच तुला मी. तूर्त आजच्यापुरतं काय तें बोल. बऱ्या बोलानं तुला दूर व्हायचं आहे कीं नाहीं?"

"दूर तर होणार नाहींच; पण जो कुणी ह्या झाडाला हात लावील, त्याचा इथल्या इथें मुडदा पाडीन, याद राखून ठेवा." असें म्हणून रघुनाथ अंगांत वारें भरल्यासारखा धांवत जाऊन गड्यांच्या कुऱ्हाडी व वाल्यांचीं गुंडाळीं उचलून घेऊन चालूं लागला.

"कुठें चाललास?" असें रघुनाथला विचारीत व एक अभद्र शिवी हांसडीत गंगारामनें त्याची मानगूट पकडली.

धाकू, सखाराम वगैरे गड्यांना जरी गंगारामची अरेरावीची भाषा आवडली नाहीं, त्यांना जरी रघुनाथचें म्हणणें सोळा आणे पटलें, रघुनाथ-प्रमाणेंच ते देखील जरी इतर अनेक शेतकरी कुळांबरोबर त्याच धन्याकडून पिळले जात होते, तरी रघुनाथनें रागाच्या आवेशांत गंगारामच्या खाडकन् एक श्रीमुखांत भडकावून त्याला फणसाखालीं पातेऱ्यांत लोळण घ्यायला लावल्यावर, ते चौघेही एकदम पुढें झाले, व रघुनाथला त्यांनीं दूर लोटलें.

"रामजीबाबा! असं काय हें तुझा पोरगा मूर्खासारखं करतो? त्याला आवर पाहूं अगोदर!" सखाराम रामरावाला म्हणाला.

"रघ्या! आतां मुकाट्यानं घरांत निघून जातोस कीं नाहीं? कीं देऊं एक मुस्कटांत?" असें म्हणत रामरावानें रागारागानें रघुनाथच्या दंडाला धरून दूर ओढीत नेलें.

"माझं आणखी कांहीं म्हणणं नाहीं. त्या झाडावर कुणी कुऱ्हाड उभारील तिथल्या तिथें त्याच्या नरडीचा घोट घ्यायला मी कमी करणार नाहीं." असें निक्षून बजावीत रघुनाथ अंमळ दूर उभा राहिला.

•

कायदेशीर उपायांपेक्षां असली गांवठी जडीबुट्टीच गांवकुटाळकी यशस्वी करायला अधिक उपयोगी व कमी सायासाची, असा गंगारामचा इतक्या दिवसांचा अनुभव होता. म्हणूनच तो कधीं सहसा आपल्या सरकारी अधिकाराचा उघड उघड उपयोग असल्या कामीं करीत नसे. बहुधा दर आठवड्याला सरकारी कामासाठीं येणारा त्याचा वरिष्ठ अधिकारी म्हणजे साधा पोलिस शिपायी. पण तो झाला तरी गंगारामसारखाच एक गांवढळ अशिक्षित माणूस असायचा. त्याला अथवा पोलिस जमादार, कोतवाल वगैरे आणखी वरचे अधिकारी आले तर त्यांनाही प्रसन्न ठेवायला गंगाराम पूर्ण समर्थ असल्यावर त्याला त्यांचें भय उरलेंच कुठें? उलट एखाद्याला धाकदपटशा दाखवायचा झाला अथवा चावडीवर आणून खरपूस 'वेदोक्त' चोप द्यायचा झाला, तर ह्या पोलिस अधिकाऱ्यांकडून त्याला तें अनेकदां सहज जातां जातां करतां येई. 'वेदोक्त' चोप हा शब्द खुद्द गंगारामचाच होता. ब्राह्मण–ब्राह्मणेतर वादांतील ही 'वेदोक्त–पुराणोक्त' भानगड त्यानें पूर्वीं कधीं तरी ऐकली होती. त्यावरून त्यानें आपल्यापुरता त्या दोन्ही शब्दांचा विशिष्ट अर्थ रूढ केला होता. 'वेदोक्त' हें पुराणोक्तापेक्षां श्रेष्ठ दर्जाचें, फक्त सोंवळ्या ब्राह्मणांच्याच उपयोगाचें, त्याप्रमाणें कोणत्या तरी पोलिस अधिकाऱ्याकडून अथवा सरकारी अधिकाऱ्याकडून धमकी–ताकीद–मारपीट–मेहेरबानी जें जें काय होईल तें वेदोक्त, व असलेंच व्यवहार निव्वळ गांवगुंडीवर चालविले जात ते पुराणोक्त, असा त्याचा लाक्षणिक अर्थ होता.

रघुनाथनें आपल्या फाडकन् श्रीमुखांत भडकावली, त्याबद्दल त्याच्यावर सूड घ्यायचें तर तेव्हांच गंगारामच्या मनानें ठरून गेलें. तो मग वेदोक्त अथवा पुराणोक्त कसाही साधो. रघुनाथ व रामराव या दोघांनाही अनुलक्षून तो म्हणाला, "मी सरकारी अधिकारी असल्यानं मारामारीच्या

फंदांत मला पडायचं नाहीं. पण उद्यां पोलिसांचं धरणं आलं, आणि तुमच्या हातांत बेड्या पडून तुमची इथून देवगडापावेतों धिंड निघाली, कीं मग तुमचे डोळे उघडतील. सरकारी हिसका अजून तुम्हांला माहीत नाहीं. मग अब्रूपरी अब्रू जाईल, तुरुंगांत जाऊन बसावं लागेल, आणि इकडे बाबा तुमची झोंपडी आपल्या जमिनींतून उखडून टाकून तुमचीं गाडगीं मडकीं, चिरगुटं पांघरुणं काय असतील तीं नदींत फेंकून देतील, तेव्हां कळेल ह्या गंगाराम देवळ्याचा इंगा तुम्हांला!"

रघुनाथनें त्याच क्षणीं गंगारामला ठणकावलें, "अरे जा! तुरुंगांत गेलों तरी बेहत्तर. मर्दासारखा तुरुंगांत जाईन. लोक म्हणतील कीं वाहवा रे पठे! वाघासारखा दरारा गांवांत माजवून बसलेल्या पोलीसपाटलाचं थोबाड फोडून तुरुंगांत आला. पण याद राखून ठेव, मी तुरुंगांतून आल्यावर पुन्हा माझे हात आहेत आणि तुझं थोबाड आहे. धमकी देतो आहे मला! भावणीच्या पोटचा गांवलेक असेल तो तुझी ही असली धमकी ऐकून घेईल. पुन्हा जर आमच्या ठिकाणांत पाय घालशील तर खबरदार! पायच तोडून टाकीन, याद राखून ठेव!"

गंगाराम मुकाट्यानें हिरमुसल्या वृत्तीनें दावा धरलेल्या सर्पासारखा तिथून निघून गेला. रघुनाथनें मोठमोठ्यानें उच्चारलेले शब्द ऐकून जमना आंत मांगरांत मुलाला पाजीत बसलेली तशीच त्याला खालीं ठेवून बाहेर आली. व विचारूं लागली, "काय–काय झालं?"

"उगीच दुखवलंस त्याला तूं. आपण पडलों गरीब माणसं, आधींच परिस्थितीनं गांजलेलीं. त्यांत आणखी हे नवे शत्रु कशाला?" रामराव जमनाकडे लक्ष न देतां रघुनाथला म्हणाला.

रघुनाथ उत्तरला, "शत्रु नवे नाहींत, जुनेच आहेत हे. हे बिळांतले सर्प कधीं डसतील याचा नेम नसतो. यासाठीं यांचं निर्मूळ करून टाकलं पाहिजे. त्याखेरीज आपला पल्ला यायचा नाहीं."

एवढ्यांत धाकू, सखाराम वगैरे चौघेही गडी गंगाराम नदीपार गेला असें पाहून माघारे आले. धाकू रघुनाथला म्हणाला, "तूं आमच्यावर रागावलास तर नाहीं ना?"

" रागावायचं काय कारण ? तुम्ही कांहीं चुकलां नाहीं. चूक झाली, ती तुमच्या पोटाची; तुमची नाहीं. बाकी, तुम्हीं जर मला थोडा हातभार लावला असता, तर मी त्याला जन्माची आठवण राही अशी त्याची खाशी खोड मोडली असती. मग पाहिलं असतं त्याची दाद कोण घेतं तें. "

" रघू ! गंगाराम आपल्या अधिकाराच्या जोरावर बनावट साक्षीपुरावा तयार करून देखील हवी ती गोष्ट आपल्या मनासारखी करून घेतो हें तुला माहीत आहे ना ? अशा कामीं आपले गांवकरीच भीतीनं म्हणा अथवा लोभानं म्हणा त्याच्या पाठीशीं उभे राहातात. जोंवर गांवांत तुमची एकजूट नाहीं, तोंवर असल्या गोष्टी फुकट आहेत. उद्यां गंगारामनं गांवांत एखाद्याचं घर उभं जाळायचं मनांत आणलं अथवा एखाद्याचा खून करायचा मनावर घेतला तरीदेखील त्याला साथीदार हवे तेवढे गांवांतलेच मिळतील. आणि तुझ्या–माझ्या विरुद्ध खोट्या साक्षी देऊन देखील तुला मला ते खड्ड्यांत लोटतील. "

" पोलिसपाटलाच्या सांगण्यावरून आम्ही फणस तोडायला आलों, म्हणून तुला आमचा राग आलेला दिसतो आहे रामजीबाबा ! पण आमच्या जागीं तूं असतास तर काय केलं असतंस ? " धाकू म्हणाला.

" आणि इतकं झालं तरी आम्ही फणस तोडला का ? तुमचा विरोध आहे असं दिसून येतांच हात आवरले कीं नाहीं ? " नारूनें विचारलें.

" आणि गंगारामनं आतां झाड तोडायचंच असा हट्ट धरला असता, तर तुम्हीं काय केलं असतं ? " रामरावानें प्रश्न केला.

तोंच मध्येंच दत्तूनें तोंड घालून म्हटलें, " तेवढी वेळ आली असती तर मीं त्याला साफ सांगितलं असतं, आपण ह्या भांडणांत झाड तोडणार नाहीं म्हणून. "

" तुझं बरोबर आहे, तूं सडा फटिंग आहेस. धन्यानं शेत काढून घेतलं तर मोलमजुरी करशील, मुंबईला जाऊन नोकरीधंदा करशील. तुझं कांहीं अडायचं नाहीं. पण आम्ही तसे वागलों तर आमच्या बायकापोरांची काय वाट ? "

" आणि तुमच्या हितासाठीं हे इतके झटतात, " जमना इतका वेळ स्तब्ध उभी होती, ती रघुनाथकडे बोट दाखवून त्या गड्यांना उद्देशून म्हणाली, " ती यांच्या बायकापोरांची काय वाट? याचा तुम्हीं कधीं विचार केला आहे काय?"

" तें कांहीं नाहीं, आम्हांलाच खाज म्हणून लोकांसाठीं आम्ही भांडावं, मरावं. आमच्यासाठीं मात्र कुणी कांहीं करायला तयार नाहीं. " रामराव पूर्ववत् धुस्शांत म्हणाला.

" रामजीबाबा! आमचे दगडाखालीं सांपडलेले हात हळूहळू काढून घ्यायला नकोत का?" सखारामनें विचारलें.

" अरे! पण हळूहळू हात दगडाखालून काढून घेतांना देखील थोडंसं खरचटणारच. तेवढ्यादेखील वेदना सहन करायची ज्यांच्या मनाची तयारी नाहीं, त्यांनीं मी म्हणतों, जगावंच कशाला?" दत्तूनें विचारलें.

" तुम्हां सर्वांचं बरोबर आहे. त्याबद्दल मी तुम्हांला नांवं ठेवीत नाहीं. पण एवढंच आपण सर्वांनीं लक्षांत ठेवायचं कीं, आपला गांवच्या धन्यांशीं जो बेबनाव उत्पन्न झाला आहे, त्याची एक ठिणगी आज इथें वृंदावनांत पडली आहे. ही ठिणगी इथं विझली असं नाहीं, व विझेल असंही मला वाटत नाहीं. हिचा वणवा भडकणार हें निश्चित. मग तो कोणत्याही बाजूनं भडको. त्या वणव्यांत मी भाजलों गेलों तर मला त्याची मोठीशी पर्वा नाहीं. सती जायला निघाल्यावर अंग भाजतं म्हणून मागं सरणारांपैकीं मी नाहीं. पण इथं हा प्रश्न माझा एकट्याचा नाहीं, तुम्हां सर्व शेतकऱ्यांचा प्रश्न आहे हा. हें ध्यानीं घेऊन पुढें वागा म्हणजे झालं. "

तोंच सोनू गावडा तिथें आला व रघुनाथला म्हणाला, " वडचीच्या राईत आपले लोक जमा झाले आहेत. त्यांनीं तुला आणि रामजीबाबाला ताबडतोब बोलावलं आहे. "

## २

त्या दिवशीं रघुनाथ राणे व गंगाराम देवळी यांच्यांत उत्पन्न झालेल्या वितुष्टाचें मूळ निराळ्याच दिशेनें काजरोळी गांवच्या तत्कालीन परिस्थितीच्या जमिनींत फार खोलवर रुजलेलें होतें.

हिंदुस्थानांत इतकीं लक्षावधि दरिद्री खेडीं आहेत, त्यांतलें काजरोळी हें एक खेडें कोंकणपट्टींत अति दरिद्री म्हणून गणल्या गेलेल्या रत्नागिरी जिल्ह्यांतील महादरिद्री अशा देवगड तालुक्यांत समुद्रकिनाऱ्यापासून सुमारें बारा मैलांच्या अंतरावर होतें. कोंकणांतील भिकार खेड्यांतही सुखी अथवा कमी दुःखी अशीं जीं कांहीं खेडीं होतीं, त्यांत काजरोळीचें स्थान अगदीं शेवटचें असलें, अथवा तिथें त्या गांवाला मुळींच स्थान नसलें, तरी गेल्या चाळीस वर्षांत अनेक निरनिराळ्या विस्मयजनक कारणांसाठीं त्या गांवाला तिथल्या पंचक्रोशींत बरीच प्रसिद्धि मिळाली होती. आदिलशाही अंमलांत कुणा एका वळचण गांवच्या वळचणकर आडनांवाच्या बहाद्दरानें तरवार अथवा लेंखणी गाजवून जें चौवीस गांवांचें देसाई वतन कोंकणांत संपादन केलें, त्या चौवीस गांवांत काजरोळी गांव होता.

आयतखाऊ जमीनदारांना उत्पन्न वाढविण्याचा मार्ग मोकळा असा एकच, कुळांकडून जमिनींचा खंड वाढाव्यानें मागणें हा. त्या मार्गाचा अवलंब हळुहळू प्रत्येक जमीनदार करूं लागला. त्याप्रमाणेंच वंशवेल विस्तारूं लागला, तसतशी कुटुंबांत फाटाफूट उत्पन्न होऊन वेगळे वेगळे संसार थाटले जाऊं लागले; व तितके दौलतीचे तुकडे अर्थातच होत गेले. असे तुकडे होतां होतां एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत आदिलशाहीच्या वेळचे चौवीस गांवचे जमेदार वळचणकर देसाई गांवोगांवीं वतनदारीच्या हिस्सेरशीनें विभागले जाऊन काजरोळी गांवांतील वतनाचे वतनदार उरले ते काजरोळकर देसाई म्हणून ओळखले जाऊं लागले. तथापि वळचणकर हें त्यांचें मूळचें नांव रूढ होतेंच.

बरें; काजरोळी गांवचीच गोष्ट घ्यायची झाली तरी वाढते खंड कुळांना पिळून वसूल केल्यानें बाबा देसायांसारख्या जमीनदारांच्या वाढत्या गरजा निभत असत अशांतली गोष्ट नाहीं. जमिनींचा वसूल यथावत् पदरीं पडायचा—मातींतून सोनें पिकायचें म्हणजे त्याला किती यातायात! कुळांच्या अडीअडचणींमुळें कधीं खंड वेळेवर मिळूं नये, त्या कुळाकडून जमीन काढून दुसऱ्या कुळाला द्यायची झाली तर तें दुसरें कुळ पहिल्या कुळाचा शाप बाधूं नये म्हणून एक साल जमीन पड पडल्याखेरीज खंडानें घ्यायला तयार नसायचें, कुळांकडे थकलेल्या बाक्या वसूल करण्यासाठीं मारामार पडायची! पण असा वसूल खोळंबला म्हणून घरांतल्या चैनी, मुलांमुलींचीं लग्नें, घरांतलीं बाळंतपणें वगैरे गोष्टी थोड्याच खोळंबून राहतात! त्यांची जोगवण करण्यासाठीं मग सावकाराचें घर पाहणें प्राप्तच. सावकाराला जमिनी गहाण द्यायच्या व कर्ज काढायचें. अशा पद्धतीनेंच काजरोळींतील देसाई, मिराशी, कुळकर्णी यांचीं वतनें भराभर सावकाराच्या घरांत जात होतीं. अशा कर्जावरील व्याज जमीनदारांनीं फेडायचें तें तरी जमिनीच्या उत्पन्नांतूनच, आणि निर्वाह करायचा तोही त्या उत्पन्नावरच. त्यामुळें निर्वाह भागून कर्जाच्या व्याजाची फेड कशी करतां येणार? मग व्याजासह कर्जाचा बोजा अनावर झाला कीं सावकारानें तगादा करायचा, कीं तो तगादा भागविण्यासाठीं जमीनदारानें जमिनी विकायच्या. याप्रमाणें वतनांची वाताहात उडतां उडतां आजकाल काजरोळी गांवांतील मोठ्या अशा चार जमीनदारांचा मोठेपणा नुसता नांवांत काय तो उरला होता.

अशी काजरोळी गांवची हाकाटी सुरू असतांना त्यांत सरकारसाऱ्याच्या जुलमाची तेवढी एक कमतरता होती. काजरोळी गांव तेथील संगमनाथला आंग्ऱ्यांनीं इनाम दिलेला असल्यानें देव त्या गांवचा मालक, व देसाई हे त्या गांवचे पुरातन वतनदार असल्यानें ते देवस्थानचे वहिवाटदार, अशी गांवची व्यवस्था होती. पूर्वीं कधीं एक काळ असा असेल कीं, जेव्हां गांवांतले देसाई वगैरे इनामदार तेव्हांच्या सरकारांत माफक सरकारी कर जुडीरूपानें भरून गांवांत ‘राज्य’ करीत असतील. त्यानंतर तो गांव संगमनाथाला इनाम मिळाल्यावर त्या गांवाऐवजीं दुसरें एखादें गांव देसायांना मिळालें होतें कीं नाहीं नकळे. पण त्या गांवची मालकी गेली

तरी वहिवाट देवाच्या तर्फेनें देसायांकडेच राहिली. पेशवाई अंमल कोंकण-पट्टींतून नष्ट होऊन तिथें इंग्रज सरकारचा अंमल चालू झाल्यावर देखील ह्या नव्या सरकारनें देवाच्या पोटावर पाय आणले नाहींत, अर्थात् देसायांच्याही पोटावर पाय आले नाहींत. इनाम देवस्थानची वहिवाट पूर्ववत् त्यांच्याकडेच राहिली.

पण कृष्णावतार ओसरूं लागल्यावर कृष्णाच्याच यादवकुलांत यादवी माजल्याचें इतिहास सांगतो, तसेंच तिथेंही घडलें. गांवांत देसायांचें अंग-वस्त्र जसें कुणी कुणी असे, तसेंच इतर जमीनदारांचेंही असे. रावसाहेब देसायांनीं देवसेवेसाठीं एक कलावंतीण मुद्दाम परगांवाहून आणविली, व तिला आश्रय देऊन देवस्थानांतून वर्षासनही करून दिलें. याप्रमाणें त्यांच्या कृपेनें एका कलावंतिणीला गांवांत लहानशी वतनदारी मिळाली. तशीच एक बकुळा नायकीण या नांवाची कलावंतीण कुळकर्णीबाबांनीं आणवून आपल्या पदरीं ठेविली होती; तिलाही देवस्थानांत देसायांच्या मथू नाय-किणीप्रमाणें वर्षासन मिळावें असा कुळकर्णीबाबांचा आग्रह पडला. पण देसाई कांहीं त्याला राजी होईनात. त्याचें पर्यवसान कुळकर्णी व इतर प्रमुख वतनदार यांनीं देसायांवर देवस्थानच्या पैशांची अफरातफर केल्याबद्दल सरकारांत दावा करण्यांत झालें. दावा जोरानें सुरू झाला, व तो कैक वर्षें एकसारखा चालला होता. देसाई हे एकटेच देवस्थान लुटून खाणारे कोण? आम्हांलाही त्यांतला भाग कां मिळूं नये? हा दाव्याच्या मुळाशीं असलेला हेतु अर्थात् गुप्त होता. पण त्या एका हेतूमुळेंच गांवचे इतर बहुतेक सारे जमीनदार देसायांच्या विरुद्ध झाले. प्रत्येकजण आपापलीं वतनें गहाण, खरेदी करून पैसा घेऊन त्या पैशाच्या जोरावर काजरोळीहून देवगड, देवगडाहून रत्नागिरी, रत्नागिरीहून मुंबई अशा तालुका कोर्ट, जिल्हा कोर्ट व इलाखा कोर्ट यांच्या यात्रा करण्यांत अगदीं चूर होऊन गेला. देसायांचें उरलें सुरलें बहुतेक वतन त्या दाव्यापायीं सावकाराच्या घरांत गेलें.

वर्षानुवर्षें दावा चालला तरी प्रतिपक्षी दमेनात, तेव्हां देसायांना चिंता पडली. आपण काय केलें म्हणजे ह्या सर्व गुलामांची गळचेपी होईल? खुद्द देसायांचें बहुतेक सारें वतन सावकाराच्या घशांत गेलेंच होतें, जेमतेम पोटा-

पुरतें मोकळें होतें. पण इतर धारेकरी लहानमोठे सर्व जे त्यांच्या विरुद्ध होते, त्यांच्या जमिनी अजून बऱ्याच मोकळ्या होत्या. देसायांना युक्ति सुचली, सरकारांत गांवमोजणीची–पैमाषीची मागणी करावी; म्हणजे जमीन महसूल आपोआप भरमसाट वाढून सर्व जमीन धारेकऱ्यांच्या डोक्यावर आदळेल, आणि त्यांची खाशी खोड मोडेल. बरें; तो वसूल जमा व्हायचा इनामदार देवाकडे! आणि त्याचा शिरस्त्याप्रमाणें विनियोग करायचाही वहिवाटदारानेंच!

पुढच्या वर्षी काजरोळी गांवची जमीनमोजणी होणार, असें सरकारी रीत्या जेव्हां जाहीर झालें, तेव्हां बाकीच्या बुद्रुक धारेकऱ्यांचे व त्यांच्या हस्तकांचे डोळे खाड्‌कन उघडले कीं, देसायांनीं हा आपणावर सूड घेतला. आणि तेव्हांपासून तिथल्या ग्रामयुद्धाला नवा रंग चढला.

रावसाहेबांनीं आपली बुद्धिमत्ता झिजवून व भरीला आपल्या चिरंजीवांच्या बुद्धिमत्तेचें साह्य घेऊन आपल्या गांवकरी प्रतिस्पर्ध्यांना अद्दल घडविण्याची नामी शक्कल शोधून काढतांच गांवकरीही जागे झाले, व त्यांनींही आपसांत खलबतें करून ह्या प्रसंगाला तोंड देण्यासाठीं उपाय धुंडाळण्याचा सपाटा चालविला.

आजूबाजूच्या गांवांतून जमीनमोजणी पूर्वीं झालीच होती. मोजणीची जागा बदलली म्हणून मोजणीदार व रयत यांच्या वर्तणुकींतील रीतीभाती थोड्याच बदलतात! मोजणीदार गांवांत आले कीं त्यांना प्रसन्न करण्यासाठीं गांवकरी काय काय करूं शकतात, त्याच्या मोबदल्यांत मोजणीदार त्यांच्यासाठीं काय काय करूं शकतात, वगैरे गोष्टी त्याच होत्या. एकाची जमीन दुसऱ्याच्या नांवावर लावणें, सरकारी आडरस्ते व गोवंड्या आजूबाजूच्या जमीनमालकांच्या जमिनींत थेट सामील करून देणें, एखाद्या क्षेत्राच्या हद्दी ठरवितांना त्या हद्दीवर झाडें वगैरे येत असतील तर अथवा अशाच अन्य कांहीं कारणासाठीं मोजणीदाराच्या मर्जीला प्राप्त झालेल्या खातेदाराचा त्यांत हितसंबंध असेल तर त्याला फायदेशीर अशी हद्दीची सरकासरक करणें, कुळाचा कैवार घेऊन धारेकऱ्याचें नाक कापायचें असल्यास व कबुलायती वगैरे पुरावा कायदेशीर रीतीनें असावा तितका खंबीर नसल्यास त्या कुळाला

निरंतरचें कूळ बनवून धारेकऱ्याला त्या जमिनीचा केवळ नामधारी मालक बनवून सोडणें, जमिनीचा कस पाहून सरस निरस ठरवितांना सरस जमिनीला कमी सारा, निरस जमिनीला अधिक सारा, जिराइताचें बागाईत व बागाइताचें जिराईत करणें, नापीक पड जमिनीची पिकावू जमीन करणें वगैरे किती तरी चमत्कार मोजणीदार करून दाखवूं शकतो.

काजरोळी गांवांत तर मोजणीदारांना कच्च्याऐवजीं भाजलेलें खाद्य मिळालें. पेशवाई अंमलांत एकदां जो त्या गांवचा जमीनमहसूल ठरला होता, तोच आजवर कायम होता. अर्थात् इंग्रजी सत्तेनुसार ब्रह्मदेवाची करणी करायची ही सोन्याची संधी त्यांना लाभली होती. दुसरें असें कीं, गांवांत धारेकरी व कुळें यांचे संबंध धनी आणि गुलाम यांसारखेच जवळ-जवळ असले तरी या गुलामगिरीला अर्थात् कूळपणाला परंपरेखेरीज कांहीं पुरावा नव्हता. आणि ती परंपराही दुतोंडी! धारेकऱ्यांनीं आपल्या गरजे-प्रमाणें व लहरीप्रमाणें—जमिनीच्या मगदुराप्रमाणें व कुळाच्या पोटाकडे पाहून नव्हे—कुळांवरचा खंडाचा बोजा वारंवार. वाढविला असला, तरी त्याला तोंडी पुराव्याखेरीज पुरावा नव्हता. कुळांकडून कबुलायती घेण्याची नवी कायदेशीर पद्धत त्या गांवांत तोंपावेतों जवळजवळ मुळींच प्रचारांत नव्हती.

पण राखण्याच्या अभावीं रानांत स्वच्छंदानें चरणाऱ्या मेंढरांच्या कळपांत जसें लांडग्यांचें फावतें, तसें काजरोळी गांवांतील धारेकरी व कुळें यांच्या ह्या सेव्यसेवकसंबंधांत मोजणीदारांचें मात्र फावलें. भाकरीला तोंड नसल्या-मुळें ही भाकरी मनाला मानेल त्या बाजूनें मोडून खाण्याला त्यांना मुभा मिळाली. बाबांनीं मोजणीदारांना प्रसन्न राखण्यासाठीं गांवकऱ्यांची सभा भरवून जमीनमहसुलाच्या प्रमाणांत खासगी वर्गणी करून मोजणीदारांच्या स्वाधीन केली, ती तर त्यांच्या पदरांत पडलीच. पण लगेच थोड्याच दिव-सांत त्या गांवांतील अशिक्षित, गरीब व भोळ्या शेतकऱ्यांचा मराठी चार इयत्ता शिकलेला सुशिक्षित व स्वयंमन्य पुढारी—बाबा देसायांच्या बिन् लग्नाच्या बायकोचा भाऊ गंगाराम देवळी तेव्हां मनांत म्हणाला कीं, आपणही या वाहत्या गंगेंत हात धुवून कां घेऊं नये? तो बाबांच्या भावणीचा भाऊ म्हणून वजनदार गांवकरी होताच. बरें; तो वतनदार नसल्यामुळें शेतकरी

कुळही होता. तो देखील देसायांची शेती खंडानें करीतच असे. शिवाय तो नेहमीं शेतकऱ्यांत मिळून मिसळून वागत असल्यानें पांच वर्षांपूर्वीं गांवांतील लोकप्रियतेच्या जोरावर व बाबांच्या वशिल्यावर तो गांवचा पोलिसपाटीलही नेमला गेला होता.

ह्या गांवच्या राजकारणांत आपल्या चित्रगुप्ती वृत्तीनें तेव्हां प्रमुख पण नामानिराळा भाग घेणाऱ्या आणखी एका महान् कारस्थानी वृत्तीच्या गृहस्थाचाही बराच हात होता. ती व्यक्ति म्हणजे त्या गांवचे सर्वांत बडे सरकारी अंमलदार ऊर्फ शाळामास्तर व ब्रँच पोस्टमास्तर आजगांवकर हे होत. आजगांवकर हे गांवच्या कुळकर्ण्यांच्या अर्थात् गौड सारस्वत ब्राह्मण जातीचे होते. ते गांवांत नोकरीला आले तेव्हां प्रथम त्यांचें बिऱ्हाड कुळकर्ण्यांच्याच वाडयांत होतें. पण पुढें बाबांविरुद्ध कुळकर्णीप्रभृतींचा देवस्थानाबाबत कज्जा सुरू झाला, त्या सुमाराला आपल्या दप्तरांतील कागदपत्रांतून मास्तर हे माहिती बाबांना पुरवितात व त्यांनीं कांहीं अस्सल कागदपत्रही लांबवून नेले असा संशय कुळकर्ण्यांना आला. लगेच मास्तरांनीं आपलें बिऱ्हाड कुळकर्ण्यांच्या घरांतून उचलून बाबांच्या मालकीच्या एक पडीक घरांत—जिथें बऱ्याच वर्षांपूर्वीं रावसाहेबांची एक कुळंबीण राहात असे तिथें नेऊन थाटलें. तेव्हांपासून मास्तर तिथेंच वास्तव्य करीत होते.

एके दिवशीं अकस्मात् मोजणीदार सर्व मोठ्या धारेकऱ्यांपाशीं कुळांच्या कबुलायतींची विचारणा करूं लागले, व कुळेंही आपण धन्यांच्या जमिनींतील निरंतरचीं कुळें असल्याची भाषा बोलूं लागलीं. धारेकऱ्यांच्या कानीं अशीही बातमी आली कीं, कुळांनीं मोजणीदारांची मूठ दाबली असल्यामुळें मोजणीदार त्यांना निरंतरचीं कुळें ठरविण्याच्या विचारांत आहेत.

आश्चर्याची गोष्ट ही कीं, प्रथम मोजणीदारांच्या कानांशीं लागून त्यांना पैशाची लालुच दाखवून गांवांतील शेतकऱ्यांच्या बाजूला त्यांना वळविणारा, नंतर शेतकऱ्यांची सभा भरवून व याप्रमाणें मोजणीदारांशीं संगनमत करणें आपणां सर्वांच्या किती हिताचें आहे हें त्यांना पटवून देणारा व त्यांना उसनवारी अथवा कर्जबाजार करून ‘ मोजणीदार फंड ’ उभारायला लावणारा, तो फंड आपल्या हातीं घेऊन त्यांतली ठराविक रक्कम तेवढी मोजणीदारांना देऊन बाकीची आपल्या पेटींत जपून ठेवणारा, आणि थोड्या दिव-

सांनीं शेतकऱ्यांचे असे असे उद्योग सुरू आहेत अशी बाबा वगैरेंना माहिती देऊन आगलावेपणा करणारा माणूस एकच, व तो गंगाराम देवळी! आणि तरीही तो तिकडे जमीनदारांना व इकडे शेतकऱ्यांना असा उभयपक्षीं प्यार होता!

आपल्या शेतकरी कुळांचे कायम कुळें बनण्याचे प्रयत्न जे चालले होते, त्यांच्यावर काय तोड काढावी या बाबतींत बाबा व गंगाराम यांचें कांहीं तरी गुप्त खलबत झालें, व गंगारामनें नुक्ती कालच गांवच्या प्रमुख शेतकऱ्यांसमोर एक नवी योजना मांडली होती. ती योजना म्हणजे भोळ्या शेतकऱ्यांना कोंडण्यासाठीं तयार करण्यांत आलेला सांपळा आहे, याची शेतकऱ्यांना दादही नव्हती.

●

" कशासाठीं आज इतके लोक जमले होते ? " दोनप्रहरीं रघुनाथ घरीं येतांच रामरावानें त्याला विचारलें. त्यालादेखील जरी त्या सभेंत आमंत्रण होतें, तरी घरांत जमना एकटी असल्यामुळें, व बाबा तिच्याकडे मूळपासूनच शुद्ध दृष्टीनें पहात नसल्याकारणानें आजचें भांडण भलत्याच विकोपाला जाणें शक्य आहे या भीतीनें तो तिकडे गेला नव्हता.

रामरावाच्या प्रश्नाला रघुनाथ उत्तरला, " आज एक निराळंच वेड आपल्या लोकांच्या डोक्यांत भरलं आहे. "

" कोणतं वेड ? " रामरावानें प्रश्न केला.

" मास्तरांची इथून उचलबांगडी करायचा त्यांचा विचार आहे. त्यांचं असं म्हणणं कीं, कुळं आणि धारेकरी यांच्यांत उत्पन्न झालेल्या बेबनावांत मास्तर बळेंच लावालावीचं तेल ओततात. "

" मास्तर तसा आहे यांत तर संशयच नाहीं. तो फार दिवसांपासून गांवांत बळी मातून बसला आहे. लोकांच्या त्याच्याविरुद्ध तक्रारी पुष्कळच आहेत. लोकांचीं पत्रं मधल्यामध्यें फोडून वाचतो, पत्रं गहाळ करतो, मनिऑर्डरी वेळच्या वेळीं देत नाहीं, आणि कांहीं मनिऑर्डरींचे पैसेही तो खातो म्हणतात. "

" म्हणतात कां, खरंच आहे तें. गेल्या वर्षीं नाहीं का उम्या वाड्यांतल्या नाना पडवळाची पन्नास रुपयांची मनिऑर्डर त्यानं अजिबात खोटी सही करून खाल्ली होती ? अखेर त्याची ओरड झाली, आणि नाना सरकारांत तक्रार करणार असं दिसून आलं, तेव्हां बाबांनीं मध्यस्थी करून मधल्यामध्यें भानगड मिटविली. नाहींपेक्षां तेव्हांच मास्तर तुरुंगांत जायचा."

" बाबांचं आणि मास्तरांचं प्रारंभापासून एकमत आहे. मीं तर असंही ऐकलं आहे कीं, पोस्टाचे पैसे बाबांना अडल्या गरजेला मास्तरांकडून वेळोवेळीं हातउसने मिळतात. शिवाय मास्तरांचं कांहीं कर्जदेखील बाबांनीं काढलं आहे असं ऐकतों. "

" तें कांहीं असलं तरी—अलीकडे कदाचित् त्या दोघांचं कोणत्यातरी कारणावरून वांकडं आलं असेल, किंवा गंगारामचं त्यांनीं कांहीं तरी घोडं मारलं असेल. पण एवढं खरं कीं आपल्या गांवकऱ्यांना तो मास्तर आतां नकोसा झाला आहे. "

" पण नकोसा झाला तरी त्याला टाळणार कसा ? "

" सर्व गांवकऱ्यांनीं मिळून ह्या मास्तरची बदली व्हावी म्हणून अर्ज करायचं ठरविलं आहे. अगदीं तारीखमहावार मास्तरच्या गैरशिस्त वर्तनाचा पुरावा देऊन अर्ज लिहून त्यांनीं तयार केलाही आहे. "

" मग तूं काय म्हटलंस त्यांना ? "

" मी कांहीं नाहीं म्हटलं. पण यापुढें गंगाराम ज्या भानगडींत असेल, त्या भानगडींत लक्ष घालायचं नाहीं असं मी ठरविलं आहे. " त्या अर्जावर आपण सही केल्याचं संकोचामुळें चोरून ठेवून रघुनाथ उत्तरला.

" तेंच—तेंच मी तुला सांगणार होतों. उगाच आपणाला त्या नसत्या भानगडी नकोत. आपले लोक आहेत दुतोंडे. त्यांच्या सावलीवर देखील भरंवसा ठेवतां यायचा नाहीं. आज तुझ्यासारखं बोलतील, आणि उद्यां एखाद्यानं थोडीशी लालुच दाखविली कीं त्याला जाऊन मिळतील. आज इतकीं वर्षे त्यांची गंमत पाहतां पाहतां माझा जन्म गेला. आतां ओघालाच आलं म्हणून सांगतों. तूं तेव्हां मुंबईला होतास. पण तुला ऐकून माहीत असेल. तीन वर्षांपूर्वीं एकदां अशी कल्पना निघाली होती कीं, सर्व

धन्यांनीं जमिनींचे खंड भरमसाट वाढविले आहेत, त्यांना ताळ्यावर आणायसाठीं सर्वांनीं एकजुटीनं संप करायचा; पांच वर्षांपूर्वी जो खंड होता, तितका कायम खंड धन्यांकडून ठरवून घ्यायचा; आणि त्या सालीं पिकं अगदींच बुडालीं होतीं म्हणून अर्ध्या खंडाची सूट मागायचं ठरलं होतं. त्याप्रमाणं संप झाला, आणि आमच्यांतले चार पुढारी पुढें करून आम्हीं आमचं मागणं सर्व धन्यांसमोर ठेवलंही. धनी आमचं ऐकेनात तेव्हां सर्व जमिनी पड पाडून ठेवायचं ठरलं. पण काय? मृगानंतर आमचा हा विचार आश्विनांत ठरला, आणि गिमवसाची वेळ आली तेव्हां पाहतों तों निराळाच प्रकार! जे पुढारी म्हणून आम्ही पुढं केले होते, तेच धन्यांना फितले, आणि त्यांच्या नादानं आणखी थोडे लोक फितले. त्याची आम्हांला प्रथम दाद देखील लागली नाहीं. आणि वायंगणाची वेळ आली तेव्हां तेच फितूर कवळें तोडायला व जमिनीची जाळभाज करायला तयार! त्यांनींच नदीचा पाट काढला, धरण बांधून सालाबादप्रमाणं गांवांत पाणी आणलं, आणि चांगल्यांतली चांगली मळेजमीन पड पडली होती तिच्यांत स्वतः लागवड केली. ज्यांच्याकडे ती जमीन मूळपासून खंडाला होती, ते संपाला चिकटून राहिल्यामुळं बिचारे उपाशी मेले. त्यांच्या जमिनी गेल्या, आणि आमच्यांतलेच कुऱ्हाडीचे दांडे त्या जमिनी बळकावून बसले. मग मला सांग, संप कसला टिकतो? जमिनीचे खंड उतरायचं बाजूलाच राहिलं; सूट तर मुळींच मिळाली नाहीं. उलट पुढच्या वर्षीं वाढाव्यानं खंड पत्करून व बाकी राहिलेल्या खंडाची सवाई–दिढी मृगानंतर धन्यांना घालायची कबूल करून मोठ्या मिनतवारीनं जमिनी मिळवाव्या लागल्या. असे आमचेच लोक ऐनवेळीं दगा देतात. म्हणून म्हणतों बाबारे! ज्यानं त्यानं आपल्यापुरतं पाहावं आणि गप्प बसावं. धन्यांना कबुलायती द्यायच्या नाहींत अशी कल्पना तुम्ही काढली आहे खरी—"

"आमची कल्पना नाहीं ती; ती मोजणीदारांनींच आम्हांला सुचवली आहे. आम्हीं कबुलायती दिल्या नाहींत, कीं आमची जमिनींतली बारा वर्षांपेक्षां जास्त वहिवाट सिद्ध होते, आणि आम्ही निरंतरचीं कुळं ठरतों. मग प्रश्न उरला खंडाचा. तो सरकारसाऱ्याचं मान पाहून एखाद्या चांगल्या

वकिलाच्या मदतीनं आपणाला सोडवावा लागेल.. आमच्या देवगडच्या वकिलानं आम्हांला तसंच सांगितलं आहे."

"मोजणीदारांनीं सांगितलं आणि वकिलानं संमति दिली खरी. ही मसलत विकत घ्यायला तुम्हांला हजारभर रुपये वर्गणी जमवून खर्च करावी लागली किंवा लागणार. पण अरे वेड्यांनो! तुमच्या असं कसं ध्यानीं येत नाहीं कीं मोजणीदार काय किंवा वकील काय, पैशाच्या शितांच्या आशेनं नाचणारीं भुतं आहेत. असले भाडोत्री कैवारी कधींच आपल्या उपयोगाला येत नसतात. मोजणीदार काय, खुंटावरचे कावळे. आज या खुंटावर बसले आहेत, इथलं काम झाल्यावर जिकडे दुसरीकडे काम निघेल तिकडच्या खुंटावर ते जाऊन बसणार. त्यांचं काय, धनी मरो आणि कुळं मरोत, पदरीं पडणाऱ्या लांचेशीं त्यांचं काम. वकिलांचीही तीच गत. नायकिणीचा पेशा आणि त्यांचा पेशा सारखाच."

"पण पैशासाठीं तरी ते आमचं काम करतील कीं नाहीं?"

"पण वेड्या! मला असं सांग, लांचच द्यायची झाली, तर तें तुमच्यापेक्षां धन्यांना अधिक सोपं नाहीं का? तुम्ही कुळं आपल्या बायकापोरांच्या अंगावरचं किडुकमिडुक विकून किंवा वेळीं गोठ्यांतलीं गुरंढोरं विकून त्यांची भर करणार. पण धारेकरी जमिनीचे चार कुणगे गहाण खरेदी करून मनांत आणतील तर सहज हजार–पांचशें रुपये उभे करतील. तुम्हां शेतकऱ्यांशीं आणि कुळांशीं भांडायला वडिलार्जित जमिनीचं भरपूर भांडवल त्यांच्यापाशीं आहे. त्यांची बरोबरी तुम्ही काय बायकापोरं विकून करणार? मोजणीदार व वकील यांना काय, जिकडून त्यांना जास्त पैसा मिळेल तिकडे ते वळणार. खरे उपकारकर्ते असे भाडोत्री मिळते तर कशाला हवं होतं?"

"हें सर्व खरं. पण याला इलाज काय? अशी धडपड केल्याखेरीज निभाव थोडाच लागणार आहे? जी इतर सर्वांची गत आहे तीच आमची. यासाठीं सर्वांनीं धन्यांशीं एकजुटीनें लढा मांडल्याखेरीज आम्हांला एकमेकांचं पाठबळ मिळायचं नाहीं. कबुलायती धन्यांना द्यायच्या नाहींत असं सर्वांनीं ठरविलं तर त्याचा कांहींतरी उपयोग आहे."

" बरं मग मास्तरांच्या बाबतींत काय बेत ठरला ? " रामरावानें किंचित् विषयांतर करून विचारलें.

" बेत काय ठरायचा ? अर्ज लिहून तयार होता त्यावर आम्ही दहा-बारा प्रमुख माणसांनीं सह्या केल्या. " रघुनाथ भीत भीत उत्तरला.

" तूं सही केलीस त्यावर ? "

" होय. चौघांबरोबर ते करतील तसं न करून कसं चालेल ? आपणाला गांवांत राह्यचं आहे ना ? "

आपल्या लेकानें त्या अर्जावर सही केली, हें रामरावाला रुचलें नाहीं. पण सही एकदां होऊन गेली, आतां त्याचें काय ? शिवाय चौघांसारखें वागलें पाहिजे, पाण्यांत राहायचें आणि माशांशीं फटकून वागायचें हें शक्य नाहीं, हेंही तो जाणून होता. तो त्यावर एवढेंच म्हणाला, " सांभाळा बरं ! ही बातमी जर बाहेर फुटली, तर तुम्ही सह्या करणारे तेवढे पहिल्यानं दाढेला जाल. "

" आम्हीं अर्ज चोरून कुठं केला आहे ? पुराव्यानिशीं अर्ज केला आहे. "

" होय. पण तो मास्तरच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांनीं मानला, तर ठीक. त्याला केराच्या टोपलींत जागा मिळाली, आणि नुसताच बोभाटा गांवांत झाला–समज, मास्तरनं टपालांतच तो अर्ज फोडून पाहिला तर ? "

" तेवढी खबरदारी आम्हीं घेतली आहे. तो अर्ज इथल्या टपालांत पडायचा नाहीं; देवगडच्या टपालांत पडेल. "

" ठीक आहे. आतां देव काय करतो पहावं. बरं; आज संध्याकाळीं आपल्याला देसायांच्या वाड्यांत जायला हवं आहे. "

" कशाला ? "

" तो तुमचा सकाळचा झगडा ! सकाळींच तूं तिकडे गेल्यावर चाकरीचा महार येऊन गेला. पण त्यांनीं आमच्याबरोबर जमनाला त्यांत गोंवायचं काय बरं कारण ? "

" तिला देखील बोलावलं आहे ? "

" होय. "

दरवाजाच्या आंतून जमना उत्तरली, " मी येणार नाहीं. प्राण गेला तरी मी तिकडे येणार नाहीं. तो मेला धनी उलथून कां जाईना ? मी यायची नाहीं तिकडे. आणि आल्येंच तर भर चवाठ्यावर त्या मेल्याची खेटरपूजा काढायला कमी करायची नाहीं. मला माहीत आहे, एक महिन्यापूर्वीचा सूड तो मेला आमच्यावर घेऊं पाहातो आहे. " बोलतां बोलतां तिचा कंठ दाटून संताप अनावर होऊन तिला रडूं कोसळलें.

रघुनाथला त्याचा कांहींच उमज पडेना. तो बायको आणि बाप ह्या दोघांच्याही तोंडाकडे टकमकां पाहूं लागला.

" मला बोलूं नका म्हणून सांगून अखेर तूंच बोलून गेलीस ! " रामराव जमनाला म्हणाला.

" काय ? काय ? " रघुनाथ उत्सुकतेनें विचारूं लागला. तो महिन्यापूर्वीचा काजरघाटीवरचा प्रकार त्याला कांहींच माहीत नव्हता.

अखेर होय नाहीं करतां करतां रामरावाला तो प्रकार रघुनाथला निवेदन करावा लागला. रघुनाथ एखादे वेळीं संतापाच्या भरांत या आगळिकीबद्दल धन्याच्या जिवावर संकट आणायलाही कमी करणार नाहीं अशी खात्री असल्यानें रामरावानें शेवटीं त्याच्याकडून तसा कांहीं अतिप्रसंग आपण करणार नाहीं, त्या प्रसंगाची आठवणही कधीं धन्याला देणार नाहीं अशी शपथ घेवविली.

" मी आज दहीबावीला जाणार होतों सावकाराकडे. पण मध्येंच हें लफडं उत्पन्न झालं. आतां आज काय होतं तें पाहूं, मग उद्यां तिकडे जाईन. " रामराव म्हणाला.

" आज काय होणार ? प्राण गेला तरी मी भलत्या गोष्टीला कबूल होणार नाहीं. " रघुनाथ संतापून उत्तरला.

" असं कांहीं करूं नकोस माझ्या बाबा ! भडकलेल्या आगींत आणखी तेल ओतूं नकोस. नाहींपेक्षां असं करूं आपण—तूं धन्यांकडे येऊंच नकोस ना ! मी एकटाच जातों आणि सर्व कांहीं निभावून येतों. तूं दहीबावीला सावकाराकडे मात्र जाऊन ये. कसंही करून दोनशें रुपये तरी द्याच म्हणावं. पावसाळा डोक्यावर आला, या वर्षी घर बांधायलाच हवं. "

पित्राज्ञा सहसा धुडकावून लावायची नाहीं असें रघुनाथचें ब्रीद असल्यानें त्यानें रामरावाच्या सांगण्याप्रमाणें वागण्याचें कबूल केलें. तोंच देवळांतली दोनप्रहरच्या बारांची नौबत झडूं लागली. जमनानें आंतून सूचना दिली, " बारा वाजले, आंघोळीला उठा आतां. "

" नदीवरच जाऊं आंघोळीला. " रघुनाथ म्हणाला.

" मी आज अंमळ आजारी आहें, आंघोळ नाहीं करीत. " रामराव म्हणाला, व नातवाला घेऊन खेळवूं लागला.



रघुनाथ आंघोळीसाठीं नदीवर जाऊन पोहोंचला, आणि आतां पाण्यांत बुडी मारणार, तोंच यशोदा पळसंबकरीण पैलतीरावरून रडत रडत त्याला हांक मारूं लागली, " रघुनाथ ! जरा इकडे येतोस का रे ? "

" कां ? काय काम आहे काकी ? " रघुनाथनें तिथूनच विचारलें.

" बाबू पहा कसंसंच करतो आहे रे ! " यशोदा उत्तरली.

" काय झालं त्याला ? "

" कांहीं विशेष झालं नाहीं. आज पंधरा दिवस तो थोडासा तापखोकल्यानं आजारीच होता. तशांत परवांच्या दिवशीं कुळकर्ण्याच्या वेठीला गेला होता आचऱ्याला. तिथून काल संध्याकाळीं आल्यापासून त्यानं जें आंथरूण धरलं आहे, तो उठला म्हणून नाहीं. तापानं नुसता फणफणला आहे. अंगाला हात लावला कीं निखाऱ्यानं हात भाजल्यासारखं वाटतं. विचारलं तर कांहीं बोलत नाहीं कीं सवरत नाहीं. डोळे कसेसेच चमत्कारिक गरगर फिरवतो, आणि वर आढ्याकडे पाहातो. मला अतिशय भय वाटतं बघ ! "

" औषधपाणी नाहीं केलंस ? "

" कसलं औषध करूं रे माझ्या बाबा ! " असें म्हणून यशोदेनें डोळ्यांना पदर लावला.

" रडतेस काय अशी खुळ्यासारखी ? इतकं त्यांत भिण्याजोगं काय आहे ? असेल श्रमांनीं त्याला थोडा ताप आला. तो उद्यां निघेल. थंडीवाऱ्याचा ताप असेल तो. " असें म्हणून रघुनाथ आंघोळ करण्यासाठीं अंगांतून उतरून बाजूला ठेवलेलें कुडतें पुन्हां अंगांत चढवूं लागला.

" थंडीवाऱ्याचा ताप आहे, कीं येतांना कुठें झपाटला, काय सांगूं? माझी तर अशी समजूत आहे कीं वाटेंत तो भुताचा वड आहे ना? तिथें तो झपाटला असावा. सोन्यासारखा एकुलता एक डोळा माझा —" पुढचे यशोदेचे शब्द अश्रूंत विरघळून गेले.

" चल पाहूं काय तें. " असें म्हणून रघुनाथ तिच्या मागोमाग निघाला.

" इतका बाबू आजारी होता, तर त्याला इतक्या लांब आचऱ्याला वेठीला कशाला बरं पाठविलंस? " रघुनाथनें यशोदेबरोबर तिच्या घराकडे जातां जातां विचारलें.

" पाठवूं नाहीं तर काय करूं माझ्या बाबा? आठ दिवसांपूर्वी असंच एकदां कुळकर्ण्यांनीं त्याला वेठीला बोलावलं होतं. तेव्हांच तो थोडासा कपाळदुखीनं आजारी असल्यानं मीं धन्यांच्या घरीं जाऊन त्यांच्या हातीं-पायीं पडून सांगितलं कीं पुढच्या वेळीं येईल. तों पुन्हा परवां त्यांचं बोलावणं आलं. तेव्हां स्वतः बाबूच धन्यांकडे गेला आणि समजावून सांगूं लागला. पण धन्यांना कांहीं तें खरं वाटलं नाहीं. ते एकदम संतापले, आणि त्याच्यावर उसळून म्हणाले कीं 'आजच्या आज आमची खंडाची बाकी टाक, कर्ज टाक, नाहीं तर ह्या सालीं जमीन तुझ्याकडून काढून तुझ्या भाऊबंदाला देतों. "

" पण आचऱ्याला कसलं एवढं घाईचं काम होतं कुळकर्ण्यांचं? "

" त्यांची नायकीण गेली होती ना आचऱ्याच्या रामनवमीच्या उत्सवाला! ती परत यायची होती. तिला आणायला डोळकरी डोळी घेऊन गेले होते. येतांना देखील बाबूच्या अंगांत ताप फणफणतच होता. अखेर अर्ध्या वाटेवर दुसरा गडी पाहावा लागला. बाबू हळूहळू माघारा आला. मुळींच चालवेना तेव्हां भुताच्या वडाखालीं जरा डोकं टेंकून झोंपीं गेला होता म्हणे. तीन-सांजांची वेळ होती ती, तो भ्याला. आमचं नशीब, दुसरं काय? " असें म्हणून यशोदा पुन्हा डोळे पुसूं लागली.

•

यशोदेबरोबर रघुनाथ तिच्या झोंपडीवजा घराकडे येऊन पोहोंचला, तेव्हां बाबूची तरणीताठी बायको मथू दीनवाण्या मुद्रेनें झोंपडीच्या ठेंगण्या

दरवाजांत उभी होती. ती रघुनाथला पाहून चपळाईनें आंत निघून गेली. तिला माहीत होतें कीं रघुनाथ आपल्या नवऱ्याचा जिव्हाळ्याचा मित्र आहे. तो ज्या अर्थी आला आहे, त्या अर्थी आतां आपणाला काळजी करायचं कारण नाहीं. तो आपला साह्यकर्ता आल्याची वार्ता बाबूला कळविण्यासाठींच ती इतक्या चपळाईनें आंत गेली.

रघुनाथनें दरवाजांतून आंत बाबूच्या बिछान्यापाशीं जाऊन पोहोंचण्यापूर्वींच बाबूचें खोकणें ऐकलें, तो फुटक्या डबड्यासारखा क्षीण आवाज ऐकून त्याच्या छातींत धस् झालें. पूर्वी मुंबईत त्याचा एक स्नेही असाच तापखोकल्यानें आजारी होता. मरणाच्या पूर्व दिवशीं तोही असाच खोकत असल्याचें त्यानें ऐकलें होतें. डॉक्टरनें तेव्हां 'न्युमोनिया' म्हणून सांगितलें होतें. तें रघुनाथला नेमकें यावेळीं आठवलें, आणि मनाला चरका बसला. बाबूला न्युमोनिया झाला असेल काय?

न्युमोनियावर वेळच्या वेळीं उपचार न झाल्यामुळेंच रघुनाथला आपला तो मुंबईचा स्नेही दगावल्याचें डॉक्टरच्या सांगण्यावरून माहीत झालें होतें-

रघुनाथनें भीत भीत आपल्या मनाला विचारलें, "बाबू ह्या जिवा, वरच्या दुखण्यांतून वांचेल काय?"

"काय रे बाबू! तरणाताठा गडी आणि आंथरूण धरून काय बसलास?" असें विचारीत रघुनाथनें बाबूच्या उशापाशीं बसून त्याच्या अंगाला हात लावून पाहिला. तों जणू निखाऱ्याला हात लागल्याचा भास त्याला झाला. इतकें बाबूचें अंग तापानें फणफणलें होतें.

"कितीसा ताप आहे?" यशोदा जवळच केविलवाणी उभी होती. तिनें विचारलें. मथूनें अनाथ आशावादी दृष्टीनें रघुनाथकडे पाहिलें.

"आहे थोडासा. पण थंडीवाऱ्याचा ताप आहे झालं, दुसरं काय?" रघुनाथ म्हणाला.

"हा ताप थंडीवाऱ्याचा नसेल रे! संध्याकाळीं मी घाड्याला कोंबडं ओवाळून टाकायला बोलावलं आहे." यशोदा म्हणाली.

"मी संध्याकाळीं दहीबावला बापटाकडे जाणार आहें, तिथून औषध घेऊन येईन. तोंवर तूं हवी तर आपले मिराशीकाका आहेत त्यांच्याकडे जाऊन ते कांहीं औषध देतातसें पाहा ना!" रघुनाथ म्हणाला.

" हो! आणि येतांना भटजींना प्रश्नही विचारून येत्यें. " असें म्हणून चुलीकडे पाहा असें सुनेला सांगून यशोदा त्याच पावलीं बाहेर पडली. चुलीवर नाचण्यांची आंबील शिजत होती. सकाळींच मथूनें नारायणशेट सोनाराच्या घरचें कांडण करून आणलेला कोंडा भाकरी भाजण्यासाठीं तांब्याच्या फुटक्या पितळींत चुलीसमोर पडला होता.

मथू मातीची कळशी कमरेवर घेऊन बाहेर गेली. आतां तिथें ते दोघेच होते.

बाबू रघुनाथला म्हणाला, " निवलीचा डीक घेतो म्हणजे बरें वाटेल."

" तूं वेडा तर नाहींस बाबू! निवलीचा डीक औषध म्हणून घेतात का? नुसता एक थेंब अंगाला लागला तर कसं फापरं उठतं. आणि तें औषध तूं घेणार म्हणतोस? औषध कसलं वेडया! विष आहे तें." रघुनाथ बाबूच्या मस्तकावरून हात फिरवीत लडिवाळपणें त्याला म्हणाला.

" कां म्हणतों तें माझं मला माहीत. इतके दिवस—मागं दोनदां आजारी पडलों तेव्हां कुठें असं नाहीं म्हटलं तें? माझं मलाच मन सांगतं आहे. इथं औषधाचा कीं कशाचा कांहींच उपयोग व्हायचा नाहीं. कारण माझ्या मनानंच घेतलं आहे कीं आतां मरायचं."

" कां पण? इतका त्रागा कां?"

" त्रागा कां म्हणजे? अरे! मर्दासारखा मर्द मी, आणि त्या दीडदमडीच्या बाजारबसवीनं मला नाहीं नाहीं तें बोलावं?"

" कोण बोलली? तुला नायकीण?"

" नायकीण! कुळकर्ण्यांची नायकीण! तापानं माझं अंग फणफणलं होतं, पाऊलदेखील उचलत नव्हतं माझं. तरीही मी तसाच गेलों, आणि डोळीला खांदाही अर्ध्या वाटेपावेतों दिला. पण पुढें चालवेनाच, डोळ्यांपुढें चकरा येऊं लागल्या. म्हणून म्हटलं, बाई! जरा चालतेस का? त्याबरोबर बाई सापासारखी उसळली. आणि मला म्हणते कीं, काय धाड झाली आहे तुला डोळी चालवायला? मी मुद्दाम ढोंग करतों म्हणाली, आणि वर आणखी मला माझं घर पेंचून हाकलून द्यायची धमकी घालते? मला हाकलून देणारी ही रांड कोण? हिच्या बापाची जमीन मी कसवून खातों का?

तिला माहीत नाहीं, म्हणावं सटवे! तूं ज्याच्या जिवावर इतक्या उड्या मारते आहेस, त्या तुझ्या कुळकर्ण्याला जगवतों आम्ही कुळं! आम्हीं खंडच घातला नाहीं, तर धनी कुठून जगेल आणि ती बया तरी पोटांत कांटे कुठून भरील? वेशीचा महारदेखील मग तिला नाहीं विचारायचा."

बोलतां बोलतां बाबू धापा टाकूं लागला. खोकल्याची उबळ अशी जोराची आली कीं कांहीं क्षण त्याचे डोळे पांढरे झाले.

तोंच त्या झोंपडीच्या मागील बाजूला कुणी तरी खोकल्याचा भास त्याला झाला. तो तसाच उठला व बाहेर गेला.

क्षणभरानें तो आंत आला तेव्हां बाबूनें त्याला विचारलें, "कोण होतं?"

"दाजीबा." रघुनाथ उत्तरला.

"काय करीत होता बाहेर तो?"

"शेळीला चरवीत उभा होता."

"हें पाहा आतां मीं सांगितलं ना, त्याचं प्रत्यंतर. तो एक, आणि तो हरिबा—नव्हे, हऱ्या एक हे दोघे माझे खरे दावेदार आहेत. माझेच काय पण तुझे—साऱ्या गांवाचे दावेदार आहेत हे. इथं जरा कुठें खुट् झालं, कीं गेलीच वर्दी धन्यांकडे. अशी लावालावी करून वाटोळं केलं साऱ्या वाडीचं ह्या गुलामांनीं. वाटतं, जावं आणि एकेकाचा मुद्दा पाडावा गुलामांचा. फांशीं गेलों, बाईल रांडको झाली तरी बेहेत्तर!"

"हळू बोल जरा, तो ऐकेल."

"ऐकूं दे! अगदीं गाढवासारखे लांब कान करून ऐकूं दे." बाबूच्या अंगीं जरी शक्ति नव्हती, तरी तो मुद्दाम मोठ्यानें म्हणाला.

रघुनाथलाही दाजीबा व हरिबा यांची माहिती नव्हती असें नाहीं. बाबू इतका कळवळून बोलला तें खरेंच होतें. सर्वसामान्य शेतकऱ्यांत मोडणारे पण सगळ्यांचा विश्वासघात करून जमीनदारांच्या तंत्रानें नाचणारे असे जे सात आठ लोक त्या लहानशा खेड्यांत होते, त्यांत हे दोघे प्रमुख होते. ते दोघेही जरी शेतकरीच होते, तरी ते स्वतःला धारेकरी म्हणवून घेण्यांत भूषण मानीत असत. ते थोड्याशा प्रमाणांत धारेकरी होतेही. प्रत्येकानें आपल्या मालकीची हजार बाराशें रुपये किंमतीची जमीन नुक्तीच त्याच

वाडींत देसाई व कुळकर्णी यांच्या वतनांतून आपल्या घरांसभोंवार संपादन केली होती. शिवाय प्रत्येकापाशीं दोन सव्वादोन हजारांची जमीन देसाई व मिराशी यांच्या वतनांतील गहाण होती. तीही पुढें मागें खरेदी घेण्याचा त्यांचा विचार होता.

दहाबारा वर्षांपूर्वी याच दोन कुळांना कुळकर्णी व देसाई यांनीं आपल्या वतनांतून हाकलून लावलें होतें; व त्यांना पुन्हा गांवांत तोंड दाखवायलाही जागा नव्हती. तेव्हां ते नशीब काढण्यासाठीं मुंबईला गेले, आणि त्यांनीं नशीब काढलेंही. त्यांतला एक दाजीबा हा मुंबईला जातांच एका सट्टेबाज गुजराथी शेटजीपाशीं घरांत गडी म्हणून दरमहा जेवून खाऊन दहा रुपये पगारावर नोकरीला राहिला. त्या शेटजीचें वय तेव्हां पंचावन्न वर्षांचें होतें, व बंगल्यांत चौथेपणची अठरा वर्षें वयाची तरुण बायको होती. त्या बायकोनें नवऱ्याच्या पैशांची नागवण करून ह्या गुलामाची भर करावी! असा हजारांवारी पैसा दाजीबाला मिळे. तो सट्टा खेळूं लागला, दारू पिऊं लागला, व आणखी नाहीं नाहीं ते ढंग करूं लागला. मालकीण मेल्यावर त्याला गांवीं यावें लागलें तेव्हां त्याच्याजवळ वीस पंचवीस हजारांची तरी माया असती. पण तसें होईल कसें? बिनश्रमांचा पैसा बिनश्रमांनीं जायचा! गांवांत राहायला आल्यावर दाजीबानें आपलें महत्त्व वाढावें म्हणून संगमनाथाला चांदीचें कवच करून दिलें, संगमनाथाच्या पालखीला चांदीचे गोंडे करून दिले, गांवांत पूर्वीच्या जागींच ती जागा खरेदी घेऊन चांगलें टोलेजंग दोन मजली घर बांधलें, थोडासा जमीन-जुमला खरेदी केला, आणि येत्या वर्षी जिल्हा लोकल बोर्डाला तालुक्यातर्फे निवडणुकींत उमेदवार म्हणून उभें राहायचा त्याचा विचार असून त्याला देसाई, कुळकर्णी वगैरे मोडकळत्या वतनदारांचा पाठिंबाही होता. कारण ते त्याचे ऋणको होते व त्याच्यापासून त्यांना जमिनीच्या गहाण खरेदीवर आणखी पैसा उकळायचा होता.

हरिबा मुंबईंत आपल्या परिवारासह गेला, त्यानंतर थोड्याच दिवसांत त्याची व एका बड्या पार्शी दारूमक्तेदाराची ओळख होऊन त्या पारशाच्या पदरीं तो नोकरीला राहिला. पुढें थोड्याच दिवसांत म्हणजे इ. स. १९२१

सालांत मद्यपान प्रतिबंधाची चळवळ मुंबईंत सुरू झाली; व दारूदुकानांवर पिकेटिंग सुरू झालें. त्या वेळीं कांहीं अशिक्षित स्वयंसेवकांना चोरून पैसे चारून व दारू पाजून त्यांच्या कृपेनें दारूदुकानें चोरटेपणानें व्यवस्थित चालविण्यांत हरिबाचा पारशी मालकाला अमोल उपयोग झाला. पिकेटिंगचा जोर कमी होण्याचीं चिन्हें दिसेनात, व पिकेटिंगचे स्वयंसेवक अनत्याचारी वृत्तीनें वागत असल्यानें दारूमक्तेदारांच्या बाजूनें पोलिसांनाही त्यांत हात घालतां येईना, तेव्हां हरिबा स्वतः पांचपंचवीस मवाली हाताशीं धरून कॉंग्रेस कमेटीच्या स्वयंसेवक पथकांत सामील झाला. ते स्वयंसेवक जसजसे निरनिराळ्या गुत्त्यांवर पिकेटिंग करण्यासाठीं पांगले गेले, तसतशी त्या त्या गुत्त्यांवर मारामारीची व भांडणतंट्यांची झुंबड उठूं लागली. त्या मवाली स्वयंसेवकांना हरिबामार्फत दारूदुकानदारांकडून रोजीं रोख आठ आणे मिळत व शिवाय मनमुराद दारूही दिवसा—रात्रीं केव्हां पाहिजे तेव्हां प्यायला मिळे. ते पकडले जाऊन दंड झाला कीं दंड भरायची व्यवस्थाही दुकानदाराकडून होई. याप्रमाणें पिकेटिंगच्या चळवळीचा धुव्वा उडवून अखेर ती चळवळ आवरती घ्यायला कॉंग्रेस कमेटीला भाग पाडण्याच्या कामीं दारूदुकानदारांच्या तर्फेनें बहुमोल कामगिरी केल्याबद्दल त्या दुकानदारांकडून भरपूर पैसा हरिबाला मिळाला, व त्याचा पगारही वाढला. असा बराच पैसा जवळ सांचूं लागल्यावर तो सट्टा खेळूं लागला व दाजीबाप्रमाणेंच पुष्कळसा पैसा सट्टयांत हरवून बसला. त्यांतच एकदां धरपकड होण्याची वेळ आली होती. पुन्हा आणखी कांहीं लफड्यांत स्वारी सांपडली होती. अखेर त्याला जवळची पांचसहा हजारांची पुंजी घेऊन कोंकणचा मार्ग पत्करावा लागला.

पण गांवीं येतांच जसा दाजीबा बुद्रुक ठरला तसाच हरिबाही बुद्रुक ठरला. गांवांत जिथें म्हटल्या वेळीं कोणापाशीं रोख पांच रुपयेही एका रकमेनें सांपडायची मारामार, तिथें प्रत्येकीं पांच सात हजारांची माया घेऊन आलेले हे दोघे मुंबईकर सावकार गणले गेले, तर नवल काय? हरिबालादेखील गांवांत वतनदार म्हणून मिरवायची हौस होतीच. तशांत त्याचा शेजारी जो दाजीबा, त्याच्याहीपेक्षां मोठा माणूस म्हणून मिरवायला त्याला

हवें होतें. त्यानें दाजीबापेक्षां टोलेजंग घर त्याच्याच शेजारीं बांधलें, व जमीनजुमलाही त्याच्या शेजारींच चढाओढीनें विकत घेतला.

आतां हरिबाची एक महत्वाकांक्षा उरली होती. बाबा देसायांनींच त्याच्या अगदीं लहानपणीं त्याच्या विधवा बहिणीला त्यांच्या रानांतून गवत कापून आणतांना पकडून आपल्या शिपायाकरवीं तें गवत जप्त केलें होतें व व चोरीच्या आरोपावरून त्या बाईला चावडींत बसवून तिची फजिती केली होती. त्याची भरपाई करून घेण्यासाठीं हरिबानें देसायांचें वतन थोडें-फार खरेदी केलें होतें. लौकरच त्या गांवच्या देवस्थानची व्यवस्था पाहण्या-साठीं सरकारी हुकुमावरून पंचायत नेमली जाणार होती, त्यावेळीं हरिबाला आपल्या बरोबरीचा पंच करण्याचेंही देसायांनीं कबूल केलें होतें. देवस्थानांत देसायांच्या मांडीला मांडी ठोकून बसण्यानें हरिबाचे सर्व मनोरथ पूर्ण होणार होते! आणि त्याला झुलवून बाबा देसायांनाही त्याचा पैसा उकळायला सांपडणार होता.



"आणखी एक जिव्हाळ्याची गोष्ट सांगणार आहे तुला. कुठें बोलायचा नाहींस ना?" असा विषयांतराचा उपक्रम करून बाबू रघुनाथला सांगूं लागला. "आज महिनाभर मी बारकाव्यानं पाहातों आहें, दाजीबा माझ्या बायकोशीं ओळख करूं लागला आहे. ती एकटी दिसली कीं तिच्याशीं तो लाडीगोडी लावूं लागतो. आणि आई देखील सांगते कीं, दाजीबाचीं लक्षणं कांहीं नीट दिसत नाहींत. तिचा आणि त्याचा कांहीं संबंध असेल का रे?"

"वेडा आहेस तूं! तुझी बाईल त्यांतली मुळींच नाहीं. लोक झक् मारतात. आणि असं पहा, प्रथम आपला आपल्या बायकांवर विश्वास हवा." असें म्हणून रघुनाथनें त्याच दिवशीं त्याच्या कानीं आलेली बाबा देसायांनीं त्याच्या बायकोशीं चवचालपणा केल्याची हकिकत बाबूला सांगून त्याची समजूत घातली, "अरे! हे धनी आम्हां कुळांच्या श्रमांवर चैन करायला सोकावले आहेत, पोळ माजले आहेत पोळ! हरिबा आणि दाजीबा हे तरी त्यांतलेच. आयता पैसा यांना मिळतो, म्हणून हे ढंग यांना सुचतात."

"म्हणूनच म्हणतों, गुलामांचे मुड्दे पाडावे. मी तर दाज्याला ठार करणारच. मग फांशीं गेलों तरी ब्रेहेत्तर!" बाबू आवेशानें थरथरत्या ओंठांनीं म्हणाला.

"खुळा तर नाहींस तूं? अशानं कुठं भागतं? तूं खून केलास तर एक अरेराव आयतखाऊ मरेल खरा; त्याच्या बदला तूं फुकट जिवानिशीं फांशी जाशील कीं! असं नाहीं करायचं. त्यांना आपण मार्गाच्या मार्गानं वठणीला आणायचं. त्यांचं पोट आपल्या हातीं आहे. जातात कुठें ते? त्यांच्याशीं झगडून आम्हां कुळांना आमचं कल्याण करून घ्यायचं आहे; त्यांच्याशीं भलत्याच उपायांनीं झगडून आमचा सत्यनाश करून घ्यायचा नाहीं."

"तें शक्य नाहीं. रघू! तें जगबुडी येईपावेतों शक्य नाहीं. ह्या शिरजोरांचा नायनाट केल्याखेरीज तें शक्य नाहीं."

"सर्व कांहीं शक्य आहे. वर्ष सहा महिन्यांत दिसेल तुला शक्य आहे कीं नाहीं तें. उद्यांची दुनिया तुझ्यामाझ्यासारख्या कष्टाळू शेतकऱ्या–कामकऱ्यांची आहे. ह्या धन्यांना जर उद्यांच्या दुनियेंत जगायचं असलं, तर त्यांनाही आमच्या बरोबरीनं कष्ट करावे लागतील. आम्हीं कुळांनीं मरेमरेतों राबायचं आणि त्यांनीं पायावर पाय डाळून आयतोबांसारखं आमच्या श्रमांचं मोल–आमचं रक्तमांस खाऊन जिवाची चैन करायची, हें यापुढें शक्य नाहीं. जग किती झपाट्यानं पुढें चाललं आहे,–मुंबईंत काय चाललं आहे तुला माहीत आहे? आपण सर्व शेतकरी–कामकऱ्यांनीं एकजुटीनं आपल्या हक्कांसाठीं झगडायला कमरा कसल्या पाहिजेत—कीं चटसारे धनी वठणीवर येतात..." असें आणखी बरेंचसें कांहीं रघुनाथनें बाबूला सांगितलें. तो मुंबईंतल्या चळवळींत मुरलेला असल्यानें, व थोडेंफार लिहिणारा वाचणाराही असल्यामुळें कामकरी–शेतकरी वर्गाच्या पुढाऱ्यांचे असले उद्गार त्याला अगदीं तोंडपाठ झाले होते. त्यांतील रहस्य त्याच्या रोमरोमांत भिनलें होतें.

रघुनाथ आणखीही बोलला असता. पण अजून त्याची आंघोळ व जेवणखाण व्हायचें होतें. नंतर त्याला दहीबावीला सावकाराकडे जायचें होतें. रामरावालाही फणसाबाबतच्या आगळिकीचा जाब देण्यासाठीं बाबा

देसायांकडे जाणें भाग होतें. त्यामुळें रघुनाथनें आपलें संभाषण आवरतें घेतलें, व पुन्हा एकवार बाबूला धीर देऊन तो नदीवर आंघोळीला निघाला. जातां जातां त्यानें दहीबावीहून बापटशास्त्र्याकडून औषध आणायचें मात्र पुन्हा कबूल केलें.

रघुनाथपाशीं अंतःकरणांतली मळमळ ओकल्यावर बाबूला जरी अंमळ हायसें वाटलें, तरी तो गेल्यावर आपली बायको व दाजीबा यांच्याविषयींचे अनेक विकृत विचार त्याच्या मनांत पुन्हा घोळूं लागले, 'दाजीबाच्या श्रीमंतीला भाळून आपली बाईल चळली असेल का ? मी दरिद्री म्हणून माझा तिला कंटाळा आला असेल का ?...'

●

वास्तविक त्या दिवशीं देसायांकडे एकटाच रामराव जायचा होता, व दहिबावीला सावकाराकडे पैसे आणण्यासाठीं रघुनाथनें जायचें ठरलें होतें. पण बापलेक जेवणखाण आटोपून बाबूच्या आजारीपणाबाबत गोष्टी बोलत आंगणांत बसले असतांना चाकरीचा महार पुन्हा बोलवायला आला. त्यानें त्या दोघांनाही पाहिलें, व दोघांनाही—नव्हे, जमनालाही बोलावल्याचें पुन्हा सांगितलें.

"मी येतों. पण तिथं बायकाचं काय काम ?" रघुनाथनें रामरावाला विचारलें.

चाकरीचा महार दूर त्या फणसाच्या झाडाखालीं उभा होता. त्यानें तें ऐकलें व म्हटलें, "अरे ! तुझी बायको देखील पोलिसपाटलाशीं भांडली ना ? मग ती गुन्हेगार नाहीं का ? म्हणून तिलादेखील यायला हवं तिकडे."

'गुन्हेगार' हा शब्द कानीं पडतांच रघुनाथच्या तळपायाची तिडिक मस्तकाला जाऊन झोंबली. जमना घरांत जेवीत होती ती तशीच उष्ट्या हातानें बाहेर आली व रागारागानें म्हणाली, "गुन्हेगार कोण मी ? मीं काय गुन्हा केला ? पोलिसपाटील दंडेलीनं झाड तोडायला आला तेव्हां घरच्या पुरुषांना मीं बोलावून आणलं, हा माझा गुन्हा काय ?"

"बरं ! बरं ! तुला कुणीं विचारलं आहे ? तूं आपली घरांत जा कशी !" अशी दबकावणीची भाषा बोलून रामरावानें जमनाला घरांत

पाठविलें, व महाराला सांगितलें, " चल तूं पुढं. आम्ही येतोंच तुझ्या मागोमाग."

" नाहीं. तुम्हांला पुढं घालून आणायला धन्यांनीं सांगितलं आहे. सारी मंडळी केव्हांची वाट पाहात बसली आहेत." महार उत्तरला.

" मंडळी ? मंडळी कोण आणखी ? " रामरावानें विचारलें.

" गंगाराम आहे, दाजीबा पळसंबकर आहे, हरिबा मयेकर आहे, नारायणशेट आहेत—"

" हे सारे लांडगे एकत्र जमून आम्हां कोंकरांचा न्याय करणार काय ? " असें रघुनाथ म्हणतो न म्हणतो, तोंच रामरावानें त्याच्या तोंडावर हात ठेवून तोंड बंद केलें, व महाराला पुन्हा सांगितलें, " तूं चल पुढं. जरा गुरांना पाणी दाखवून येतों."

" नाहीं. तुम्हांला पुढं घालून यायला गंगारामनं सांगितलं आहे." महार म्हणाला.

रघुनाथचा संताप अनावर झाला. तो एकदम उठून उसळून उद्गारला, " गंगारामला सांग जा येत नाहीं म्हणून. तुला काय करायचं तें कर म्हणावं ! आमची आगळीक करून पुन्हा आम्हीच गुन्हेगार काय ? त्या भावणीच्या पोराला काय वाटतं, पोलिसपाटील झालों म्हणजे आपले गगनाला हात लागले असं ? त्याला म्हणावं, तुझी पोलिसपाटीलकी औट घटकांची आहे. आज आहे आणि उद्यां नाहीं. उद्यां प्रसंग आमच्याशींच आहे. असा गांवाविरुद्ध वागशील तर याद राखून ठेव. —तुला त्यानं धरणं धरून बसायला पाठविलं आहे का ? "

" [illegible]." महार उत्तरला.

" [illegible] मग बैस तिथं. तूं चालता होईतों आम्ही मुळींच येणार नाहीं. आम्हीं [illegible]हीं कुणाचा गुन्हा केला नाहीं आमच्या दारीं धरणं धरून बसायला."

" तें मला काय सांगतोस ? तिथें येऊन पंचांना सांग आणि धन्यांना सांग. मी काय, सांगितलेल्या कामाचा चाकरीचा महार ! " असें म्हणत

महार तिथून हिरमुसल्या तोंडानें निघून गेला. परंतु जातांना तो रामरावाकडे पाहून लौकर ये असें पुन्हा बजावून सांगायला विसरला नाहीं.

बाबा देसायांचा वाडा नदीपलीकडे सुमारें दोन हांकांच्या अंतरावर होता. तिथवर जाईपावेतों त्या बापलेकांत आणखी महत्त्वाचें असें कांहींच संभाषण झालें नाहीं. वाड्याच्या अंगणांत जातांच मात्र रामरावानें आंत पाऊल ठेवण्यापूर्वीं आंगणांत रावसाहेब देसायांची समाधि होती तिला स्वतः नमस्कार केला व रघुनाथला म्हटलें, "समाधीला नमस्कार कर. आणि हें पाहा, आंत गेल्यावर भलतंच कांहींतरी अचावचा बोलूं नकोस."

रामराव तर बोलून चालून देवभोळा होता. रघुनाथचाही देवावर विश्वास नव्हता असें नाहीं; पण एकंदरींत कमी. तो वर्तमानपत्रें वगैरे वाची. हिंदुमुसलमानांच्या दंग्यांत आज काय मुसलमानांनीं हिंदूंचा अमका देव फोडला, उद्यां काय तमकें देऊळ भ्रष्ट केलें, अशा बातम्या अनेकदां त्याच्या कानावरून गेल्या होत्या. त्या देवांना भ्रष्ट करणाऱ्या मुसलमानांचें देवांच्या कोपामुळें कुठें कधीं वांकडें झालेलें त्याच्या पाहण्यांत नव्हतें. त्याप्रमाणेंच मुसलमानांची मशीद अथवा दर्गा यांवर हल्ला केल्यामुळें मुसलमानांच्या देवानें हिंदूंचेंही कांहीं अकल्याण केलें नव्हतें. त्यावरून देव म्हणजे पोलिस अधिकारी अथवा हिंस्त्र पशू नव्हे हें त्याला माहीत झालें होतें. तशांत देसायांच्या आंगणांतली ती समाधि म्हणजे तर रावसाहेब देसायांचें—बाबा देसायांच्या संन्यासी वडिलांचें थडगें. रावसाहेबांनीं मरणाच्या पूर्वदिवशीं संन्यास घेतल्यामुळें—अथवा बाबांनीं त्यांना मरणघडीला बेशुद्ध असतांना संन्यास दिल्यामुळें ते एकदम चोवीस तासांत मनुष्याचे देव झाले होते! रावसाहेबांचें सारें आयुष्य पाहिलें तर तें छानछोकींत, ऐषआरामांत व कज्जेदलालींत गेलेलें. संगमनाथावर लोकांना दाखवायला रावसाहेबांची भक्ति इतकी अढळ कीं, रोज स्नान करून संगमनाथाचें दर्शन घेऊन त्याची पूजा केल्याखेरीज व त्याला एकशेंआठ प्रदक्षणा घातल्याखेरीज ते कधीं अन्नग्रहण करीत नसत. पण आंतून देवस्थान असें लुटून खात कीं ज्याचें नांव तें! देवसेवा करणारी भावीण त्यांच्या वशिल्याची—लाग्याबांध्याची असल्यानें ती देवळांतला केरकचरा मुळींच काढीत नसे. देवाच्या नंदादीपांतील तेल मात्र पुजाऱ्याशीं

दोस्ती करून चोरून खात असे. तिची व रावसाहेबांची पहिली 'ओळख' देवळाच्या माडीवरच झाली होती. तरी देवानें तिचें काय वांकडें केलें होतें ! त्या बिचाऱ्या संगमनाथाला हात-पाय-डोळे-वाचा कांहींच नसल्यामुळें त्याला 'ठेविलें देसायें तैसेंची रहावें; चित्तीं असूं द्यावें समाधान' या न्यायानें समाधानवृत्तीनें राहावें लागत असे. तोच क्रम रावसाहेबांच्या चिरंजीवांनींही चालविला होता.

आणि असल्या सर्वगुणसंपन्न रावसाहेबांची ती समाधि ! तिची देवस्थानच्या पुजाऱ्यानें देवस्थानाकडील पगारांत रोज पूजाअर्चा करायची, आल्यागेल्यानें त्या समाधीसमोर मस्तक नमवायचें आणि प्रार्थना करायची कीं, 'देवा ! माझें बरें कर !'

रघुनाथनेंही रामरावामागोमाग त्या समाधीला नमस्कार केला. पण नमस्कार करतां करतां त्याच्या डोक्यांत विचार घोळत होते, 'उभ्या जन्मांत ज्यानें कधीं कोणाचें बरें केलें नाहीं, गरीब शेतकऱ्यांना परोपरीनें पिळून काढलें, त्याला नमस्कार करायचा तो त्यानें आपलें आणखी वाटोळें करूं नये एवढयासाठींच ना ? कुणाचें बरें करायचें सामर्थ्य जर या माणसाच्या अंगीं असतें, तर दुनियातींत त्यांनीं कुणाचें बरें केलें नसतें का ? जिवंतपणीं जें त्यांनीं केलें नाहीं तें आतां त्यांचा मुडदा करणार !'

विचार करतां करतां रघुनाथ रामरावामागोमाग आंत देसायांच्या दिवाणखान्यांत गेला मात्र, आणि त्या क्षणीं बाबा देसायांनीं त्यांच्यावर एकेक डोळा लिंबाएवढा वटारला.

"तुम्हांला बोलावण्यावर बोलावणीं पाठवावीं लागतात, इतके माजलां काय रे ?" रामरावानें लवून नमस्कार केला, त्यांच्या मागोमाग रघुनाथनेंही नमस्कार केला, तिकडे लक्ष दिलें न दिलेंसें करून बाबांनीं अधिकाराच्या तोऱ्यांत उलट्या मांडीची सुलटी मांडी घालीत व तंबाकूची चिमुट तोंडांत टाकीत विचारलें.

●

रामरावानें बाबांना, इतर मंडळीना, समोर गंगाराम देवळी बसला होता त्यालाही–पोलिसपाटील म्हणून मोठ्या नाखुषीनें रामराम केला. त्याचें पाहून

रघुनाथनेंही बाबांना फक्त रामराम केला. गंगारामनें दराऱ्यानें त्याच्याकडे पाहिलें, पण त्यानें तिकडे लक्षच दिलें नाहीं. बाकीचे सर्वजण तर बाजूलाच राहिले.

केवढा मोठा तो दिवाणखाना होता! तिथें एवढी मोठी बैठक, इतके लोडतक्के असतांनाही कुळांना बैठकीबाहेरच्या मोकळ्या जमिनीवर एका कोंपऱ्यांत दाराशीं बसावें लागे.

गंगाराम देवळी, नारायणशेट सोनार, दाजीबा व हरिबा हे बैठकीवर बसले होते. पण लोडतक्याशीं मात्र नव्हेत.

मग ते लोडतक्के कुणासाठीं ?

रामराम करून झाल्यावर बापलेक दोघे बैठकीबाहेरच्या मोकळ्या जमिनीवर आदबीनें उकिडवे बसले. बाबांच्या खस्याळ प्रश्नावर रामराव उत्तरला, " थोडा उशीर झाला आम्हांला. —हा रघु गेला होता तिकडे बाबू पळसबंकर आजारी आहे त्याचा समाचार घ्यायला. "

" मग ? बाब्या मेला कीं जिता आहे ? " बाबांनीं पिकदाणींत पानसुपारीची पिंक थुंकतां थुंकतां विचारलें. तें ऐकून दाजीबा, हरिबा व गंगाराम देवळी हंसले. नारायणशेटही गालांतल्या गालांत हंसला. रामरावाची चर्या मात्र गोरीमोरी झाली, व रघुनाथचें अंतःकरण तर चांगलेंच थरारलें. तो मनांत म्हणाला, " ही धन्याला कुळांविषयीं वाटणारी कळकळ ! आणि तरीही कुळांनीं मात्र धन्यासाठीं स्वतःचा जीव गहाण ठेवावा ! "

" तुम्ही अलीकडे फार माजलां आहां नाहीं रे ? " बाबांनीं दुसरा प्रश्न विचारला. बाकीच्या सर्वांनीं संमतिदर्शक मुद्रा करून एकमेकांकडे पाहिलें. त्यांतल्या त्यांत गंगरामची रघुनाथकडे वेधली गेलेली दृष्टि विशेष मर्मभेदक होती. जखमी झालेला डुकर शिकाऱ्याकडे जसा रागानें रोंखून पाहातो, तसं तेव्हां गंगारामनें रघुनाथकडे रोंखून पाहिलें.

" धनी ! काय चूक झाली आमच्या हातून ? " रामरावानें दोन्ही हात जोडून नम्रपणें विचारलें.

" काय झाली चूक ? बेशरम ! हरामखोर ! गेलीं दोन वर्षं तुझे रंगढंग पाहातों आहें मी. वृंदावनचा तूंच मालक झालास काय ? " बाबांनीं अप-

शब्दांची पुन्हां फैर झाडली. रघुनाथचें तरुण रक्त ती शिवीगाळ ऐकून सळसळूं लागलें.

रामरावाच्याही मनाला ते शब्द झोंबले. पण त्याला माहीत होतें कीं जुगारांत हरलेल्या व कौरवसभेंत जित म्हणून पक्षपाती गुरुजनांसमोर उभे असलेल्या पांडवांसारखी आपली अवस्था आहे. म्हणून तो शांतपणें सर्व अपमान गिळून म्हणाला, " नाहीं धनी ! आम्ही तुमच्या पायांचे चाकर आहों. तुमच्या अन्नावर जगणारीं तुमचीं लेंकरं आहों आम्ही. "

" म्हणूनच काल आमचा शिपायी फ़णस काढायला आला असतांना त्याला हरकत केलीस वाटतं ? " बाबा स्वर चढवून म्हणाले.

" हरकत नाहीं केली सरकार ! " रामराव पूर्ववत् नम्रपणें उत्तरला.

" हरकत नाहीं केलीस ? तूं आणि तुझा हा मगरूर पोर—दोघांनीं हरकत नाहीं केली बापूला आमच्या ? " बाबांनीं पुन्हा विचारलें.

" आणि आज सकाळीं काय केलं तुम्ही तिघांनीं ? " गंगारामनें मध्येंच प्रश्न केला.

" पोलिसपाटलांना त्यांच्या कामांत अडथळा करणं हा फौजदारी गुन्हा होतो तुला माहीत आहे ना, रघ्या ? " बाबांनीं विचारलें.

" पण आम्हीं तसा अडथळा केला नाहीं सरकार ! " रामराव पुन्हा जोडल्या हातांनीं म्हणाला.

" हरामखोर ! खोटं बोलतोस ? तुझ्या ह्या पोरानं माझ्या अंगावर हात टाकला कीं नाहीं ? " गंगारामनें उसळीसरसें हटकलें.

" होय. मीं याच्या अंगावर हात टाकला खरा. पण कां हात टाकला; त्यालाच विचारा ना ? " रामराव हातानें न बोलण्याची खूण करीत होता, तरी तिकडे लक्ष न देतां रघुनाथ म्हणाला, " आम्हांला न विचारतां न सवरतां आमच्या दारांतलं आम्ही जिवाच्या जतेनेनं लावून वाढवलेलं हातझाड हा तोडूं लागला—"

" झाड तुमचं ? तुमच्या बापाचं झाड ! इतके मगरूर झालां काय रे ? गंगारामला मीं झाड तोडायला सांगितलं होतं. त्याला तूं आणि तुझी बाईल—कुठें आहे ती ? "

" तिचं इथं काय काम ? तिच्या वांटणीचं काय डोचकं माराल तें मारून घ्यायला मी इथं आलों आहें ना ? मला करा काय शिक्षा करायची ती. " रघुनाथ छाती पुढें काढून रागीट मुद्रेनें पाहात म्हणाला.

रघुनाथचे हे आवेशाचे उद्गार कानीं पडतांच चोराची खूण चोरानें ओळखली. नांगी तुटलेल्या विंचवासारखी बाबांची अवस्था झाली. ते त्याच्याकडे पाहायचें देखील सोडून रामरावाकडे वळून म्हणाले, " हें पाहा रामजी ! तुझ्याकडे पाहून मीं आजवर गय केली. पण आतां हें प्रकरण कांहीं एकट्या माझ्या हातीं नाहीं. गंगाराम परस्परच तुमच्यावर फौजदारी करणार होता. पण माझं कुळ माझ्या डोळ्यांदेखत तुरुंगांत जावं यांत मला कमीपणा आहे, म्हणून मीं हा वाद तोडायचं ठरवलं आहे. बऱ्या बोलानं तुला ही भानगड मिटवायची आहे कीं आणखी पेटवायची आहे ?"

" भानगड पेटवून काय करायची सरकार ? " रामराव सर्वांना हात जोडून म्हणाला, " मी गरीब माणूस. तुम्ही सारे काय न्याय कराल तो मला क़बूल आहे."

" आम्ही न्याय करूं तो तुला कबूल आहे ? " दाजीबानें विचारलें. तेव्हांच त्यानें चमत्कारिक नजरेनें एकवार रघुनाथकडे व पुन्हा बाबांकडे पाहिलें. रघुनाथनेंही त्याच्याकडे पाहिलें व ओळखलें कीं दोनप्रहरीं आपलें व बाबूचें जें संभाषण झालें, त्याची बातमी धन्यांपावेतों या चुगलखोरानें आणून पोंचविली खास.

" आमचा न्याय तुला कबूल असेल तर आम्ही सांगतों ऐक. पहिली गोष्ट, तूं आजच्या आज या बैठकीला धन्यांना एकसाली कबुलायत द्यावी. दुसरी गोष्ट, फणस फौजदाराला विनाहरकत तोडूं द्यावा. आणि तिसरी गोष्ट, धन्यांची व फौजदाराची माफी मागून दंडादाखल देवाला पांच शेर साखर द्यावी. " दाजीबानें नारायणशेटींकडे वळून विचारलें, " काय शेटजी ! हें बरोबर आहे ना ? "

" अगदीं बरोबर " नारायणशेट उत्तरले.

" हरबा ! तुमचं मत काय ? " बाबांनीं विचारलें.

"माफी मागायची ती देवळांत, जाहीरपणें, व धनी आणि फौजदार या दोघांचीही मागितली पाहिजे. माफी मागून मग त्याला जमीन सोडून द्यायची असेल तर मागील खंडबाकी चुकती करून त्यांनीं ठिकाण सोडून कुठेंही निघून जावं." हरिबा उत्तरला. त्याला साधल्यास वृंदावन खरेदी, निदान गहाण, निदान खंडानें तरी मिळवायचें होतें.

"जमीन आम्ही कशी बरं सोडूं धनी? आम्ही इतक्या पिढ्या जिच्या दुधावर जगलों, ती आमची आई–!" पुढें रामरावाच्यानें बोलवेना. त्याचा कंठ दाटून आला. तो खरा शेतकरी होता. त्याला आपल्या जन्मदात्या आई-इतकाच जन्मभूमीचा अभिमान होता. कारण त्याच्या कैक पिढ्यांनीं व त्यानेंही ती जमीन नांवारूपाला आणण्यासाठीं आपलें आयुष्य खर्ची घातलें होतें. तो अंमळ उसंत खाऊन पुढें म्हणाला, "धन्यांनीं फणस देखील आम्हांला विकत दिला तर आम्ही घेऊं."

"पण तो तुला विकत द्यायची आमची इच्छा नाहीं. तो एकदां दिला तो दिला." बाबा म्हणाले.

"तर मग तो धन्यांनीं तोडवला तरी माझी कांहीं हरकत नाहीं. पण जमीन मात्र आमची आमच्याकडे असावी. पाहिजे तर खंडांत थोडा वाढावा आमच्याकडून घ्या. करणार काय, दिला पाहिजे. पण जमीन माझी माझ्याजवळ राहूं द्या." रामराव म्हणाला.

"तर मग अगोदर कबुलायत देऊन मोकळा हो कसा झटकन्! खंडाचं मगचं मग पाहूं आपण." बाबा साळसूदपणें म्हणाले.

"बस्स! कबुलायत देऊन तूं मोकळा हो, कीं आम्ही करतों गंगारामची समजूत." हरिबा व दाजीबा एकदम म्हणाले. नारायणशेटनेंही त्यांना दुजोरा दिला.

रामरावानें हळूच रघुनाथला घरीं निघून जायचा इशारा दिला. त्याबरोबर रघुनाथ जरा इकडे तिकडे रेंगाळल्यासारखें करून बाहेर निघून गेला. त्याला दहीबावीला सावकाराकडे जायचें होतेंच.

"कबुलायत द्यायला माझी मुळींच हरकत नाहीं धनी. मी तुमची मागील बाकी पूज्य करीन आणि मग कबुलायत देऊं कीं! कबुलायतीचं

एवढं काय मोठंसं? इतक्या पिढ्या जमीन तुमची आमच्याकडे आहे, कधीं खंडाबाबत अथवा कशाबाबत वांधा उत्पन्न झाला आहे का? वचनापलीकडे कबुलायतीची काय किंमत?" रामराव म्हणाला.

"मला कबुलायतीची गरज नाहीं रे! पण आम्हांला तें शेत विकायचं आहे. खरेदीपत्र करतांना व्यवहार चोख नकोत का?" बाबांनीं म्हटलें.

नारायणशेटचा त्या जमिनीवर डोळा होताच. अलीकडे त्यानें पांचशें रुपये प्रॉमिसरी नोटीवर बाबांना दिलेच होते, व जरूर पडल्यास आणखी हजार रुपये द्यायचेंही त्यानें कबूल केलें होतें. त्या मोबदला तें ठिकाण खरेदी मागण्याचा नारायणशेटचा विचार होता. परंतु त्याला झाला तरी जमिनीचा कबजा कुळापासून कसा मिळवायचा हा पेंच होताच. त्यासाठीं रामरावाला सांपळ्यांत कोंडून त्याच्यापासून कबुलायत मिळवायची त्याची धडपड चालली होती. त्यानें बाबांनाही सांगितलें होतें कीं, कुळाची कबुलायत द्या; एरव्हीं कांहीं ठिकाण खरेदी घ्यायला आपली छाती होणार नाहीं. म्हणून बाबा तरी इतकी धडपड करीत होते.

हा डाव रामरावाच्या ध्यानीं कसा येणार? तथापि त्याला एवढें कळत होतें कीं, आतां आपण धन्यांना कबुलायत दिली कीं ठार झालों. नवीन धनी कोण येईल तो खंड वाढवील, आणि तो वाढावा आपण कबूल केला नाहीं तर तो धनी आपणाला काढून टाकून आपल्या जागीं नवीन कूळ लावील. मग आपण ही आपली जन्मभूमि—ही इतक्या पिढ्यांची शेतकी सोडून कुठें जायचें?

पण कबुलायत देत नाहीं असें तरी कोणत्या तोंडानें सांगावें? तें ओळखूनच त्यानें टोलवाटोलवी करण्याचें साधन म्हणून रघुनाथला बाहेर निघून जायला खुणावलें होतें. तो म्हणाला, "बरें आहे. मी लेंकाला विचारीन आणि तुम्हांला काय तें सांगेन कबुलायतीविषयीं."

"तें कांहीं जमायचं नाहीं. आतां या बैठकीला काय व्यवहार तुटेल तो. आमची बाकी तूं मागाहून दे पाहिजे तर. पण कबुलायत आज झालीच पाहिजे." असें म्हणून बाबा कबुलायतीसाठीं कागद काढूं लागले.

आतां ह्या पेंचांतून कसें निभावून जावें हें रामरावाला कांहीं कळेना. तो कुचंबल्यासारखा झाला.

रामरावाचा देवावर विश्वास होता. त्यानें मनांतून देवाचा धावा केला. तोंच देवानें पाठवल्यासारखा दत्तू हिर्लेकर तिथें येऊन रामरावाला म्हणाला, "रामजीबाबा! घरीं चल लौकर."

"कशाला रे?" गंगाराम देवळ्यानें त्रासून त्याला विचारलें.

बाबाही म्हणाले, "त्याचं इथं काम आहे. तो इतक्यांत येणार नाहीं."

दत्तू हिरमुसली चर्या करून म्हणाला, "बाबू पळसंबकर वारला. त्याला मसणांत पोंचवायला हवं."

बाबू वारल्याचें कानीं पडतांच बाबांखेरीज सर्वजण आपल्या मनांत म्हणाले, 'याला म्हणावं बाबांची दांतकसर.' सर्वांच्या मनांत एकदम तोच विचार यायचें कारण, नुक्तेच बाबा बाबूविषयीं अभद्र शब्द बोलून गेले होते.

"चल, मी आलों." असें म्हणून रामराव कांबळें घेऊन निघाला.

"अरे! एवढी कबुलायत पुरी करून जा कीं! तो मेला, आतां घटका अर्ध घटकेच्या उशीरानं आणखी थोडाच मरणार आहे?" बाबा म्हणाले.

पण रामरावानें तिकडे लक्ष दिलें नाहीं. तो दत्तूमागोमाग निघून गेला. बाबांसह बाकीच्या सर्वांना मात्र मनांतून राग आला, 'ही पिडा मरून मरायचीच, ती आणखी चार घटका उशीरां मरती तर?'



त्या दिवशीं—बाबू वारला त्या दिवशीं बाबांच्या घरची बैठक जी मोडली, ती पुन्हा म्हणून जमली नाहीं. रामराव आज कबुलायत देईल, उद्यां देईल, परवां देईल, अशी बाबांनीं चांगली तीन दिवस वाट पाहिली; आणि मग गंगारामनें, आपल्या 'सरकारी' कामांत अडथळा केल्याबद्दल व आपणाला पुष्कळ मारल्याबद्दल रघुनाथ, रामराव व जमना या तिघांवरही फिर्याद केली. दत्तू, सखाराम, नारू व धाकू हे फणस तोडायला गेलेले चौघे गडी गंगारामच्या वतीनें साक्षीदार म्हणून पुढें झाले. सुमारें तीन आठवडे रघुनाथ कच्च्या कैदेंत होता. रामराव व जमना यांची मात्र मोठ्या मिनतवारीनें जामिनावर सुटका झाली होती; व तीही बाबांच्या खटपटीनें. त्यांत जमना नसती तर बाबा तरी इतकी खटपट कशाला करते? अखेर जमना निर्दोषी ठरून सुटली. रामरावाला पन्नास रुपये दंड झाला. आणि रघुनाथ

मुख्य गुन्हेगार म्हणून त्याला तीन महिन्यांची सक्त मजुरीची शिक्षा झाली. तरीही गंगाराम व बाबा यांचें तेवढ्यानें समाधान झालें नाहींच. इतकी खटखट केली त्यासारखी निदान सहा महिन्यांची तरी शिक्षा त्याला व्हायला हवी होती. गंगारामचा मानस पाहूं गेल्यास रघुनाथला वर्ष दोन वर्षांची शिक्षा व्हावी, व त्याची बायको आणि रामराव यांनाही थोडे दिवस तरी तुरुंगाची हवा चाखणें भाग पडावें अशी होती. पण देवगडच्या तेव्हांच्या मामलेदाराला अधिकारच मुळीं अधिकांत अधिक सहा महिन्यांची शिक्षा देण्याचा होता. तेवढी सर्व शिक्षा तरी मामलेदारानें रघुनाथला द्यावी म्हणून बाबांनीं वशिले लावलावून शिकस्त केली. मामलेदाराकडे केळ्याचे घड पाठविले, कोवळीं शहाळीं पाठविलीं, आपल्या बागेंतल्या फणसांचे इरसाल फणस पाठविले, म्हणून तर रघुनाथ व रामराव यांना इतकी तरी शिक्षा झाली. एरव्हीं तीही कदाचित् झाली नसती. गंगारामनें धाकू, सखाराम, नारू व दत्तू यांना साक्षीदार म्हणून पुढें केलें खरें. पण त्यांनीं साक्ष खरी ती दिली. त्यांना भय गंगाराम व बाबा यांचें असलें तरी त्यांचा खरा ओढा रघुनाथकडे होता. त्यांच्या साक्षींत रघुनाथवर प्रथम गंगारामनें हात टाकला, व मग रघुनाथनें त्याच्यावर हात टाकून त्याच्या श्रीमुखांत दिली, असें आलें. पण रामरावनें मारामारी केल्याचें मुळींच आलें नाहीं. आणि जमना तर तिथें त्या वेळीं नव्हतीच असें साक्षीदारांनीं स्पष्ट सांगितलें.

त्यामुळें मूळच्या फिर्यादींतील सजीव निर्जीव तक्रारींपैकीं फिर्यादी, आरोपी व साक्षीदार यांच्या नांवाखेरीज त्या फिर्यादींत आणखी जवळजवळ कांहींच बाकी राहिलें नाहीं.

धोपाटे वकिलाचा व गंगाराम आणि बाबा या दोघांचाही त्या खटल्यांतील अंदाज चुकला. साक्षीदारांच्या साक्षींवरून मारामारी प्रथम गंगारामनेंच केल्याचें शाबीत होऊं लागलें, व गंगाराम सरकारी कामासाठीं तिथें गेला होता हें मुळींच शाबीत झालें नाहीं. फिर्यादीचा पांचवा साक्षीदार म्हणजे गांववैद्य मिराशीबाबा. हे देवस्थानच्या खटल्यांत बाबांच्या विरुद्ध पक्षांत सामील होते खरे. पण आपण धारेकरी व रघुनाथ हा कुळांचा म्होरक्या, त्या अर्थी असल्या म्होरक्याला तुरुंगांत लोटून कुळांची खोडकी जिरवण्यासाठीं सर्व धारेकऱ्यांनीं आपसांतील मतभेद विसरून एवढ्यापुरती

तरी एकजूट केलीच पाहिजे, या तत्त्वावर ते गंगारामच्या बाजूनें साक्ष देण्याला उभे राहिले.

मिराशीबाबा म्हणजे या बोटावरची थुंकी बेमालूमपणें त्या बोटावर करून दाखविण्यांत निष्णात, आणि युक्तिबाजपणांत वकिलाचाही बाप लागून गेलेले. पण त्यांचीच साक्ष खरें पाहतां गंगारामच्या अंगाशीं आली. फणस तोडायला गेलेल्या चौघां गड्यांनीं सांगितलें कीं विशेष मारामारी झालीच नाहीं. फिर्यादीनें सांगितलें कीं आपल्या मानेवर उजव्या बाजूला आरोपीनें कोयत्यानें भयंकर स्वरूपाची जखम केली, व मिराशीबाबांनीं औषधोपचार करून तीं जखम बरी केली, आणि मिराशीबाबांनीं सांगितलें कीं फिर्यादीचा कोथळा बाहेर आला होता, तो आपण त्याला वनस्पतींचा काढा व लेप देऊन बरा केला. त्यांचा वकीलही हुषार होता. मामलेदार केळीं—शहाळीं खाऊन मिंधे झालेले होते. मग भय कसलें?

पण रघुनाथचा बोलभांडे वकील फिर्यादीला प्रथम नडला. वकील होता अगदीं नवखाच; पण नांवाप्रमाणेंच बोलभांड व चतुर होता. त्यानें सर्व पुरावा हंसत खेळत फिर्यादीवरच उलटविला. गंगारामनें कोयत्याचा वार आपल्या मानेवर झाल्याचें सांगितलें होतें, आणि मिराशीबाबांनीं फिर्यादीचा कोथळा बाहेर आलेला काढा व लेप या उपायांनीं बरा केल्याचें सांगितलें होतें. बोलभांडे वकीलांनीं उलटतपासणींत मिराशीबाबांची भंबेरी उडविली. तरीही उलटींसुलटीं उत्तरें देऊन खऱ्याचें खोटें करण्यांत वाकबगार असलेले मिराशीबाबा डगमगले नाहींत. कोथळा बाहेर आलेला बरा करण्याजोगा काढा व लेप 'घरच्या वैद्यांत' असल्याचें मिराशीबाबा प्रथम म्हणाले. तें विधान जरी त्यांच्या अंगाशीं आलें, तरी त्यांनीं दुसराच एक काढा सांगितला, व त्या काढ्याचे हेही गुणधर्म आपल्या नजरेला नवीन आले असून लेपही नवीनच असल्याचें, त्याप्रमाणेंच ह्या उपायानें आपण पशुपक्ष्यांपासून माणसांपावेतों कितिएकांच्या जखमा बेमालूम बऱ्या केल्याचें सांगितलें. आपण एकशेंआठ वनस्पतींच्या एका जातीच्या सुवर्णपुटी गुटिका बनविल्या असून त्या कसलाही प्राणांतिक घाव बरा करण्यांत रामबाण आहेत, त्या गुटिका आपण गंगारामला दिल्या,

त्या गुटिकांची कृति अत्यंत महत्त्वाची असल्यानें व तें आपलें धंदेवाईक गौप्य असल्यानें तें आपण प्रगट करूं शकत नाहीं, असेंही त्यांनीं सांगितलें.

पण मिराशीबाबांनीं गंगारामचा कोथळा बाहेर आल्याचें सांगितलें होतें. गंगाराम मानेवर उजव्या बाजूला प्राणान्तिक जखम झाल्याचें बोलून गेला होता. आणि बोलभांडे वकिलांनीं जखमेची माव कुठें आहे असें गंगारामला विचारलें तेव्हां त्यानें माव दाखविली ती उजव्या गालावरची ! आणि तीही सहा सात वर्षांपूर्वी—तो पोलिसपाटील झाला नव्हता तेव्हां दारूच्या धुंदींत मारामारी केल्या वेळची !

इतकी जरी फिर्यादीची फिर्याद कोलमडली, आणि बोलभांडे वकीलही गंगाराम व मिराशीबाबा यांच्यावर प्रतिज्ञेवर खोटे बोलल्याबद्दल रुकार मागण्याच्या गोष्टी तिथल्या तिथें बोलूं लागला, तरी अखेरच्या तारखेला रघुनाथला तीन महिन्यांची शिक्षा झालीच ! कारण गंगारामनें बोलभांडे वकिलाला रोख पंचवीस रुपये खाजगी रीत्या देऊन व मिराशीबाबांनीं यापुढें आपले सर्व खटलेखोकले त्याच्याकडे द्यायचें कबूल करून त्याला आपल्या बाजूला वळवून घेतलें होतें ! त्यानें रामरावाचे कान भीतीनें भरवून दिले 'मामलेदारसाहेब तुमच्याविरुद्ध आहेत. तूं माफी मागशील तर थोड्याशा दंडावर सुटशील, आणि तुझ्या मुलालाही सोडवण्याचा प्रयत्न मी करीन. नाहींपेक्षां सेशनांत खटला गेला तर कमींत कमी सहा सात वर्षांची तरी शिक्षा तुझ्या मुलाला होईल, आणि—त्याचा काय नेम ? तुझ्यावर व तुझ्या सुनेवरदेखील थोडीशी तरी बाजू शेकेलच.'

म्हातारा भ्याला आणि लेकाला न सांगतां न सवरतां, दुसऱ्या दिवशीं गुपचुप लेखी माफी मागून गुंतून पडला. त्यामुळें आयतीच गुन्ह्याची शाबिती झाली. इकडे बाबांनीं आपल्या वकिलामार्फत मामलेदाराच्या कानांत असें भरवून दिलें, 'रघुनाथ व रामराव हे काजरोळी गांवांतील पहिल्या नंबरचे बदमाष आहेत. ते मुंबईकडून बंडखोर 'लाल बावटा' चळवळीचें लोण घेऊन इकडे आले आहेत. तिकडे गिरणीकामगार मुंबईत गिरणीमालकांना पदोपदीं संप करून नाडतात, तसा आम्हां जमीनदारांना नाडून सरकारसाऱ्याला खो देण्याचा या लोकांचा इरादा आहे.

यांचा बंदोबस्त जर वेळींच झाला नाहीं, तर हे लोक व सर्व कुळें मिळून आम्हांला तर धुळीला मिळवतीलच; पण—' मामलेदार देखील मालवण तालुक्यांतले एक खोत आहेत हें धोपाटे वकिलाला माहीत असल्यानें त्याचा फायदा घेऊन त्यानें आणखी पांडित्य केलें, 'साहेब! आपणही एक जमीनदार व खोत आहां. कुळांचा हा बंडावा जर वेळच्या वेळीं मोडण्यांत आला नाहीं, तर ही आग हां हां म्हणतां साऱ्या रत्नागिरी जिल्ह्यांत भडकायला वेळ लागायचा नाहीं. आपल्याच जिल्ह्यांतल्या वराडकर जमीनदारांचे भावाभावांचे खून कसे पडले, हें आपण जाणतांच. हें ध्यानीं घेऊन निदान आरोपी रघुनाथ याला तरी आपल्या अधिकारांत अधिकांत अधिक शिक्षा देतां येईल तितकी आपण दिली पाहिजे.'

आरोपीचा बोलभांडे वकील देखील एक लहानसा जमीनदारच होता. त्याला हा युक्तिवाद जिथें धोपाट्यांनीं पटवून दिला, तिथें मामलेदाराला तो पटवून द्यायला तें थोडेच बघतात! मामलेदारांनीं अन्याय केला असें नाहीं. पण त्यांच्याकडून न्याय मिळाला तो तसा मिळाला! आणखी थोडासा पुरावा रघुनाथविरुद्ध हातीं लागला असता, तर त्यांनीं त्याला सहा महिन्यांची शिक्षा ठोठावायलाही कमी केलें नसतें. पण तसें केल्यास आणि मग रघुनाथनें अपील केल्यास अपिलांत तो निर्दोषी ठरून सुटायचा व आपणावर ठपका यायचा; या पापाला भिऊन ते वागले.

# ३

मागील गोष्टीला तीन महिने लोटले. श्रावणाचा महिना, काजरोळीं गांवांत मुसळधार पाऊस त्या दिवशी पडत होता. संगमनाथाच्या देवालयांत गोकुळाष्टमीचा सत्ता सुरू होता. तो गोकुळाष्टमीचाच दिवस, म्हणून गांवांतील नदीच्या पैलतीरावरील आवाठांतली बरीचशी मंडळी-मुलें-माणसें देखील देवळांत उत्सवाची मौज पाहायला गेली होती. नदी दुथडी भरून वाहात होती. नदीचें पाणी इतकें वाढलें होतें कीं, देवळाच्या दक्षिणेचा नदीचा चिरेबंदी घाट बुडून पाणी देवाच्या पायरीला लागलें होतें. मात्र देवळांत पाणी शिरतें कीं काय असें भय कुणालाही बाळगायचें कारण नव्हतें. देवळाच्या चिरेबंदी पायऱ्याच मुळीं बत्तीस होत्या. त्यांच्यावर देवळाचा चौथरा, व त्या चौथऱ्यावर देऊळ. पाणी वाढून वाढून किती वाढणार? त्यामुळें देवळांत सप्त्यांत गुंतलेले लोक निर्धास्त होते. तथापि देऊळ जरी इतक्या उंचावर असलें तरी त्या मानानें गांव बराच सखल असल्यानें गांवांतील नदीकांठचीं बहुतेक भातशेतें अगदीं जलमय होऊन गेलीं होतीं. तरीही पूर सारखा वाढतच होता. त्या वर्षीच्या पावसाळ्यांत तो अतिशय मोठा असा पहिला पूर होता. तो अतिशय मोठा म्हणायचें कारण गांवकऱ्यांच्या आठवणींत गेल्या चाळीस वर्षांत तेवढा मोठा पूर कधीं नदीला आला नव्हता.

असा बेफाट पूर नदीला आला, कीं त्यांतून मोठमोठीं झाडेंपेडें, लांकूडसामान, गुरेंढोरें व क्वचित् माणसेंही नदीच्या वरच्या भागांतून वाहात यायचीं. नदीला देवळापाशीं वळण असल्यानें व घाटाला वळसा घालून नदीचें पात्र वाहात असल्यानें वरून कांहीं जरी वाहात आलें, तरी तें बहुधा घाटासरपटत वाहात जाई. त्यामुळें गांवकरी लोक जे अट्टल पोहणारे होते, ते घाटावर अशा पुराच्या वेळीं पहारा धरून बसायचे, व त्यांना कांहीं ना कांहीं लाभ व्हायचा. अशा पोहणाऱ्या मंडळींत दत्तू हिर्लेकर व सखाराम तांबेकर हे दोघे पट्टीचे पोहणारे होते.

त्या रात्रीं दिवेलावणीच्या सुमाराला ते दोघेही आणखी कांहीं गांवकऱ्यांसह घाटावर उभे असतांना त्यांना वरून कांहीं तरी वाहात आल्याचा भास झाला. हां हां म्हणतां तो भास खरा ठरूं लागला. पण प्रवाहांत उडी घालायचें त्यांना कारण पडलें नाहीं. वाहात येणारी वस्तु सजीव आहे, व ती पोहत पोहत घाटाच्या रोखानेंच येत आहे, असें त्यांना दिसून आलें.

ती पोहत येणारी व्यक्ति कोण असावी, याविषयीं त्या लोकांना फार वेळ तिष्ठत बसावें लागलें नाहीं. प्रवाहाचा वेग फारच जोराचा असल्यानें हां हां म्हणतां तो पोहत येणारा माणूस घाटाला येऊन लागला. मात्र घाटापाशीं दत्तूनें त्या माणसाला जर हात दिला नसता, तर तो खालीं वाहात गेला असता. इतका तो अगदीं दमून गेला होता.

"कोण रघुनाथ! केव्हां रे आलास सुटून?" दत्तूनें विचारलें.

रघुनाथ अंगावरचे ओलेचिंब कपडे पिळीत, थंडीनें कांकडत कांकडत उत्तरला, "हा येतों आहें हाच."

"म्हणजे? नदी कुठें उतरलास? अजून घरीं गेलासच नाहींस का?"

"नाहीं. नदीला उतारही नव्हता, आणि वाटलें कदाचित् बाबा माघारीच देवळाकडे आले असतील. म्हणून नदी उतरून प्रथम तुझ्या घराकडे निघालों होतों. तों नदीला खळाळी फार. खालचा सांकव पाहिला तो मध्येंच मोडून पडलेला. अखेर नदींत उडी घातली. पण तुझ्या घराखालीं पैलतीराला कांहीं लागतां आलं नाहीं. पाण्याच्या झोतासरसा इथवर आलों नी काय! चल आतां माघारे जाऊं घराकडे. येतोस का?" रघुनाथ म्हणाला.

"येतों. पण आज अष्टमी नव्हे कारे?"

"असेना! आपण येऊं माघारे अंमळशानं."

"बरं तर चल. पण अगोदर तें अंगावरचं ओलेतं सोड आणि हें माझं अंगावरचं उपरणं नेस पाहूं!" दत्तू आपलें उपरणें रघुनाथच्या हातीं देऊन लगेच अंगांतला कोटही काढून देत म्हणाला, "आणि हा कोरडा कोट अंगांत घाल. छत्री माझ्यापाशीं आहेच. पाऊस देखील आतां बहुतेक ओसरला आहे. एका छत्रींतून आपण दोघेजण जाऊं."

घर सोडल्यापासून आज तीन महिन्यांनीं रघुनाथ सक्त मजुरीची शिक्षा भोगून रत्नागिरीच्या तुरुंगांतून सुटून गांवीं आला. तो गांवच्या वेशीवर दिवस मावळतांनाच आला. पण लगेच घरीं यायची त्याला छाती झाली नाहीं. न जाणो, कोण काय म्हणेल ? कुणी हंसेल कीं काय ? गांवकरी आपणाला उपहासानें नांवें ठेवतील कीं काय, या भयानें त्यानें रात्र पडेपावेतों गांवाबाहेर वेळ काढला, व नंतर त्यानें पैलतीराला येण्यासाठीं मागें सांगितल्याप्रमाणें पुरांत उडी घातली. प्रथम घरीं तो मुद्दामच गेला नव्हता. त्याला प्रथम दत्तूसारख्या कुणातरी मित्राला भेटून गांवांतील हालहवाल विचारून घ्यायची होती. आपलें घरदार तरी जाग्यावर आहे कीं नाहीं याचीही त्याला शंका होती.

रघुनाथचें मन आजवर तीन महिने त्याला सांगत होतें, कीं आपण गंगाराम पोलिसपाटलाला मारलें, हा आपला मुळींच अपराध नाहीं. पण आपलें एकट्याचें मत म्हणजे काहीं गांवाचें मत नव्हे ! शिवाय कायद्यानें तर आपण अपराधी ठरलोंच ना ? म्हणूनच आपणाला सक्त मजुरीची शिक्षा झाली.

रघुनाथला नकळत आणखी एक तरवार मामलेदारानें तो तुरुंगांतून शिक्षा भोगून आज उद्यां सुटणार असें कळतांच त्याच्या मानेवर लटकत ठेवायची व्यवस्था केलीच होती. त्यानें त्याच्याकडून व त्याच्या आणखी कांहीं साथीदारांकडून एक वर्षपावेतों चांगल्या वर्तणुकीबद्दल जामीन घेण्याचें ठरविलें होतें. त्याबाबत सरकारी हुकुमाची अंमलबजावणी करण्यासाठीं पोलिस आज सायंकाळींच नदीपलीकडे दहीबावींत येऊन थडकले होते. तो उद्यां नदीचा पूर ओसरल्यावर गांवांत प्रगट होणार होता. त्याची फक्त बाबा व गंगाराम यांखेरीज कुणाला दादही नव्हती.

●

रघुनाथ दत्तूचें उपरणें नेसला. त्यानें त्याचा कोट अंगांत चढवला, व आपले कपडे पिळून बरोबर घेतले. लगेच एका छत्रींतून दोघेही घराकडे निघाले.

“ थांब जरा. रामजीबाबा देवळांत आला आहे का पाहून येतों. ” दत्तू म्हणाला.

" कांहीं नको. पुन्हा आपण येणारच आहों इकडे, तेव्हां पाहूं." रघुनाथ म्हणाला. आपण आल्याचा बोभाटा इतक्यांत होऊं नये असें त्याला जन-लज्जेमुळें वाटत होतें.

" आमच्या घरची मंडळी खुशाल ना ? " रघुनाथनें वाटेला लागल्या-वर दत्तूला विचारलें.

" हो, खुशाल. तुझी बायको मात्र थोडी आजारी होती." दत्तू उत्तरला.

बायकोच्या आजाराची वार्ता ऐकून रघुनाथच्या छातींत धस्स झालें. त्याला माहीत होतें, तो तुरुंगांत गेला तेव्हां जमनाला दोन महिने गेले होते. त्यांत आणखी हें तिचें आजारीपण ऐकून त्याला साहजिकच भय वाटलें.

" बरं, आणखी काय खबरबात ? " रघुनाथनें विचारलें.

" आणखी काय खबरबात सांगूं ? गांवांतलीं माणसं अजून हयात आहेत. मोजणीदार गांवाला आग लावून गेले, ते पावसाळा आटोपल्यावर राख सावडायला पुन्हा येतील. तोंवर गंगाराम पोलिसपाटील गांवांत पेट-णाऱ्या तुम्हां आम्हां कुळांच्या सरणाच्या होळीवर पोळ्या भाजून खातो आहे. तूं, सखाराम तांबेकर, धाकू चुनेकर, मी, आणखी पैलवाडचे दोघे धुरी, आणि वरच्या वाडींतले सदबा घाडी व शिदबा घाडी यांच्यावर धन्यांच्या फिर्यादी गेल्या तीन सालच्या खंडासाठीं आणि जमिनी सोडून देण्यासाठीं झाल्या आहेत. "

" इथवर मजल येऊन ठेपली का ? "

" तर ? कांहीं विचारूं नकोस. गंगारामानं आम्हां सर्वांना चांगलंच फसवलं. पण आतां तें बोलून काय उपयोग ? "

" आणि मास्तरांची बदली ? "

" होते आहे मास्तरांची बदली ! ते तर गंग्याचे गुरु ! "

" म्हणजे ? "

" म्हणजे काय ? बाबारे ! देसाई, कुळकर्णी या गबरू घोरकऱ्यांनीं गांवाला आग लावावी आणि मास्तरनीं त्या आगींत तेल ओतावं. जीव नकोसा करून सोडला आहे सर्वांनीं उभ्या गांवाला. आतां तूं आला आहेस, काय रस्ता आम्हांला दाखवशील तो दाखव. नाहींपेक्षां गांव

सोडून हांडेमडकीं डोकीवर घेऊन भीक मागत जाण्याशिवाय अथवा काजरा खाऊन इथल्या इथें मरण्याशिवाय आम्हांला उपाय उरला नाहीं आतां."

" बरं, आमच्या बाबांकडे दहीबावच्या सावकाराकडून पैसे आले का रे? बाबांनीं घर बांधलं का नवं? जातांना मी त्यांना सांगून गेलों होतों. पंधरा दिवसांत पैशांची थोडीफार व्यवस्था करायचं सावकारनं कबूल केलं होतं."

" तं काय झालं कळलं नाहीं. पण कांहींच झालं नसावंसं वाटतं. बाकी, होणार कसं? घर बांधायचं मनांत आणलं असतं रामजीबाबानं, तरी जागा तर पाहिजे ना?"

" जागा पाहिजे याचा अर्थ काय?"

" म्हणजे? तुला रामजीबाबाचं इतक्या दिवसांत पत्र बित्र मुळींच आलं नाहीं?"

" नाहीं. तीन महिन्यांच्या आंत कैद्याला पत्र मिळत नाहीं तुरुंगांत. शिवाय बाबांनीं पत्र पाठविलंही नसेल कदाचित् मला."

" अरे राम!" दत्तूनें एक दीर्घ उसासा सोडून म्हटलें, " रामजीबाबाची आणि तुझी भेट झाली कीं तो सर्व कांहीं तुला सांगेल. माझी कल्पना होती, तुला इकडच्या कांहीं कांहीं बातम्या तरी कळल्या असतील."

" कांहीं नाहीं. बरं, आमच्या जमिनीचं काय झालं?"

" काय व्हायचं? सध्यां तुमच्या—आमच्यावर खटला सुरू आहे खंडाबद्दल आणि जमिनीचा कबजा सोडण्याबद्दल. पण कायरे, तुम्हां बापलेकांवर दोघांवरही फिर्याद कशी रे केली बाबांनीं?"

" कोण जाणे! आतां चौकशी केली म्हणजे कळेल. बरं; पण आमच्या मांगराजवळचं फणसाचं झाड? त्याचं काय झालं?"

" तें तुटलं. त्याचीं थोडीं लाकडं बाबांच्या भावणीच्या घराला लागलीं असतील, आणि बाकीचीं गंगारामनं विकलीं. तुमची जमीन देखील बाबांनीं दंडेलीनं नांगरून पेरली आहे या वर्षी."

" अस्सं!"

" खरं, आपल्या त्या बाबू पळसंबकराची आई वारली."

"अरेरे! पोराच्या मरणाचा धक्का बिचारीच्या जिवाला बसला असेल. काय करील बिचारी! आणि त्याची बायको मथू?"

"हो खरंच! तिच्यावर सध्यां खुनाचा खटला चालला आहे ना! मला वाटतं, उद्यां किंवा परवां त्या खटल्याची तारीख असेल. मामलेदाराकडून खटला सेशनांत गेला आहे. रत्नागिरीलाच ती तुरुंगांत आहे. तुला नाहीं भेटली?"

"नाहीं भेटली. स्त्रीकैद्यांना तुरुंगांत पुरुषकैद्यांपासून निराळं ठेवतात. पण तिनं खून तरी कुणाचा केला रे?"

"खून केला नाहीं; नुसता खुनाचा प्रयत्न मात्र केला तिनं."

"पण प्रयत्न तरी कुणाचा खून करायचा केला?"

"तो दाजीबा आहे ना!—तें तरी एक मोठंच लफडं होऊन बसलं आहे बघ. लोक म्हणतात कीं, त्यांत तिला निदान काळ्या पाण्यावर तरी जावं लागणार. काय करील! गरीब बिचारी! तिला कुणाचा आधार नाहीं कीं कांहीं नाहीं. दाजीबानं चांगला नांवाजलेला वकील दिला आहे. एका दिवसाला पंचवीस रुपये घेतो म्हणे त्याचा वकील. आणि जरूर पडली तर तो मुंबईहून बालिस्टर देखील आणणार आहे म्हणे! देवगडांत त्याचा वकील घोपाटे होता."

"पण मथूचे बाप–भाऊ आहेत ना? ते नाहींत का कांहीं खटपट करीत तिच्यासाठीं?"

"नाहीं. ते म्हणतात, आपली पोरगी आतां मेल्यांत जमा."

बोलत बोलत दत्तू रघुनाथला घेऊन आपल्या झोंपडीपाशीं येऊन पोहोंचला, व आईला हांक मारूं लागला. रघुनाथचें घर नदीच्या पैलतीराला असल्यानें पूर ओसरेपावेतों त्याला तिकडे जाणें शक्यच नव्हतें.

म्हातारीनें दार उघडून दोघांनाही आंत घेतलें. रघुनाथ आलेला पाहून तिला आनंद झाला. तिच्याशीं चार इकडच्या तिकडच्या गप्पा मारून झाल्यावर रघुनाथ दिवसभर उपाशीं असल्याचें दत्तूनें तिला सांगितलें. त्याबरोबर म्हातारी लगेच चूल पेटवायला उठली.

" मथू दाजीबाचा खून करणार होती खरी का पण ? " दत्तूनें झोंपडीच्या पुढच्या भागांत धोंगडी टाकून बसायला जागा केली, व बैठकीवर बसल्यावर रघुनाथनें पूर्वीच्या संभाषणाचा धागा हातीं घेऊन विचारलें.

" खून करणार होती कीं नाहीं मला माहीत नाहीं. पण तशी वेळ मात्र आली होती खास. समज, तिनं त्याचा खून केला नसता, तर—" एवढें बोलून दत्तूनें एकवार झोंपडीबाहेर जाऊन दाजीबा व हरिबा यांच्या घरांकडे डोकावून पाहिलें. तों दोन्ही घरें बंद होतीं. दोघेही गोकुळाष्टमीच्या सप्त्याचा संगमनाथाच्या देवळांतील उत्सव पाहायला गेले होते.

" आतां तुला खरी गोष्ट सांगूं ? " दत्तू माघारा येऊन रघुनाथपाशीं बसून म्हणाला, " मथूनं तो जरा उतावळेपणाच केला. वास्तविक तिच्याऐवजीं दाजीबाचा खून करून फांशीं जायचा मान माझा होता. "

" कां ? "

" कां म्हणजे ? मथूसाठीं ! बाबू मेल्यावर लगेच तीन दिवसांनीं तूं अडचणींत सांपडलास, त्यामुळें तुला पुढचा प्रकार माहीत नाहीं. दाजीबानं मथूला अशी कांहीं पेंचांत पकडली होती कीं ज्याचं नांव तें ! मलाही प्रथम कांहीं माहीत नव्हतं. तूं पकडला गेलास आणि पंधरा दिवसानंतरची गोष्ट. नवऱ्याच्या सुतकांतून मथू नुक्ती कुठें बिचारी मोकळी झाली होती. तरी तशीच बिचारी माझ्या घरीं आली आणि मला विचारूं लागली, ' धन्यांनीं त्यांच्या पैशांचा तगादा लावला आहे. मागची बाकी दिल्याखेरीज जमीन पावसाळी पिकवतां यायची नाहीं, आणि घर देखील सोडून जातां यायचं नाहीं म्हणतात. घरांत वायंगण्या भाताचे पांच मुडे नुक्ते बांधून ठेवले होते, ते धन्यांच्या शिपायानं दंडेलीनं उचलून नेले, आतां यांना पैसे या वेळीं कुठचे देऊं मी ? ' असें ती मला विचारायला लागली—"

" इतकी कुळकर्ण्यांनीं माणुसकी सोडली काय ? "

" ऐक तरी ! नाहीं तर धन्यांचं सांगणं असं कीं आपल्या घरीं शेणगोठा, घरकाम, मुलांना सांभाळणं अशीं कामं करायला तिनं यावं. तें कांहीं मथूला रुचलं नाहीं. तिला धन्याचा विश्वास वाटला नाहीं. मी तिला म्हणालों, धन्यांना हवं तर तुझ्या बाजूनं मी दोन शब्द सांगतों. आणि

त्याप्रमाणें दुसऱ्या दिवशीं कुळकर्ण्यांकडे जाणारही होतों. पण तोंच दुसऱ्या दिवशीं सकाळींच मथू आमच्या घरीं आली आणि मला झालेली हकिकत सांगू लागली, ' धन्यांनीं काल माझं झोपडं अगदीं पेंचून टाकायचा रंग आणला होता. संध्याकाळीं महार जो माझ्या दारीं धरणं धरून बसला, तो कांहीं केल्या उठेनाच. पाटाचं पाणी आणायला देखील बाहेर जाऊं देईना. मला तेव्हां रडूं कोसळलं ! ' इतक्यांत म्हणे दाजीबा पुढें आला आणि त्यानं धन्यांची सर्व बाकी भागवायची हमी घेतली."

" अरेरे ! एकूण सापाच्या जबड्यांत अशी बेडकी सांपडली तर ! "

" ऐक. इतकं सांगितल्यावर मी तरी कशाला नको म्हणूं ? रांगतं मूल मुद्दाम कडेवर कशाला घेऊं ? मी तरी मथूची हमी घेणार होतों म्हणजे माझ्या गळ्याला ती एक नवी तांतच लावून घेणार होतों कीं नाहीं ? मीं म्हटलं, बरं आहे. तेव्हांपासून मथू आमच्या घरीं वारंवार यायची, आणि मीही तिच्या घरीं जायचा. पुढें पुढें मी तिच्या घरीं जायचं सोडलं. कारण गंगाराम देवळी आणि दाजीबा यांची बैठक रोज तिच्या घरीं जमूं लागली. त्यांच्यांत मी कसा सामावणार ? एके दिवशीं मला ती एकटी भेटली तेव्हां मी तिला सांगितलंही, कीं अशानं लोक हंसतात. पण ती म्हणाली, ' हंसतात तर काय करूं मी ? दाजीबा बिथरला तर जामीनकी सोडून देईल, आणि धनी लांडग्यासारखा माझ्यावर तुटून पडेल कीं ! ' तेव्हां मला कांहीं बोलतां आलं नाहीं. मलाही तें पटलं. मथूची इच्छा त्या चांडाळांनीं आपल्या घरीं यावं अशी नसली, तरी तिला त्यांची आपल्या घरची बैठक कशी टाळतां आली असती ? पण मला मात्र मनांतून वाटलं कीं हिला यांतून सोडवावं. कारण तिचीं लक्षणं अलीकडे मी पाहात होतों, ती माझ्याशीं जास्त आपलेपणानं वागे. माझ्यापूर्वी माझ्या आईनं तें ओळखलं होतं. "

दत्तूची आई भाकरीचें पीठ मळीत होती, तिथूनच म्हणाली, " एकदां शेजारणीमार्फत मथूनं माझ्यापाशीं गोष्ट देखील काढली होती तशी. मला त्या शेजारणीनं विचारलं, दत्तूला मथू पाटाची बायको कां नाहीं करून घेत ? पण मीच नाहीं म्हणाल्यें. लग्नाची पोरगी माझ्या मुलाला मुळींच मिळेनाशी झाली तर पाटाची करायची ना ?—"

म्हातारीच्या मनांतून त्या बाबतींत आणखी कांहीं बोलायचें होतें. पण तें टाळण्यासाठींच दत्तूनें गोठ्यांत गळतें आहे कीं काय, बैल भिजत आहेत कीं काय, तें पाहाण्याच्या निमित्तानें तिथून पाय काढला. 'गोठ्यांतून गुरें जरा पाहून येतों. तोंवर तुझं होऊं दे.' असें म्हणून राकेलचें डबडें लावून घेऊन रघुनाथसह तो गोठ्यांत गेला. गोठा म्हणजे झोंपडीच्या मागची केंबळ्याची पडवी. त्या पडवींत जातांच दत्तू रघुनाथला म्हणाला, "आईचा हट्ट कांहीं तरीच. पाटाच्या बायकोपासून झालेल्या मुलाला लग्नाची मुलगी मिळायला अशी रस्त्यावर थोडीच पडली आहे? त्यांतूनही एकदोन मुली होत्या मिळण्याजोग्या. पण देकार शंभर रुपये कुठून आणायचा? कर्जवाम करून तेवढीही भर केली असती मीं. पण आठ वर्षांची पोर बायको करून काय करूं मी? त्यापेक्षां मथू बरी नव्हती का?"

"काय हरकत होती?" रघुनाथ म्हणाला, "म्हातारीचे विचार अजून आहेत पहिल्या काळचे. मी घालीन तिची समजूत. आतां म्हणावं, भटांत देखील जिथं उघड उघट पाट—आणि ते दुसऱ्या जातीशीं देखील—लावूं लागले आहेत, तिथं आपणाला कसली आली आहे हरकत!"

"आतां तें सांगून कांहींच उपयोग नाहीं म्हणा! आतां मथूला शिक्षा होणार, मग ती शिक्षा भोगून सुटून येणार, तोंवर मी तरी कशाला लग्नाचा राहतों? आणि ती देखील होईल तोंवर म्हातारी. तें पुढचं कुणीं पाहिलं आहे? पण सेशनांत देखील तिला शिक्षा होईलच का रे?"

"त्याचा काय नेम? माझ्या खटल्यांत पाहिलं नाहींस का? पण कां रे, लोक मला नांवं ठेवतात का?"

"अरे! लोक नांवं ठेवायचेच. त्याला कोण काय करणार?" असा तो आगांतुक विषय मागें सारीत दत्तू पुन्हा आपल्या आवडत्या विषयाकडे वळून म्हणाला, "समज, मीं थोडेसे पैसे कर्जवाम करून घेतले आणि रत्नागिरीला गेलों, तर एखादा चांगला वकील पैसे घेऊन सेशनांत मथूला सोडवील का?"

"पाहूं आपण मग कसं जमतं तें. अगोदर आमच्यावर धन्यांनीं फिर्यादी केल्या आहेत म्हणतोस त्यांतून आम्ही निभावूं या, मग बाकीच्या गोष्टी."

"त्या फिर्यादींचं कसलं घेऊन बसलास? आम्हीं अगोदरच देवगडच्या गावडे वकिलाला जाऊन विचारलं आहे. तो म्हणाला कीं ज्या अर्थी तुमच्या कबुलायती धन्यांपाशीं नाहींत, आणि मोजणीदारांनीं तुमच्या भोगवट्याला असलेल्या जमिनी तुमच्या नांवानं कायम कुळं म्हणून नोंदल्या आहेत, त्या अर्थी धनी कांहीं तुमच्या जमिनी काढून घेऊं शकत नाहींत. फार तर तीन वर्षांचा खंड मागतील. कारण आमच्यापाशीं पावत्या नाहींत. तो द्यायला आमची ना मुळांतच नाहीं. आम्हीं ठरविलं आहे. खंडाचे पैसे कडोसरीला लावूनच कोर्टांत जायचं. नाहीं म्हणायला एवढं काम मात्र मोजणीदारांकडून गंगारामनं करून घेतलं खरं. पण तें देखील अर्धवट!"

"अर्धवट म्हणजे?"

"त्यानं जितकी वर्गणी आमच्याकडून गोळा केली, तितकी सारी कांहीं मोजणीदारांना दिली नाहीं. हजारांतले तीनचारशें रुपये तरी त्यानं मधल्यामध्यें दाबले असले पाहिजेत. एरव्हीं उगाच का ह्या मिरगाला नवं हेऱ्यांतलं जोत आलं? आणि वाणसवद्याचं टोलेजंग दुकान निघालं आहे तें?"

"वाणसवद्याचं दुकान देखील निघालं आहे गंगारामचं?" रघुनाथनें भुंवया चढवीत विचारलें. पण वस्तुतः त्यांत त्याला मोठेंसें आश्चर्य वाटलें नाहीं. पूर्वींपासूनच त्याला संशय होता कीं गंगाराम जो शेतकऱ्यांचा कैवार घेऊन या भानगडींत पडला आहे, तो गांवगुंडीवर पैसे लुबाडण्यासाठीं. कुळांतले डावपेंच आपणाला कळावे म्हणून बाबांनीं हा आपला हेर कुळांत सोडून दिला आहे झालें. मात्र मास्तरांविरुद्ध अर्ज करण्यांत गंगारामनें इतका पुढाकार कां घेतला, याचा रघुनाथला अजून पत्ता लागला नव्हता. मास्तरांशीं त्याची कांहींतरी खाजगी अदावत असेल, म्हणून त्यानें मास्तरांवर तसा सूड घेतला असेल, इथवरच रघुनाथच्या व इतर शेतकऱ्यांच्या कल्पनेची मजल जात होती. त्या अर्जाच्या मुळाशींही बाबा वगैरेचें प्रचंड कृष्णकारस्थान आहे व त्या अर्जाचा फांस करून बाबा व इतर धनी आपल्या कुळांच्या गळ्यासभोंवार आंवळणार आहेत, हें तेव्हां कुणाच्या ध्यानींमनींही नव्हतें.

"बाबा रे, गंगारामनं तुम्हांला सबंधच्या सबंध घशांत टाकलं नाहीं हें तुमचं नशीब!—बरं, मथूचं पुढं काय झालं म्हणालास?"

"पुढं काय सांगूं ? त्या दिवशीं तिला दाजीबानं धन्यांपाशीं जामीन राहून अडचणींतून वांचवलं. तेव्हांपासून तिच्यावर दाजीबाचं वजन पडूं लागलं, ती त्याची मिंधी झाली. त्या दिवसापासून मथूच्या घरची दाजीबाची बैठक कांहीं केल्या उठेनाच. तें लोकांच्याही डोळ्यांवर येऊं लागलं. लोक उघड उघड बोलूं नये तें कुजबुजूं लागले. आणि लोकांना दिसायलाही तें जरा विचित्र दिसे. तो बोभाटा जातां जातां तिच्या माहेरापावेतों जाऊन पोहोंचला. माझ्या-सारख्यांला नुसतं तिच्या घरीं जायचीही चोरी; इतकीं लोक तिला व मलाही नांवं ठेवूं लागले. मी मग तिच्या घरीं जायचंच सोडलं. पण एके दिवशीं स्वतः मथूच आमच्या घरीं आली आणि मला म्हणाली कीं, 'जोत आपलं घरचं आहे, या वर्षीं वांट्यानं दुसऱ्या कुणाची तरी शेती करूं या.' तेव्हां मला शंका आली, दाजीबासारखा एवढा मोठा आधार हिला असतांना माझ्यासारख्या गरीबाबरोबर शेती करूं असं ही म्हणते याचा अर्थ काय ? मीं तिला लगेच तसं विचारलंही. तिनं सांगितलं तेव्हां मला कळलं. ज्या ठिका-णांत मथूची झोंपडी होती, तें ठिकाण कुळकर्ण्यांनीं दाजीबाला गहाण द्यायचं ठरवलं होतं, व त्या ठिकाणांतलीं सारीं कुळं आधींच दाजीबाच्या हवालीं करून दिलीं होतीं. कुळकर्ण्यांनीं पैसे देखील घेतले होते म्हणे त्या ठिकाणाचे, आणि विसारपावती देखील झाली होती. मथूनं कुळकर्ण्यांची द्यायची बाकी आतां दाजीबानंच मथूकडून वसूल करायची होती. मथूनं सांगितलं म्हणून मला तरी माहीत. एवढं झाल्यावर एके दिवशीं दाजीबा आला आणि तिला सांगूं लागला, एकटी निराळ्या झोंपडींत राहातेस ती आपल्याच घरीं येऊन कां नाहीं राहात ? तें तिला आवडलं नाहीं. तिनं त्या दिवसापासून दाजीबाच्या वाऱ्यालाही उभं राहायचं नाहीं असं ठरवलं. त्या दिवशीं ती माझ्याकडे आली, ती तरी दाजीबाशीं भांडूनच आली. मला तिची दया आली. इतकी गरिबी असून देखील ती दाजीबाच्या पापवासनेला बळी पडली नाहीं याचं मला मोठं कौतुक वाटलं. मीं तिला सांगितलं, जमीन सोडायची नाहीं कांहीं झालं तरी. तिला तेवढाच धीर मिळाला. मिरगाची तिची नांगरण मीं करून दिली, व पेरणीही करून दिली. तें पाहून दाजीबा तिला व तिच्याबरोबर मलाही नाहीं नाहीं त्या धमक्या देऊं लागला. तेव्हां त्याला खणखणीत सांगून टाकलं कीं आमच्या वाटेला कोण जाईल त्याचा

मुद्दाच पाडीन. त्या दिवसापासून माझं आणि दाजीबाचं वांकडं आलं. त्याचा सूड त्यानं हा असा घेतला—"

"कसा घेतला ?"

"मी कांहीं त्या दिवशीं गांवीं नव्हतों. शिरगांवला आमच्या धन्यांच्या वेठीसाठीं गेलों होतों. मामलेदारसाहेबांकडे धन्यांनीं दिलेला केळ्यांचा घड पोंचता करायचा होता. तिकडून दुसऱ्या दिवशीं सकाळीं माघारा येतों, तों दाजीबाला मथूनं कुऱ्हाडीचा घाव घालून मारलं असून तो अतिशय आजारी आहे असं कानीं आलं. म्हणून मथूच्या समाचारासाठीं गेलों. तों कुणीच मला तिच्याशीं बोलूं देईना. उलट कांहीं लोक आपसांत कुजबुजूं लागले कीं माझंही त्यांत अंग आहे! दुपारीं पोलिस आले. त्यांनीं मथूला कैद करून नेलं. तेव्हांच ते मलाही कैद करणार होते. पण मी त्या रात्रीं मुळींच गांवीं नसल्याचं परस्पर बाबांनींच कोतवालाला सांगितल्यामुळं मी बचावलों."

"आणि मथूनं खुनाचा आरोप कबूल केला ?"

"तर ? तिनं आपल्या जबानींत स्पष्टच सांगितलं कीं आपण दाजीबाचा खून करणार होतों; कारण तो आपल्या अब्रूवर उठला होता. पण तिचं कोण खरं मानणार ? दाजीबापाशीं पैसा भरपूर! त्यानं पैसा चारून साक्षीदार तयार केलं. गंगारामदेखील त्याच्या बाजूनं साक्ष द्यायला उभा राहिला! साऱ्याजणांनीं सांगितलं कीं मथू ही दाजीबाची ठेवलेली बाई होती; ती पुढें दत्तूच्या—म्हणजे माझ्या—नादीं लागली आणि माझ्या सांगण्यावरून तिनं म्हणे दाजीबाला लुबाडायचा प्रयत्न केला. आणि तें साधलं नाहीं, म्हणून माझ्या सांगण्यावरून तिनं दाजीबा रात्रीं झोंपीं गेला असतांनाच कुऱ्हाडीनं त्याचा खून करायचा प्रयत्न केला. असा देवगडांत मामलेदारासमोर खटला चालून आतां रत्नागिरीला सेशनांत गेला आहे."

दत्तूची कर्मकथा आणखीही पुढें चालली असती. पण तेवढ्यांत दत्तूच्या म्हातारीनें रघुनाथला जेवायला हांक मारली. त्यामुळें दोघांनाही गोष्टी थोपवून तिकडे जावें लागलें.

रघुनाथनें कसेबसे चार घांस पोटांत घातले, व तिथेंच दत्तूबरोबर विश्रांतीसाठीं कांबळ्यावर अंग टाकलें. गांवांतील त्या तिघांच्या अवांतर

भानगडीविषयीं आणखी बऱ्याच गोष्टी झाल्या. रघुनाथ मधून मधून बोलत होता, त्या मायलेकरांचें ऐकूनही घेत होता, पण त्यांत त्याचें चित्त नव्हतें. मथूचें पुढें कसें होईल, आपण तुरुंगांतून सुटून आल्यामुळें आपल्याला लोक हंसतील कीं काय, गंगाराम व गांवांतील धारेकरी यांच्या लपंडावांनीं गांवांतील गरीब शेतकऱ्यांचें कितपत वाटोळें झालें आहे, आपणावर व आणखी कांहीं जणांवर धन्यांनीं फिर्यादी केल्या आहेत त्यांचा परिणाम काय होणार, आणि त्या सगळ्याच्या आधीं आपला बाप, आपली बायको आणि लेंकरूं यांची इतक्या दिवसांत काय दुर्दशा झाली असेल, अशा अनंत प्रकारच्या काळजीनें तो अतिशय गांगरून गेला होता.



उजाडतें केव्हां आणि आपण आपल्या बायको—मुलाला, आपल्या वृद्ध पित्याला जाऊन भेटतों केव्हां, असें रात्रभर रघुनाथला झालें होतें. त्याला कुणाशीं बोलायला नको होतें, व कुणीं बोललेलें ऐकायलाही नको होतें. दत्तूची म्हातारी लौकर झोंपी गेली; पण दत्तू झोंपीं जाईना व बोलायचाही थांबेना. त्यानें आपण देवळाकडे सप्त्याला जाऊं असें रघुनाथला सांगून पाहिलें. पण रघुनाथनें ‘दमलों आहें फार; झोंपतों आतां’ असें सांगून टाळाटाळ केली. त्याच्या अंतःकरणांत आगीचा डोम्ब भडकला असतांना कुठचें देऊळ आणि कुठचें काय ?

दत्तूला उत्सवासाठीं म्हणून देवळाकडे जायचें नव्हतें; त्याला त्याच्या आवडत्या मथूबद्दल कितीतरी रघुनाथशीं बोलायचें होतें. साऱ्या गांवांत ज्याच्यापाशीं दत्तूनें असल्या मनकवड्या गोष्टी मनमोकळेपणानें बोलाव्या, असा रघुनाथ हा एकच त्याचा जिव्हाळ्याचा मित्र होता, व तो आज तीन महिन्यांनीं तुरुंगांतून सुटून प्रथमच गांवीं आला होता.

पण रघुनाथ देवळाकडे येईना आणि कांहीं बोलेनाही, तेव्हां दत्तू एकटाच वेळ घालवण्यासाठीं देवळाकडे निघून गेला. तो मग उजाडेपावेतों कशाला घरीं येतो ?

रघुनाथ पहांटेपावेतों स्वतःशीं गांवच्या आणि आपल्या एकंदर परिस्थितीचा विचार करीत आंथरलेल्या कांबळ्यावर तळमळत पडला होता.

पण त्याचे डोळे घराकडे लागले होते. सुदैवानें पहांटेपूर्वीच पाऊस बहुतेक ओसरला होता. त्यानें उठून एकवार बाहेर जाऊन पाहिलें, तों आकाश बरेंच निवळल्यासारखें दिसत होतें. त्यामुळें शुक्राची चांदणी त्याला दिसली. त्यावरून पहांट झाल्याचा अंदाज त्यानें केला, व ‘आतां नदीचें पाणी बहुतेक ओसरलें असेल. उतार मिळायला अडचण पडणार नाहीं’ असें मनांत म्हणत तो दत्तूचे कपडे उतरून ठेवून आपले ओलसर कपडे चढवून नदीकडे निघाला. नदी पावसाळ्यांत कोठें उतार देते हें त्याला तो गांवचा रहिवासीच असल्यानें पक्कें माहीत होतें. तो प्रथम थेट आपल्या घराखालच्या उताराच्या जागीं गेला. पण पूर अजून म्हणण्यासारखा ओसरला नव्हता. त्या पुरांत उडी घालण्याचें धैर्य त्याला होईनाही, व घरच्या माणसांसाठीं हळवा झालेला त्याचा जीव धीर धरेनाही.

तोंच एक युक्ति त्याच्या डोक्यांत आली. वृंदावनच्या आसपास नदीला जिथें सांकव बांधण्यांत आला होता, तिथें नदीचें पात्र बरेंच खोल असलें तरी अरुंद होतें, व नदीच्या दोन कांठांवरून एक आंब्याचा व दुसरा पायरीचा असे दोन मोठे वृक्ष नदीच्या पात्रावर विस्तारलेले होते. अगदीं लहानपणीं रघुनाथ व त्याचे सौंगडी हूडपणानें नदी पावसाळ्यांत दुथडी भरून चालली असतांना एका झाडावरून दुसऱ्या झाडावर त्यांच्या फांद्यांच्या आसऱ्यानें चढून नदीपार होत. तो लहानपणांतील हूडपणा त्याला त्या वेळीं आठवला. कारण नदीवरचा सांकव रात्रींच मोडला होता व त्याला तर घरीं जायचें होतें.

“ सांकव मोडला असला तरी कांहीं हरकत नाहीं. आपण ह्या झाडांच्या फांद्यावरून चढून नदीपार होऊं ” असें म्हणत रघुनाथ नदीच्या कांठाकांठानें पाण्यानें तुडुंब भरलेले भातशेतीचे कुणगे तुडवीत त्या झाडांच्या अनुरोधानें वर निघाला. जातांना शेतीच्या पडक्या कुंपणांतील करवंदीच्या व बोराटीच्या शिऱ्यांचे कांटे त्याच्या पायांना बोंचले. पण त्याला त्याचें भानही नव्हतें. तो त्या अपेक्षित ठिकाणीं जाऊन पाहतो, तों पैलतीरावरचा आंबाही मोडून नदींत आडवा पडला होता. पण सुदैवानें त्याच्या मोठ्या फांद्या शाबूत होत्या. तो चटकन् पायरीच्या झाडावर चढून मोठ्या फांदीच्या आसऱ्यानें नदीच्या पात्राच्या मध्यभागीं गेला, आणि आतां

आंब्याच्या फांदीला बिळखा घालणार, तोंच 'फुस् फुस्' असा फुत्कार त्याच्या कानीं आला. समोर पाहातो तों मनगटाइतक्या जाडीचा एक साप त्याला डसण्यासाठीं हातभर मान वर करून उभा !

तो सापही कोंकणचाच, व रघुनाथही कोंकणचाच. त्यानें सापाला चटकन् ओळखलें. तो साप साधा नव्हता, तो जातिवंत नाग होता. नदीकांठच्या एखाद्या गांवांत कुठें तरी एखाद्या झाडाच्या ढोलींत पक्षिणीचीं पिलें खाण्यासाठीं घुसला असतांना तें झाड पावसांत एकाएकीं नदींत मोडून पडलें असेल, आणि त्या झाडाबरोबर वाहात आलेल्या त्या नागोबानें जीव बचावण्यासाठीं मोडून पडलेल्या आंब्याचा आश्रय केला असेल.

रघुनाथला क्षणभर प्रश्न पडला, आतां कसें करायचें? माघारें जायचें?—नाहीं. तिकडे बायको—मुलाची काय दशा झाली असेल? बरें त्या नागाला तिथल्या तिथें ठार मारावें तर हातीं ना शस्त्र ना सोटा! झाडाची फांदी मोडून त्या फांदीनें त्याला झोडपूं म्हटलें, आणि तेवढ्यांत तो साप उडी घालून डसला तर? डसला नाहीं वेळीं, तरी तो जर आपल्या हातून ठार झाला नाहीं, नुसता दुखावला जाऊन बाजूला पळाला, तर तो दावा धरणार नाहीं कशावरून? नागाची जात! वर्षानुवर्षें नाग दावा धरतो, व कोसांचे कोस आपल्या प्रतिस्पर्ध्यामागोमाग धावत जातो, हें रघुनाथला माहीत होतें. तसा कांहीं प्रकार इथें झाला तर कसें होईल, हें त्याला वाटणारें भय अस्थानीं नव्हतें.

पण इतका विचार करीत बसायला तरी रघुनाथला तेव्हां वेळ कुठें होता? मागें तर त्याला जाववेना, व पुढें जाण्याची तर छाती होईना. बरें; तिथें थांबणें म्हणजे साक्षात् मृत्यूच्या जबड्यांत उभें राहाण्यासारखें होतें. अखेर त्यानें मनाचा हिय्या केला. मनांतून काजराईचा धावा केला, तिला नारळाचा नवस देऊं केला, व नेसत्या ओल्या धोतराचा पुढचा सोगा सोडून पांखरावर जाळें टाकतात तसा सावधपणें त्या नागावर फेंकला.

सुदैवानें नाग त्या धोतरांत गुरफटला गेला. त्याबरोबर रघुनाथ त्याची शक्य तितकी घट्ट मोठ आंवळून त्या मोटीसह प्रथम आंब्याच्या झाडावर उडी मारून गेला. तिथून त्या झाडावरून पैलतीरावर जातांच प्रथम त्यानें

डाव्या हातानें आंब्याच्या मुळांतला एक दगड उचलून त्यानें त्या नागाला धोतरांतल्या धोतरांत ठेंचून ठार केलें, व त्याची पुन्हा नीट मोटळी बांधून लोंब्रकळती हातीं घेऊन तो घराकडे निघाला. एकदां त्याच्या मनांत आलें कीं नेसलेलें धोतर तसेंच्या तसें फेडून फेकून द्यावें व घरीं गेल्यावर दुसरें धोतर नेसावें. पण—त्या रात्रीच्या वेळीं जनलज्जेचें भय बाळगण्याचें कांहीं कारण नव्हतें तरी मनलज्जा त्याला तसें करूं देईना. त्याचा मांगर कांहीं तिथून फार दूर नव्हता. फार तर अर्ध्या हांकेवर असेल. वाटेंत वस्तीही नव्हती. परंतु घरांत कारभारीण एकटी असती तर गोष्ट निराळी होती. पण त्याचा म्हाताराही घरांत होता. ती पहांटेची वेळ, रामरावानें उठून पडवींतल्या परशावर खोकत खोकत विडी ओढीत बसायची. त्याच्या समोर नागव्यानें कसें जावें ?

अखेर रघुनाथ ती नागाच्या खांडोळ्यांची मोट घेऊन तसाच शेताचे कुणगे तुडवीत मेरेमेरेनें मांगरापाशीं गेला. तों त्याच्या अपेक्षेप्रमाणें रामराव पडवींत परशावर विडी ओढीत खोकत बसला होता.

"बाबा! मी आलों." रघुनाथ पडवीच्या पांवळ्यांत जाऊन उभा राहून म्हणाला, "मला अगोदर नेसायला धोतर पाहिजे आहे."

इतक्या दिवसांनीं मुलगा सुखरूप घरीं आलेला पाहून म्हाताऱ्याला इतका आनंद झाला कीं, त्या भरांत तो क्षणभर दम्याची व्यथा विसरला, अंगांत बारीक ताप आज आठ दिवसांपासून असे त्याचीही व्यथा विसरला, व धोतर आणण्यासाठी आंत गेला. त्यानें आजारीपणामुळें आंथरुणाला खिळलेल्या शंकरला कुशींत घेऊन झोंपी गेलेल्या जमनाला हांक मारून जागें केलें. त्यासरसा शंकरही जागा होऊन रडूं लागला. त्या ओरडीनें सावित्रीची—रामरावाच्या मोठ्या विधवा सुनेची मुलगीही जागी होऊन रडूं लागली. इतक्या गोंधळांतून रामराव जुनें धोतर बाहेर आणीतों रघुनाथाला धीर कुठचा निघायला! त्यानें परशाच्या उतवावर वाळत पडलेलें रामरावाचें कांबळें वेढून घेतलें, आणि नेसलेलें धोतर सोडून तसेंच्या तसेंच पेटत्या परशांत फेकलें. त्याच हातीं माळ्यावरच्या शेणी पांच सात काढून त्याही परशांतल्या गाठोडीवर टाकल्या.

"हें काय?" रामरावानें बाहेर येतांच बिचकल्यासारखें करून विचारलें.

"सांगतों," रघुनाथ रामरावाच्या हातचें धोतर घेऊन नेसतां नेसतां म्हणाला.

परसा जेव्हां चांगला रसरशीत पेटला, व रघुनाथच्या वैऱ्याचा मुद्दा त्यांत पुरा जळून गेला, तेव्हां रघुनाथचा जीव हायसा झाला. मग त्यानें घरांतल्या सर्व मंडळीला तो वृत्तांत सांगितला.

मांगरांत सर्वत्र पावसानें गळत होतें. मागच्या बाजूला तात्पुरती केंबळ्याची पडवी उभारून त्यांत दोन बैल, एक गाभण म्हैस, एक दुभती गाय व एक वासरूं अशा पांच गुरांतून आतां फक्त एक वासरूं व एक म्हातारा बैल अशीं जीं दोघेंच शिल्लक होतीं, तीं गुरें बांधण्यांत आलीं होतीं. मुख्य मांगरांत रामराव सर्व मंडळीसह रहात होता. त्या मंडळीला झोंपायला पावसांत निवाऱ्याची जागा मिळाली खरी; पण वांदरांनीं उड्या मारमारून नळे फोडून छपराची चाळण बनवून सोडली होती, व पैशाच्या अभावीं नवे नळे आणून दुरुस्त करण्याचें राहून गेल्यामुळें कितीहि गळतीं काढलीं तरी तीं निघेनातच. फाटलेल्या आकाशाला ठिगळें कुठें कुठें म्हणून लावणार? तशांत त्या दिवशींचा पाऊस इतका मुसळधार होता कीं, त्यामुळें मांगरांतल्या लहानथोरांच्या अंगावर रात्रीं झोंपेंत कुठें ना कुठें गळून कपडे ओले चिंब झाले होते. तरीही जमना व सावित्री ह्या जावाजावा आपण थंडींत कुडकुडत असतांनाही आपल्या पोराबाळांना पांघरुणें घालून त्यांचें थंडीवाऱ्यापासून रक्षण करीत होत्या.

चांगल्या घटकाभर सुखदुःखाच्या गोष्टी बोलून झाल्या. पण रामराव अथवा जमना यांनीं घरगुती अडचणींचा पाढा मुद्दामच तेव्हां रघुनाथपुढें वाचला नाहीं. आपण बरेच दिवस बारीक तापानें आजारी आहों हेंही रामरावानें त्याला तेव्हां सांगितलें नाहीं, आणि गरभारपणांत आपणाला जिवापार मोलमजुरी व काबाडकष्ट करावे लागल्यामुळें वाखा होऊन आपण आजारी आहों हें जमनानेंही त्याला कळविलें नाहीं. मात्र शंकर क्षीण स्वरानें रडूं लागला तेव्हां हें त्याचें नेहमींचें रडें नव्हे हें ओळखून रघुनाथनें तो आजारी आहे कीं काय अशी चौकशी केली, तेव्हां तो आमांशाच्या विकारानें आजारी असल्याचें सांगणें जमनाला प्राप्तच झालें.

एकुलत्या एका मुलाच्या भयंकर आजाराविषयींच्या चिंतेची धोंड अंतः-करणावर पेलीत रघुनाथ आपल्या जिवापेक्षांही प्यार अशा गुरांचा समाचार घ्यायला गोठ्यांत गेला. पण पाहातो तों पांचांच्या ऐवजीं दोनच जीव तिथें त्याला दिसले. त्याची कापशी गाय तो तुरुंगांत गेला तेव्हां गाभण होती. ती व्याली कीं नाहीं हें त्याला पाहायचें होतें. त्याच्या अंदाजाप्रमाणें ती इतक्यांतच व्यायची होती. पण पडवींत जाऊन पाहतो, तों दुभती म्हैस व कापशी गाय कुठें दिसेना! मागच्या वर्षी मुद्दाम हेऱ्यांतून पंचेचाळीस रुपयांना आणविलेला व जिवाच्या जतनेनें पोटच्या शंकराप्रमाणें सांभाळलेला ढवळा बैलही त्याला कुठें दिसेना!

"हें काय?" रघुनाथनें लगेच माघारीं येऊन रामरावाला विचारलें, "तानी आणि कापशी कुठें आहेत? आणि ढवळा कुठें आहे?"

"तानी मेली महिन्यापूर्वी." रामराव हृदयाला चिमटा बसल्यासारखा कळवळत उद्गारला.

"मेली? कशानें?"

रामरावाच्यानें बोलवेना.

जमना दरवाजाच्या आंतून उत्तरली, "ती गंगाराम फौजदाराच्या तरव्यांत शिरली तेव्हां स्वतः फौजदारानं तिला मेरमरेतों मारली. ती घरीं जी आली, ती दुसऱ्या दिवशीं आटोपली."

"आणि गाय-बैल?" रघुनाथनें जमनाकडे पाहून विचारलें.

"रघू! तीं गोठ्यांत नाहींत, यावरून तीं आतां आपलींशीं उरलेलीं नाहींत एवढं नाहीं का तुला कळत?" रामराव अत्यंत कष्टानें उद्गारला.

तेवढ्यांत शंकर घरांत दूध मागून रडूं लागला.

"दूध आतां कुठचें आणूं तुला माझ्या बाबा? तुझ्या नशिबीं दूध प्यायचं असतं, तर कापशीला विकायचा प्रसंग कां बरं आला असता आपल्यावर?" असें म्हणत जमना मुलाला समजावूं लागली, व रामरावा-कडे वळून म्हणाली, "सड्यावर धनगराकडे दूध मिळेल का?"

"पाहातों मिळालं तर. नाहीं तर गांवांतून रोजच्यासारखं उजाडल्यावर आणायला हवं." असें म्हणत रामराव पितळेची लोटी घेऊन मांगराबाहेर

पडला. म्हाताऱ्याला कष्ट देऊं नयेत, आपणच जाऊन दूध आणावें, असें एकदां रघुनाथच्या मनांत आलें. पण तो मनांतला विचार कृतींत उतरविण्याचें धाडस त्याच्यानें करवलें नाहीं. कारण न जाणो! धनगरानें इतके दिवस कुठें होतास म्हणून हटकलें तर ?

"गाय काय झाली आपली ?" रघुनाथनें जमनाला विचारलें.

जमना शंकरला जुन्या फाटक्या हिरव्या धाबळींत गुंडाळून बाहेर घेऊन आली व त्याला मांडीवर थोपटीत रघुनाथला म्हणाली, "धन्यांनीं खंडबाकीसाठीं महार दारांत बसवला, तेव्हां त्यांना गाय मामंजींनीं विकत दिली."

"केवढ्याला ?"

"गाईचे धरले त्यांनीं पंधरा रुपये."

"पंधरा रुपये ? वेळेला अडीच शेर दूध देणाऱ्या गाईची सारे पंधराच रुपये किंमत काय ?"

"तर! ती देखील त्यांनीं मोठ्या मिनतवारीनं कबूल केली. चंद्रा भावीण म्हणत होती बाराच रुपये द्यावे गाईचे म्हणून."

"तिचा यांत काय संबंध ?"

"काय संबंध म्हणजे ? तिचा लहान मुलगा आहे ना दोन वर्षांचा ? त्याला गाईचं दूध पाहिजे होतं. त्यासाठीं तर इतके उपद्व्याप धन्यांनीं केले आमच्या दारांत महार बसवायचे."

"तिच्या मुलाला दूध पाहिजे, आणि माझ्या मुलाला दूध नको काय ?" रघुनाथनें जमनाच्या मांडीवर मलूल होऊन पडलेल्या शंकरकडे पाहात विचारलें, "तूं तिला सांगितलं नाहींस का मुद्दाम आमच्या मुलासाठीं गाय आम्ही आंगावरचा डाग मोडून तीस रुपयांना घेतली म्हणून ?"

"मीं सारं सांगितलं. शेवटीं गळ्यांतली पुतळ्यांची माळ देखील तिच्यापाशीं गहाण ठेवायला तयार झाल्यें. पण ती ऐकायलाच तयार नाहीं. गड्याला पाठवून गोठ्यांतली गाय आम्हांला न विचारतां सोडून घेऊन गेली. शंकऱ्या तेव्हांसुद्धां थोडा आजारीच होता. आणि मीसुद्धां आजारीच होत्यें. मुद्दाम मामंजींनीं आचऱ्याचा वैद्यही आणवला होता. त्या वैद्यानं

शंकऱ्याला नुसत्या दुधावर ठेवायला सांगितलं होतं. पण धन्यांच्या सत्तेपुढं शहाणपण कुणाचं चालणार ?"

"मग आतां शंकऱ्याला दूध मिळतं कीं नाहीं ?"

"इतके दिवस पलीकडच्या वाडींतून रोज दूध विकत आणीत होतों. पण परवां तिथंही दूध मिळेनासं झालं. तेव्हां मामंजी मोठ्या मिनतवारीनं भावणीकडे गेले, आणि ती आतां रोज अच्छेर दूध कसंबसं विकत देते. तें दूध देखील अगदीं कावळ्याच्या डोळ्यासारखं असतं. तें याला पचत नाहीं नी कांहीं नाहीं."

इतक्यांत सावित्री घरांत आली. तिनें आंगणांतूनच तें संभाषण ओझरतें ऐकलें व आंत येतांच म्हटलें, "पाणी घातलेलं फिळकवणी दूध कसं पचेल त्याला ?"

"तूं केव्हां आलीस ?" रघुनाथनें सावित्रीला विचारलें. घरांत पाऊल टाकल्यापासून तो तिच्याशीं प्रथमच बोलत होता.

"मी आल्यें, ही आजारी पडल्याचा निरोप घेऊन मला न्यायला इकडचा माणूस आला त्याच्याबरोबर." सावित्री उत्तरली.

"हिला ताप कसला येत होता ?"

"ताप कसला, श्रमांचा. ऊन–तहान न म्हणतां मोलमजुरी करीत होती एकसारखी. पोटीशी असलेल्या बायकोला तें कसं झेपणार ? महिना–पंधरा दिवसांत दहा रुपये मिळविले असतील हिनं. पण वैद्याला द्यावे लागले औषधाचे व डोळीचे मिळून सहा रुपये! दूध झालं असेल तिच्या आजारांत कांहीं नाहीं तरी पांच रुपयांचं. इतके जिवापाड कष्ट केले नसते तर वाखा व्हायचं कांहीं कारण नव्हतं. सोन्यासारखं मूल गेलं, आणि हिच्या शरीराची खराबी झाली ती झालीच. अलीकडे पंधरा दिवस जरा कुठें हिंडते फिरते तरी आहे. खर्चापरी खर्च पाण्यासारखा चाललाच आहे. मामंजींनीं दंड भरायला पन्नास रुपये वाण्याचे कागदावर काढले होते, त्याचा एकसारखा तगादा सुरू झाला म्हणून आम्हीं गांवांत मोलमजुरी करून फेडूं म्हटलं, तर हें असं कर्म उभं! अखेर बैल विकावा लागला. तरी आणखी दहा रुपये सोनाराचे द्यायचेच आहेत बाकी."

" बैल कुणाला विकला ? "

" बैल घेतला आपला तो सावकार आहे ना दहीबावचा, त्यानं तीस रुपयांना. "

तोंच सावित्रीची मुलगी रडूं लागली, तिला समजावण्यासाठीं ती आंत गेली. त्या रडण्याच्या आवाजानें जमनाच्या मांडीवर झांपडलेला शंकर दचकून जागा होऊन ' आई! आई! दूध ! दूध ! ' असें करून केकाटूं लागला. त्याचें केकाटणें ऐकवेना म्हणून रघुनाथ विव्हळत्या अंतःकरणानें घराबाहेर पडला, व आपल्या जळलेल्या घराकडे जाऊन तिथें एक आंब्याचें झाड होतें त्याच्या मुळाशीं असलेल्या मोठ्या पाथरीवर रामरावाच्या वाटेकडे डोळे लावून बसला.

पण तो तिथें बसला तरी त्याचें मन थोडेंच स्वस्थ बसतें ! तें सारखें तडफडत होतें, " माझ्या पोराच्या तोंडांतली दुधाची धार काढून धन्यांनीं आपल्या भावणीच्या पोराच्या तोंडांत घातली काय ? आणि इकडे माझं पोर ' दूध ! दूध ! ' करून तळमळतं आहे ! मी घरांत नाहीं असं पाहून असा माझ्या घरच्या माणसांचा छळ केलास काय गुलामा ? तुला देव पाहून घेईल. माझ्या बायकोचं पोटांतलं मूल तूं ठार मारलं आहेस. चांडाळा ! कुळांना गांजून तूं त्यांचीं बायकापोरं अशींच मारून खाणार आणि तुझ्या रांडापोरांना खायला घालणार काय ? ठीक आहे. पाहूं किती दिवस तुझं बळीराज्य आमच्यावर चालतं तें. पाहीन पाहीन, नाहीं तर—मग मी फांशीं गेलों तरी बेहेत्तर ! माझा एक संसार धुळीला मिळाला तरी गांवांतल्या बाकीच्या गोरगरीब शेतकऱ्यांचीं बायकापोरं तरी मला दुवा देतील. "

असा मनांत विलाप करीत रघुनाथनें डोळ्यांत उभे राहिलेले दुःखाश्रू दोन्ही हातांनीं पुशीत सभोंवार पाहिलें. तों घरच्या चौथऱ्यावर भोपळ्याचा वेल, आंबाडीचे डाम्बे, आणि भेंड्यांचे विरढे चांगले फोफावलेले त्याला दिसले. त्यांच्या सभोंवार छातीइतकी उंच ओसाडी उगवली होती. रात्रींच त्यानें दत्तूच्या तोंडून धन्यांनीं घराला जागा देण्याचें नाकबूल केल्याचें ऐकलें होतें. त्याची आठवण त्याला झाली. " इतक्या पिढ्यांचं माझं नांदतं घर ज्या चौथऱ्यावर उभं होतं, त्या चौथऱ्यावर ओसाडी उगवायला कारण—

बाबा वळचणकरा! तूं तूं ब्राह्मण कसला, चांडाळ आहेस! ज्या कुळांच्या जिवावर तूं आणि तुझीं बायकापोरं जगतात, ज्यांच्या जिवावर तुला रांडा-पोरं जमवून नाचरंग करायला फावतं, त्या कुळांची अशी दैना तूं आरंभली आहेस काय? इतक्या पिढ्यांचं माझं हें घर—त्या माझ्या कुळस्वामीला तूं ओसाडीच्या रानांत कुजायला लावलंस काय?—"

पुढें त्याच्यानें स्वतःशींही बोलवेना. तो जखमी वाघासारखा त्या जळक्या घराच्या पडक्या भिंताडांतून एखाद्या पिशाचाप्रमाणें येरझारा घालूं लागला.

तोंच पलीकडच्या आंब्याच्या झाडावर एक घुबड ओरडूं लागलें. घरांत एकुलता एक मुलगा आजारी, आणि तो घुबडाचा अमंगळसूचक घूत्कार!—शंकरची आठवण होऊन मनांत येऊं नयेत त्या अभद्र कल्पना त्याच्या मनांत घोळूं लागल्या.

इतक्यांत रामराव सड्यावरून धनगराच्या घराकडून दूध घेऊन आला. तो अगदीं जवळ आला तरी रघुनाथचें तिकडे लक्ष गेलें नाहीं. इतका तो आपल्या दुःखांत अगदीं बुडून गेला होता.

रामरावानेंही घुबड ओरडतांना ऐकलें, व तोच अमंगळ विचार त्याच्याही मनांत आला. त्यासरसें त्यानें दुधाचें भांडें खालीं ठेवलें, आणि आई-वरून दोन शेलक्या शिव्या घुबडाला हांसडीत पायांखालचा दगड उचलून त्याच्या रोंखानें आंब्याच्या झाडावर भिरकावला. त्या माराच्या भयानें घुबड दूर उडून गेलें. पण मृत्यु असल्या धोंडेमारीला थोडाच भितो!



लेकानें बापाकडे पाहिलें व बापानें लेकाकडे पाहिलें, म्हाताऱ्यानें अशुभ मनांत आणून घुबडाला घालवून दिलें त्याचें रघुनाथला स्वतःच्या मनाशीं विषादपूर्वक हसूं आलें.

"कां रे इतक्या गारठ्याचा इकडे आलास?" रामरावानें रघुनाथला विचारलें.

"दूध मिळालं का?" रघुनाथनें त्या मुख्य प्रश्नाकडे दुर्लक्ष करून उलट प्रश्न केला.

" मिळालं पावशेरभर. पण म्हशीचं मिळालं, गाईचं नाहीं. शेळीचंही नाहीं. शेळ्या त्याच्या सगळ्या दूरच्या दुसऱ्या मांगरांत आहेत. म्हशीचं दूध पोराला पचेल कीं नाहीं नकळे!" रामराव दुधाचें भांडें उचलून घेऊन घरच्या वाटेला लागतां लागतां पुन्हा मागें वळून रघुनाथला म्हणाला, " चल घरीं."

" गाय विकलीत, ते आपले पैसे सावकाराकडून आले नाहींत का?" रामरावामागोमाग जातां जातां रघुनाथनें त्याला विचारलें.

'अखेर गेल्या चार महिन्यांत आपल्या संसाराची कसकशी वाताहात उडाली हें याला बायकांकडून कळलं म्हणायचं!' असें मनाशीं ओळखून दुःखाचा एक दीर्घ सुस्कारा टाकीत रामराव म्हणाला, " नाहीं आले पैसे. सावकार सोईनं पैसे देईलसं दिसत नाहीं. आपणाला त्याच्यावर फिर्याद करावी लागणार."

" पण फिर्याद करणार कसल्या आधारावर?"

" कागद करून घेतला आहे ना त्याच्याकडून?"

" त्यानें बरा कागद करून दिला?"

" न देऊन काय करतो? तो टोलवाटोलवी करूं लागला तेव्हां मी त्याच्या दारीं जाऊन धरणं धरल्यासारखा बसलोंच अन् काय! दोनतीन वायदे झाले; पण पैसा देण्याचं नांव नाहीं. प्रत्येक वेळीं इकडच्या तिकडच्या अठरा बयादा सांगत बसायचा! शेवटीं म्हटलं, यांत कांहीं अर्थ नाहीं; हा असाच चाळवीत बसणार. नवीं ठिकाणं गहाण खरेदी घ्यायला त्याच्यापाशीं पैसा आहे, सावकारी करायला पैसा आहे, आणि माझं देणं द्यायला तेवढा पैसा नाहीं."

" आणि इतकं करून सवरून पुन्हा बैल त्यानंच विकत घेतला ना?"

" होय. त्याला काय करणार? दंडाच्या पैशांची भर करण्यापायीं मला तसं करावंच लागलं. पण काय रे रघू! आतां जर मीं सरकारांत लिहिलं कीं माझा दंड परत करा आणि मी दीड महिन्याची सजा भोगायला तयार आहें, तर सरकार ऐकेल का रे? ऐकेल तर तसा अर्ज करणार आहें मी."

" हा काय भलताच विचार तुमचा? आणि काय म्हणून असं करायचं?"

"अरे! मी उगाच दंडापायीं तुला खाड्यांत लोटलं रे! तेव्हांच माझं चुकलं. दंड भरण्याऐवजीं शिक्षा भोगायला मी तयार आहें असंच तेव्हां सांगायला हवं होतं. तिकडे तुरुंगांत मेलों असतों तर काय दुनिया ओस पडली असती?"

"असले नाहीं नाहीं ते विचार उगाच मनांत आणूं नका तुम्ही बाबा! तुम्हांला कसली काळजी? मी आहें ना? आपले सारेच दिवस असे पडत्या काळचे थोडेच राहाणार आहेत?" पित्याचें शांतवन करीत रघुनाथ पुढें म्हणाला, "बरं; आपल्या या ठिकाणाची काय भानगड आहे? धन्यांनीं घर बांधायला जागा देत नाहीं म्हणून सांगितलं का?"

"होय. जागा देत नाहीं म्हणून सांगितलं, आणि मी कबुलायत द्यायला तयार होत नाहीं असं पाहून शेतसुद्धां या मिरगाला जबरदस्तीनं त्यांनींच नांगरलं. मी एकटा पडलों, म्हटलं काय करणार तें खुशाल करूं देत. मीं असंही ऐकलं आहे कीं मागच्या तीन वर्षांच्या खंडाबद्दल धन्यांनीं इतर अनेक लोकांच्याबरोबर तुझ्या–माझ्यावरही फिर्याद केली आहे. खंड सारा वसूल करूनच्या करून वर आणखी ही लबाडी! खरोखर असा वैताग येतो कीं आग लागो ह्या गांवाला असं म्हणून तोंड घेऊन कुठं तरी निघून जावं."

"आपला कापा फणस शेवटीं त्यांनीं तोडलाच ना?"

"तोडला. सांगतों काय, माझ्या मुला! खऱ्याची दुनिया उरली नाहीं रे बाबा! गरिबांचा वाली कुणी नाहीं माझ्या सोन्या! गरिबांचा वाली कुण्णी नाहीं!" असें म्हणून रामराव नातवाचा समाचार घेण्यासाठीं उठून घरांत गेला. तेव्हां जमनाच्या मांडीवर शंकऱ्या झोंपीं गेला होता. त्याच्या क्षीण निस्तेज मुखाकडे पाहून तो म्हणाला, "माझा राजा दूध प्याला का?"

शंकरनें पांखरासारखा टाळा मात्र उघडला, व खोल गेलेले डोळे गरगर फिरविले. तो बोलला नाहीं. त्याला तितकी शक्तिच नव्हती.

"नुसता हाडांचा सांपळा उरला आहे माझा सोन्या!" असें म्हणून रामरावानें शंकरच्या बाळमुखावर ममतेनें हात फिरविला.

" दूध पाजलं त्याला तें ओकून पडलं. ताजं नव्हतं—नासकं होतं कीं काय नकळे ! " जमना म्हणाली.

" आतां जातोंच भावणीच्या घरीं, आणि ताजं दूध घेऊन येतों. " रामराव म्हणाला.

" भावणीच्या घरीं जायचं नाहीं. आपण मेलों तरी पत्करलं. त्या रांडेच्या घरीं याचना करायला जायचं ? " रघुनाथ बाहेरून म्हणाला.

लेकाशीं जास्त हुज्जत घालीत न बसतां रामराव दूध आणण्यासाठीं निघाला. भावणीचें घर नदीपलीकडे देवळापाशीं असल्यानें नदी ओलांडून जाणें भाग होतें. नदीचा पूर पुरा ओसरला असेल नसेल या शंकेनें रघुनाथ त्याला म्हणाला, " तुम्ही जाणारच तर मी तुमच्या सोबतीला येतों. "

" चल तर. " रामराव म्हणाला.

बापलेक दोघेही नदीच्या रोखानें चालले. ते पंचवीस एक पावलें जातात न जातात तोंच दत्तू घाबऱ्याघुबऱ्या धांवत तिथें आला आणि त्या दोघांनाही म्हणाला, " रघू ! रामजीबाबा ! अगोदर तुम्ही दोघेही दहींबावला अगर दुसऱ्या एखाद्या गांवीं आतांच्या आतां निघून जा कसे ! "

" कां ? " रघुनाथनं विचारलें. रामराव त्या दोघांच्या तोंडाकडे पाहूं लागला. त्याला त्याचा अर्थच कळेना. तो म्हणालाही, " आम्हीं काय कुणाच्या केळी तोडल्या आहेत ते पळून जाऊन तोंड लपवूं ? "

" अरे ! काल रात्रीं मीं तुला सांगितलं ना, तें धरणं घेऊन शिपायी आले आहेत. ते नुसता तुमचा जामीन घ्यायला आले नसून तुम्हां दोघांना व आणखी कांहींजणांना पकडून न्यायला आले आहेत म्हणे ! आम्हां सर्वांना पकडून ते देवगडला घेऊन जाणार, आणि मामलेदारासमोर आम्ही जामीन दिल्यावर आमची सुटका होणार. "

" जामीन ? कशासाठीं हे ? " रघुनाथनें विचारलें.

" आम्ही गांवांत दंगाधोपा करूं, मारामाऱ्या करूं, दरोडे घालूं, म्हणून चांगल्या वागणुकीसाठीं. " दत्तू म्हणाला.

" हें सगळ्या धन्यांचं मिळून कांहींतरी कट्याळ शिजलेलं दिसतं. एकूण पुरा छळ करणार आमचा हे ! " रामराव कपाळाला हात लावून उद्गारला.

" करूं देत. जितका छळ करायचा तितका करूं देत. त्या मूर्खांना इतकं कळत नाहीं, कीं पेटलेली आग कपड्यांनीं झांकून विझत नाहीं; ती उलट जास्त भडकते आणि कपड्यांचं झांकणही जाळते. त्या आगींतच त्यांचे बळी पडायचे असाच जर देवाघरचा नेम असला, तर त्याला कोण काय करणार ? " रघुनाथ उद्गारला.

" विचार करायला मग वेळ पुष्कळ आहे. अगोदर आपण इथून दूर जाऊं. " दत्तू म्हणाला.

" दूर जाऊन कुठें जाणार ? आभाळ अथवा पृथ्वी फोडून तर आपणाला जातां यायचं नाहीं ना ? सरकारी कामांत असले लपंडाव अंगाशीं येतात. अशी चोरी नकोच आपणाला. " रघुनाथ म्हणाला.

चाकरीचा महार व एक पोलिस शिपायी यांसह गंगाराम देवळी तेवढ्यांत तेथें येऊन उभा राहिला आणि म्हणाला, " चला तिघेही देवळाकडे. जमादारसाहेब आले आहेत, त्यांनीं तुम्हांला बोलावलं आहे. "

रामराव व दत्तू या दोघांचींही तोंडें आंबून चिमणीएवढीं झालीं. रघुनाथ मात्र भिण्यापेक्षां संतापला जास्त. त्यानें गंगारामला विचारलें, " अजून गांव किती पेटायचा बाकी आहे ? "

गंगारामला तो प्रश्न झोंबला. पोलिसपाटलाला एका सामान्य गांवकऱ्यानें, आणि तोही पोलिसपाटलाच्या दावेदारानें असला मगरुरीचा प्रश्न विचारावा म्हणजे काय ? अधिकाराच्या धुंदींत गंगाराम उत्तरला, " अजून तूं शाबूत आहेस, तुझा बाप शाबूत आहे, तुझी बायकापोरं व मांगर शाबूत आहे, यावरून अजून गांव बराच पेटायचा बाकी आहे हें तुला नाहीं कळत ? "

" आणि आमचा पोलिसपाटील शाबूत आहे, त्याचे साथीदार गांवांतले धनी शाबूत आहेत, साऱ्या दुनियेच्या बायला भावणी शाबूत आहेत, अर्थात् गांवाला आग खरी लागलीच नाहीं अजून. " रघुनाथ रोखठोक उद्गारला.

" जास्त वटवट करूं नकोस. मुकाट्यानं देवळाकडे चल जमादारसाहेबांसमोर. "

पोलिस शिपायी रघुनाथला धमकावून गंगारामकडे वळून विचारूं लागला, " हाच का तो रघुनाथ राणा काल सुटून आलेला ? "

" होय. आणि तो त्याचा बाप—आणि तो त्याचा—साथीदार दत्तू हिर्लेकर." गंगाराम अनुक्रमें रामराव व दत्तू यांच्याकडे बोटें दाखवून म्हणाला.

" गंगाराम! घरांतून लेकरांबाळांचा निरोप घेऊन येऊं, कीं पुन्हा घरीं यायला संधी मिळेल ? " रामरावानें बापुडवाणी चर्या करून विचारलें.

" जा, सगळ्या पोरांबाळांचा निरोप घेऊन ये म्हाताऱ्या! मग बळी द्यायला न्यायचं आहे तुला देवगडच्या देवासमोर! " शिपायी उद्धटपणें म्हणाला, व गंगारामकडे पाहून बेपर्वाईनें हंसूं लागला.

गंगारामही वृत्तीनें त्यांतलाच खरा; पण गांवकरी या दृष्टीनें असल्या उद्धटपणाला बळी पडून आपला पल्ला यायचा नाहीं हें ओळखून त्याला तोंडदेखली तरी माणुसकी दाखवणें भागच होतें. तो रामरावाला म्हणाला, " रामजीबाबा! शिपाईदादांचा स्वभाव आहे जरा थट्टेखोर, म्हणून ते तसं बोलतात. पण तसं कांहीं देखील नाहीं बरं! मामलेदारसाहेबांची कसलीशी नोटिस आली आहे, त्या नोटिशीची आज नुसती समज द्यायची आहे तुम्हांला. आणखी कांहीं देखील नाहीं. "

आजचें मरण उद्यांवर टळलें, यांतच रामराव व दत्तू यांना—आणि रघुनाथलाही असमाधानांत समाधान वाटलें. दत्तूनें रात्रीं जें रघुनाथला सांगितलें होतें, तें केवळ ऐकीव माहितीवर. त्याला नोटिस म्हणजे काय आणि जामीन म्हणजे काय हें काय माहीत ? पोलिसपाटलाच्या मर्जीतले चार लोक बोलत होते तें त्यानें ऐकलें आणि सांगितलें. बाकी, गंगाराम मात्र तेव्हां हातचें राखून बोलला. ' तुमच्याकडून चांगल्या वर्तणुकीबद्दल जामीन कां मागूं नये याचीं कारणें चार दिवसाच्या आंत कळवा ' अशी नोटिस तालुक्याच्या मामलेदारानें खेड्यांतल्या खेडुतांना काढणें—आणखी त्यांतही मामलेदारांना त्या खेड्याची एकंदर हालहवाल पूर्णपणें माहित झालेली !—अशा स्थितींत जामीन मागण्याचाच तो एक पर्याय होता. गरीब बिचारे शेतकरी, ते आपले जामीन मागितले जाऊं नयेत यासाठीं कारणें काय दाखविणार, आणि पोलिसपाटील, इतर मोठमोठे इभ्रतदार जमीनदार वगैरे लोकांनीं ज्या चोरट्या खोट्यानाट्या तक्रारी केल्या असतील, त्यांचा फोलपणा कसा सिद्ध करणार ?

घरांत रघुनाथचा शंकर तसाच तळमळत पडला होता. त्याच्यासाठीं दूध आणायचें बाजूलाच राहिलें, व रामराव आणि रघुनाथ ह्या बापलेकांना त्या पोलिसाच्या रखवालीखालीं देवळांत जमादारसाहेबांची भेट घेण्यासाठीं जाणें भाग पडलें. कसाई कत्तलखान्यांत नेण्यासाठीं विकत घेतलेलीं गुरें एकेका दाव्याला दोन दोन अशीं बांधून पुष्कळशा जोड्या एकटाच रस्त्यानें हाकीत नेतो. पण माणसें गुरांपेक्षां शहाणीं असल्यानें रामराव व रघुनाथ गळ्याला दावें नसतांही त्या पोलिसशिपायाबरोबर अगदीं सुतासारखे चालले होते. तसें पाहूं गेलें तर तो पोलिसशिपायीही एक सामान्य माणूस. रघुनाथ जरी तुरुंगांतून चक्की पिसून अगदीं हैराण होऊन आला होता, तरी तशा स्थितींतही त्यानें त्या पोलिसशिपायाला मनांत आणलें असतें तर सहज लोळविलें असतें. दत्तू तर काय, त्या पंचक्रोशींतला छोटा गामा म्हणून गाजत होता. त्यानें तर एका मनगटानें दोनदोन पोलिसशिपायी सहज लोटून आडवे पाडले असते. पण तोही मुकाट्यानें इतर मंडळीबरोबर चालला. कसायाला गुरांना रस्त्यांत इकडून तिकडून फिरतांना आवरावें तरी लागतें. पण इथें सारीं माणसें असल्यानें त्याची कांहीं आवश्यकता नव्हती. कसायाच्या गुरांच्या तांड्यांत एखादी दुभती गाय वासरासह चालत असली तर ती मध्येंच वासराला पाजण्यासाठीं थांबून कसायाला थोडें तरी सतावते. पण रामराव व रघुनाथ यांनीं घरांत मुलगा मृत्युशय्येवर पडलेला असतांनासुद्धां तेवढेंही पोलिसशिपायाला सतावलें नाहीं. म्हणूनच म्हणतात कीं राज्यच करायचें, सत्ताच गाजवायची, ती जनावरांपेक्षां माणसांवर गाजवायला सोपी !

मनांतून खळबळ मात्र रघुनाथच्या आणि दत्तूच्याही खूप सुरू होती. धरणीकंपाच्या पूर्वीं पृथ्वीच्या पोटांत तप्त रस जसा उंकळून रटरटत असेल, तसे कढ त्यांच्या अंतःकरणांतील संतापाला येत होते.

# ४

रघुनाथच्या भाषेंत बोलायचें म्हणजे त्या दिवशीं संगमनाथाच्या देवळांत दिवसाढवळ्या यमसभा भरली होती. त्यांतला यम कोण आणि यमदूत कोण ? कीं सारेच आपापल्या परीनें एकाहून एक सवाई यम होते ? एवढाच काय तो प्रश्न होता.

देवळाच्या पुढच्या बाजूला अगदीं टोंकाला डावीउजवीकडे दोन चौकोनी ओटे बांधलेले होते. त्यांना देवळाची सोंड अशी संज्ञा होती. देवळांत शिरतांना डाव्या बाजूच्या सोंडेवर रयत ऊर्फ मामुली ब्राह्मणेतर स्पृश्य गांवकरी बसत; व उजव्या बाजूच्या सोंडेवर मुख्यतः ब्राह्मण, कुळकर्णी वगैरे सारस्वत ब्राह्मण बसत. त्यांतही मध्यभागीं देसाई, मिराशी, कुळकर्णी वगैरे बुद्रुक वतनदार व त्यांच्या आजूबाजूला मग इतर सारे बसायचे. गांवांत प्रमुख वतनदार मानकऱ्यांच्या दृष्टीनें ज्यांना थोडेंफार आर्थिक महत्त्व होतें, असे नारायणशेट सोनार, दाजीबा, हरिबा वगैरे मोठे लोक ब्राह्मणेतर असूनही ब्राह्मणांच्या सोंडेवरच पण त्यांतल्या त्यांत जरा बाजूला अथवा पायथ्याशीं बसत असत. त्यांना कुणी मुद्दाम तिथें बसवून घेई असें नाहीं. ते आपण होऊनच बसत. त्या गांवचे प्रमुख वतनदार खोत जमीनदार ब्राम्हण. ते अशा प्रत्येकाला नाकापेक्षां मोती जड करून ठेवण्याइतके कांहीं दूधखुळे नव्हते. त्यांतल्या त्यांत डावें उजवें शोधलें जाईच. नारायणशेट, हरिबा, दाजीबा यांच्यासारखे पैसेवाले ब्राम्हणेतर–बाबा देसायांच्याही खानदानी आदराला पात्र असत. पण त्यांच्या दृष्टीनें महत्त्वाची नाहीं अशी कुणी व्यक्ती त्या सोंडेवर बैठकीवर येऊन बसली तर समाजांत कुणीं कसें वागावें याविषयीं त्या व्यक्तीला कानपिचक्या द्यायला बाबा काय, कुळकर्णी काय, अथवा मिराशी काय, हे बडे वतनदार चुकत नसत.

रामराव, रघुनाथ वगैरे मंडळी देवळांत जाऊन पोहोंचली तेव्हां ब्राह्मण जमीनदारांच्या बैठकीवर एका बाजूला कां होईना पण हरिबा, दाजीबा व

नारायणशेट सोनार विराजमान झालेले त्यांना दिसले. त्या बैठकींत जमादारसाहेब लोडाच्या एका टोंकाला टेकून बसले होते व बाबा दुसऱ्या टोंकाला टेकून बसले होते. मिराशीबाबा व कुळकर्णी हे, आणखी दोन तक्के तिथें ठेवलेले होते त्यांना टेकून बसले होते. वास्तविक जमादाराची त्या शिस्तीच्या दरबारांत इतकी प्रतिष्ठा राखली जायची नव्हे. तो जर मामलेदार अथवा निदान कोतवाल तरी असता, तर गोष्ट निराळी. पण आज जमादाराला सभास्थानीं अग्रभागीं बसायचा एवढा मान मिळाला होता, तो केवळ त्याच्या जमादारीला मिळालेला नसून त्याच्या ब्राह्मण जातीला मिळाला होता. आणि समजा, तो जमादार जातीनें मराठा, भंडारी अथवा एखादा मुसलमान असता, तरीही त्या दिवशीं त्याला बाबांच्या बरोबरीनें बसण्याचा मान मिळाला नसता असें तरी कुणीं सांगावें ? आज त्या जमादाराकडून सर्व जमीनदारांना आपलें काम करून घ्यायचें होतें. त्यामुळें त्याला आज तिथें जांवयाच्या तोडीचा मान देणें क्रमप्राप्तच होतें. गरज मनुष्याला काय करायला लावीत नाहीं ? पूर्वी कधीं एकदां त्या जिल्ह्याचा कलेक्टर कुणी मुसलमान होता, तो गांवीं आला असतां त्यानें देऊळ पाहण्याची इच्छा दर्शविली तेव्हां याच बाबांनीं त्याला त्याच्या पायांतल्या बुटांसकट गोपुरापावेतों चालवीत नेऊन देऊळ दाखविलें होतें. प्रांतसाहेब, कलेक्टर, डिस्ट्रिक्ट जज्ज असे मोठे हुद्देदार गोरे लोक तर अनेकदां बूटपाटलोणींतून ते देऊळ गोपुरापावेतों हिंडून गेले होते. यांतला विशेष हा कीं त्या देवळाच्या गोपुरांतच काय पण सभामंडपांत देखील कुणी पादत्राण घालून फिरायचें नाहीं, असा तिथला सक्त परिपाठ होता. पण श्रीमंत अथवा सत्ताधारी माणसें हीं मनुष्यकोटीच्या वरचीं—कुणी तरी मानवश्रेष्ठ होत असा सोईस्कर समज त्या गांवच्या गांवठी सत्ताधाऱ्यांनीं करून घेतलेला होता.

रघुनाथनें सोंडेवर जाऊन पोहोंचतांक्षणीं पाहिलें, तों गांवचे सारे धनी, जमादार व धन्यांचे सावकार उजव्या सोंडेवर, व जमादाराबरोबरचे शिपाई आणि सखाराम तांबेकर, नारू आडवलकर, धाकू चुनेकर, महिपति राणे, तुकाराम चिंदरकर, वगैरे गांवच्या शेतकऱ्यांतील मंडळी डाव्या सोंडेवर बसली होती. त्यांना पाहातांच रघुनाथनें ओळखलें कीं ही सारी वहिमी मंडळी नोटिशीच्या दावणीला बांधण्यासाठीं धरून आणण्यांत आली असावी.

गंगाराम देवळी आला तोही त्यांच्यांतच पण किंचित् अलग असा पायरीच्या टोंकाला बसला.

रामराव तिथें जातांच प्रथम देवाला नमस्कार करून व लगेच जमादार आणि सर्व गांवधनी यांना रामराम करून डाव्या बाजूला इतर कुळांच्या घोळक्यांत जाऊन बसला. दत्तूनेंही त्याचेंच अनुकरण केलें. रघुनाथनें मात्र फक्त देवाला नमस्कार केला. इतर कुणालाही रामराम न करतां नुसतें तोंडानें रामराम म्हणून तो बापापाशीं जाऊन बसला. तेव्हां सर्व गांवधन्यांनीं, जमादारानें व गंगारामनेंही तिरस्कारपूर्वक त्याच्याकडे पाहिलें.

"अरे पोलिसपाटील!" जमादारानें ऐटीनें हांक मारली.

"जी साहेब!" गंगाराम उठून हात जोडून उभा राहिला.

"सर्व वहिमी लोक आले का?"

"आले साहेब!"

"यांतला रघुनाथ रामजी राणे कोण?" जमादारानें समोरच्या लाल खारव्याच्या फडक्यांतील दप्तरांतून एक कागदांचें जुडगें उचलून घेऊन त्यावरून नजर फिरवीत विचारलें.

"हा साहेब!" असें म्हणून गंगारामनें रगुनाथकडे अंगुलिनिर्देश केला. मग लगेच रामरावाकडे बोट दाखवून म्हटलें, "आणि हा रामजी संभाजी राणे—रघुनाथचा बाप."

रामरावाच्या पोटांत भीतीनें धडकी भरली. रघुनाथनें कपाळाला आंठ्या घातल्या. बाकीचे सर्व, कोळ्याच्या जाळ्यांत कोंडून पडलेले मासे मरणाच्या भयानें एकमेकांकडे भेदरट दृष्टीनें पाहातात त्याप्रमाणें एकमेकांकडे पाहूं लागले.

जमादारानें रघुनाथकडे वळून विचारलें, "काय रे ए! पुन्हा पोलिसपाटलाशीं केव्हां मारामारी करणार? कीं तुझ्या दोस्ताच्या विचारानं पुढं काय काय करायचं तें अजून ठरायचं आहे? ते मामलेदारसाहेब जरा भित्रे होते, म्हणून तूं थोडक्यावर निभावलास. आतांचे मामलेदार चांगले खरमरीत आले आहेत. पुन्हा मारामारी कर तर खरी! मग पाहा! मी आहें आणि तूं आहेस. चांगला सेशनांतून थेट काळ्या पाण्यावर नाहीं पाठवला, तर नांवाचा खंडोबा जमादार नव्हे."

जमादाराचें तें संभाषण ऐकून रघुनाथ व दत्तू ह्या दोघांच्याही सर्वांगाचा मात्र तिळपापड झाला. पण करतात काय? तो सरकारी अधिकारी पडला.

एवढें मंगलाचरण झाल्यावर जमादार आपल्या मुख्य कामाकडे ऊर्फ आख्यानाकडे वळले. त्यांनीं हातांतल्या कागदावरून क्रमानें नांवें वाचून दाखविलीं, "रामजी संभाजी राणे. दत्तू वासू हिर्लेकर. सखाराम भिवा तांबेकर. नारू गणू आडवलकर. धाकू बाबाजी चुनेकर. तुकाराम हरि चिंदरकर. कृष्णा तात्या गावडे." नांवें वाचून होतांच जमादारानें कागद बाजूला ठेवीत म्हटलें, "तुम्ही गांवांत दंगेधोपे करतां व लोकांना तशी चिथावणी देतां, तुमच्या गांवच्या शांततेला धोका आहे असं सरकारला वाटतं आहे. त्याबद्दल तुमच्याकडून चांगल्या वर्तणुकीबद्दल जामीन कां मागू नये याचीं कारणं दाखविण्यासाठीं सरकारनं तुम्हांला नोटिस काढली आहे. आजपासून दहा दिवसांच्या आंत तुम्ही मामलेदारसाहेबांसमोर हजर झालं पाहिजे. यांत जर तुमच्या हातूनं चूक झाली तर तुम्हांला सरकारचा हुकूम मोडल्याबद्दल अटक करण्यांत येईल." लगेच गंगारामकडे वळून जमादार म्हणाला, "पोलिसपाटील! नोटिशीची समज मिळाल्याबद्दल सर्वांकडून सह्या आंगठे घे."

गंगाराम सह्या आंगठे घेण्याच्या उद्योगांत गढून गेला असतां जमादारानें दप्तरांतला आणखी एक कागद उचलून तो न्याहाळून पाहात म्हटलें, "रघुनाथ रामजी राणे, तुझ्याकडून एक वर्षपावेतों चांगल्या वर्तणुकीबद्दल शंभर रुपयांचा जामीन व शंभर रुपयांचा जातमुचलका घ्यावा असा सरकारचा हुकूम झाला आहे. उद्यां संध्याकाळपावेतों जामीन व जातमुचलका पटला पाहिजे. आमच्याबरोबर तुला देवगडला आलं पाहिजे. तोंवर काय ती तजवीज कर. नाहींपेक्षां कैदेंत जावं लागेल. 'लौकरच माघारा येतों' असं जेलरला येतांना सांगून आला आहेस कीं नाहीं? त्याप्रमाणंच तूं कुठं परगांवीं जायचं झालं तर गांवच्या पोलिसपाटलांच्या परवानगीशिवाय जायचं नाहीं.–हं! कर ह्या कागदावर सही समज मिळाली म्हणून." जमादारानें एक कागद रघुनाथपुढें करीत म्हटलें, "लिहितां येतं कीं नाहीं? नाहीं तर दाखव आंगठा!"

जमादाराचा स्वभाव विनोदी होता. त्यानें बोलतांना विनोद उत्पन्न करण्याचा प्रयत्न केला, त्याचें त्या बैठकींतील थोर लोकांना खुद्कन हसं

आलें. पण रामराव व रघुनाथ यांना मात्र डोकीवर आकाश कोसळून पडल्याचा भास झाला. रामरावाच्या डोळ्यांना तर खळ्कन् पाणी आलें.

" सरकार! आम्हां सर्वांचा असा गुन्हा तरी काय झाला?" रामरावानें दुःखानें हात जोडून रडव्या स्वरांत जमादाराला विचारलें.

" अपराध काय झाला? धन्यांच्या जमिनी फुकटंफाकटी पिकवून खायला हव्यात नाहीं? बापाचा माल! खंड देखील द्यायला नको तुम्हांला! आणि वर निर्लज्जपणानं विचारतो आहे अपराध काय झाला म्हणून! तूंच कपि इथल्या साऱ्या भांडणतंट्याच्या मुळाशीं आहेस असं दिसतं. आणि हीं तुझ्या तंत्रानं नाचणारीं भुतं!" जमादार इतर कुळांकडे बोट नाचवून म्हणाला, " धन्यांच्या जमिनी फुकट खायला हव्या आहेत नव्हे का चोरांनो तुम्हांला? एवढ्या जामीनगिरीनं नाहीं आलां ताळ्यावर तर एकेकाला पाठवतों खाशी खडी फोडायला. पोलिशी इंगा तुम्हांला अजून माहीत नाहीं!"

"आतां तुम्हीच मायबाप धनी आहां आम्हांला ह्या संकटांतून तारणारे!" रामराव बाबांना दोन्ही हात जोडून काकुळतीनें म्हणाला.

" बरं; पाहूं मग काय होतं तें. सरकारचा हुकूम तर मोडतां येत नाहीं! आतां यांतूनच काय मार्ग काढायचा तें पाहूं आपण मागाहून." बाबा डौलानें म्हणाले.

" धन्यांना धाब्यावर बसवायला हवं ना तुम्हांला? खंडबाकी द्यायला नको, कबुलायती द्यायला नकोत, एकदम मालक व्हायला हवं आहे. आपल्या हातांनीं तुम्ही आपल्या पायांवर दगड मारून घेतां, त्याला आम्ही काय करावं रे? अजूनही सोईच्या सोईनं कबुलायती देणार असलां, खंड-बाकी देणार असलां, तर तुम्हांला सूट खंड मिळेल, तुमच्या जमिनी तुमच्या-कडे राहतील, सर्व कांहीं तुमच्या आणि आमच्या सुखाचं होईल. नाहीं तर तुमचीं घरंदारं जप्तींत धरून भांडींकुंडीं रस्त्यावर ओढायची पाळी आमच्या-वर येणार आहे, त्याला इलाज नाहीं. आम्हीं तरी दम किती दिवस धरावा रे?" कुळकर्णी म्हणाले.

इतके सारे सोहाळे पार पडेपावेतों सूर्य चार घटकांवर आला. रघुनाथनें व इतर सर्वांनींही समजेवर सह्या केल्या. आंगठ्याचें कारणच फारसें पडलें

नाहीं. मोडकी तोडकी सही करण्यापुरतें प्रत्येकाला लिहितां येत होतें. एका रामरावाला मात्र आंगठा लावावा लागला. सह्या करून झाल्यावर सह्यांचा कागद गंगारामनें जमादाराच्या हातीं दिला. इतक्यांत सभामंडपाच्या दरवाजामागून नाजुक हांक मारलेली सर्वांना ऐकूं आली, "दादा! ए दादा!"

जमादार व दादा ऊर्फ गंगाराम यांनीं एकदमच तिकडे पाहिलें; व इतरांनीं तेव्हांच ओळखलें कीं, ही हांक चंद्रा भावणीची–गंगारामच्या बहिणीची आहे.

गंगाराम तसाच तिकडे गेला. जमादारानें ऐटींत आसनमांडी उलटी घालून डाव्या हातानें डाव्या मिशीच्या टोंकाला पीळ भरला.

गंगाराम आंत गेला, व एक लहानशी पितळी लोटी तिच्यावर कपबशीचें झांकण ठेवलेलें अशी घेऊन बाहेर आला, तो लगतच्या धर्मशाळेंतील एका खोलींत जमादाराचें बिऱ्हाड होतें तिकडे गेला. जमादार व शिपाई ओळखून चुकलेच होते कीं, आपला चहा आला. बाबा मनांत हळूहळू धुसफुसत होते, 'ही कशाला आली चहा घेऊन ? गंगारामच्या बायकोला कां नाहीं पाठविलं हिनं ? बाबांची भावीण शिपुड्यांचा चहा घेऊन येते, त्यांची खुषमस्करी करते असें पाहून लोक हंसायचे नाहींत का ?'

"जमादारसाहेब! चहा निवून जातो आहे." गंगाराम धर्मशाळेंतूनच हांक मारून म्हणाला.

जमादार चहा प्यायला उठतां उठतां सर्व शेतकऱ्यांना म्हणाला, "जा तुम्हीं आतां लागा आपापल्या कामाला."

शेतकीचीं कामें करणारे शेतकरी ते, काल रात्रींच्या पावसानें व पुरानें शेताची कितपत खराबी झाली, कुठें मेराधारा फुटल्या, वगैरे पाहून डागडुजी करण्यासाठीं त्यांचा जीव तिकडे ओढ घेत होता. ते सर्व उठले, व एकामागून एक धन्यांना रामराम करून घरोघर निघून गेले. रामराव तर अंतःकरणांतून नुसता तळमळत होता, त्याचा नातू तिकडे घरीं मृत्यु-शय्येवर दुधासाठीं तळमळत पडला होता. तो बाबांना दोनप्रहरीं मुद्दाम भेटतों असें सांगून व रघुनाथला घरीं जायला सांगून दुधासाठीं भावणीच्या घराकडे वळला.

रघुनाथ घरीं जाऊन पाहातो तों शंकरनें दुधासाठीं रडून रडून डोळे पांढरे करायची वेळ आणली होती. त्याला मांडीवर घेऊन जमना एकसारखी स्फुंदत होती. रघुनाथ मुलापाशीं बसून त्याची समजूत घालूं लागला, " आतां आजोबा तुला तुझ्या कापशी गाईचं ताजं ताजं दूध प्यायला घेऊन येतील. रडूं नकोस. "

तोंच रामराव आला. पण रिकाम्या हातानें. जमादाराच्या सरबराईत भावणीकडून चमचाभर देखील दूध बिचाऱ्या शंकरच्या वांट्याला आलें नाहीं !



दुसऱ्या दिवशीं हुकुमाप्रमाणें मामलेदारासमोर हजर झालेला रघुनाथ जामीन न पटल्यामुळें देवगडांतच कैदेंत होता. शंभर रुपये रोख जामीन आणि शंभर रुपयांचा लायक जामीन इतकी व्यवस्था एखाद्या गरीब शेतकऱ्यानें करायची म्हणजे त्याला ब्रम्हाण्ड आठवणारच ! ' दुसरा कोणीही आपल्या प्रसंगाला उभा राहिला नाहीं, तर मी बापटाजवळच्या सातशेंच्या सातशें रुपयांचा चुराडा करीन; पण माझ्या पोराला कैदेंतून सोडवून आणीन ' असा निश्चय करून व उमेद बाळगून रामराव देवगडीं मुलाबरोबर पोलिसांसमवेत गेला होता, तिथून लगेच पुढील तजविजीसाठीं माघारा परतला.

त्या गोष्टीला आज नववा दिवस उजाडला तरी रामरावाचा पत्ता नाहीं, म्हणून रघुनाथ अत्यंत फिकिरींत पडला होता. घरीं मुलगा मृत्युशय्येवर पडला असतांना त्याच्या दूधपाण्याची अथवा औषधपाण्याची कांहींदेखील व्यवस्था न करतांही देवावर हवाला ठेवून ते बापलेक घराबाहेर पडले होते. त्यांनीं जमादाराला पुष्कळ विनवून पाहिलें कीं मुलाला जरा गुण पडूं दे, आणि एकदोन दिवसांनीं आम्ही येतों. पण त्यानें तें ऐकलं नाहीं. त्याला मामलेदारसाहेबांची तशी परवानगी नव्हती. त्यावर जमादारानें उत्तर दिलें तें मात्र अगदीं निर्दयपणाचें होतें. तो रामरावाला बोलून गेला होता, " तुम्हां लोकांचा कुणाचा मुलगा मरायला टेकला आहे म्हणून, कुणाची बायको बाळंत व्हायची आहे म्हणून, कुणाच्या आईचं सरण जळायचं आहे म्हणून, कुणाचं लगीन लागायचं आहे म्हणून, असं तुमच्या सोयीप्रमाणें वागायला सरकार तुमच्या घरचं—तुमच्या परड्यांत पिकणाऱ्या भाजीपाल्या-

सारखं आहे का रे? तुम्हांला घरचा कारभार आणि सरकारचा कारभार एकच वाटतो नाहीं? मूर्ख कुठचे! तें कांहीं चालायचं नाहीं. जा हवी तर बायकापोरं गहाण टाकून जामीन पटवा.”

असाच प्रसंग आला, तेव्हां रघुनाथला पोलिसांबरोबर देवगडीं जाणें भागच पडलें. तो रामरावाला तेव्हां आग्रहानें म्हणत होता, “तुम्ही येऊं नका, मुलाकडे लक्ष द्यायला घरांत कुणी नाहीं. मी दोन दिवसांत माघारा आलों नाहीं आलों तर तुम्ही कुणाला तरी चौकशीला पाठवा.” पण म्हाताऱ्याचा जीव राहीना आणि दोन्ही सुनांनींदेखील त्यांना सांगितलें कीं, मुलाला आम्ही सांभाळतों, दत्तूला जातांना सांगून जा म्हणजे झालें. बायकांचेंही बरोबर. आतां रामरावाचें म्हातारपण झाल्यामुळें त्याचा संसार म्हणजे एकट्या रघुनाथच्या जिवावरची एकखांबी द्वारका होती. त्या द्वारकेच्या वांसेतुळयांना जपायच्या अगोदर त्या आधाऱ्याला जपणेंच अवश्य होतें.

पण रामराव गेला तो त्याला नुसता हिसका मात्र पडला. जामीन पटे-पावेतों रघुनाथला कैदेंत राहणें भाग होतें, व जामिनाची व्यवस्था करण्या-साठीं रामरावालाही धडपड करणें भाग हीतें. तो ‘दोन दिवसांत जामीन पटवतों, आणि तुला सोडवून नेतों. काळजी करूं नकोस’ असा रघुनाथला धीर देऊन मोठ्या ईर्षेनें बाहेर पडला होता. आणि बिचारा रघुनाथ देव-गडच्या ठाण्यांत काळजीनें झुरत बसला होता. त्याला कुठें बाहेर जाण्याची मोकळीक नाहीं, आणि रामरावाचा तर पत्ता नाहीं! एकसारखे काळजीच्या कुऱ्हाडीचे घाव रघुनाथच्या हृदयावर बसावे, ‘बाबांना जामीन भरायला पैसे मिळाले नसतील, सावकारानें त्यांना धुडकावून लावलें असेल, म्हणून इतका उशीर लागला असेल का? कीं ते आजारी असतील? कीं शंकरचें कांहीं बरें वाईट झालें असेल?’

निदान आज आपल्याबरोबरचे गांवचे इतर शेतकरी आपल्या जामिन-कीचा प्रश्न निकालांत काढण्यासाठीं येतील, या आशेनें रघुनाथ आज सकाळपासून त्यांच्या वाटेकडे डोळे लावून होता. ते लोक आले तर त्यांची आपणाला भेट करून द्या, अशी त्यानें तिथल्या मुसलमान नाइकाला विनंति

केली होती, व ती त्यानें दयाळु अंतःकरणानें मान्यही केली होती. त्याची मनधरणी करण्यासाठीं त्यानें त्याचे व त्याच्या मुलांचे जोडे साफ करण्याचें काम त्याच्या सांगण्यावरून आरंभलें होतें.

परंतु रघुनाथ जरी नाइकाचे जोडे खुषीनें पुशीत होता, तरी त्या खुषीच्या मागें परिस्थितीची सक्ती त्याला जाणवत होती. पाण्याच्या पोटांत आग अदृश्यपणें धुमसत होती. प्रत्येक क्षणीं रघुनाथचें मन त्याला टोंचीत होतें, 'मुसलमानाचे जोडे साफ करायचा प्रसंग तुझ्यावर यायला कारण कोण ? इतकी तुझी वाताहात उडवायला कारण कोण ? तुझा धनी !'

अशीं एकामागून एक दुःखें आठवीत व नाइकाचे जोडे साफ करीत रघुनाथ बसलेला असतांना दत्तू त्याच्या अपेक्षेप्रमाणें सकाळीं साडेआठ वाजायच्या सुमाराला तिथें येऊन पोहोंचला.

"दत्तू ! कशी आहे रे माझ्या शंकऱ्याची प्रकृति ?" रघुनाथनें पहिला प्रश्न केला.

"त्याची प्रकृति कांहीं ठीक नाहीं. परवांची रात्र तर आम्हीं जागून काढली. काल संध्याकाळीं देखील मी तुझ्या घरीं जाऊन आलों. तेव्हांही त्याची प्रकृति तशीच होती. अजून कांहीं गुण नाहीं. आज आम्हांला इकडे यायला मोठ्या पहांटेला निघायचं असल्यानं रात्रीं मात्र मला तिकडे जातां आलं नाहीं." दत्तू उत्तरला. तरी तो पुष्कळ सांभाळून बोलला. त्याची तर अशी अटकळ होती कीं गेल्या रात्रींतच बहुतेक पोरगा खलास झाला असेल.

तशीच अमंगळ शंका अंगावर पाल पडावी त्याप्रमाणें रघुनाथच्याही मनांत आली. ती गिळून त्यानें विचारलें, "आणि बाबांचा काय पत्ता ? ते दोन दिवसांत इकडे येणार होते जामिनकीची व्यवस्था करायला, ते अजून आले नाहींत. आहे तरी काय खबर ?"

"खबर कसली ? सावकाराकडून त्यांना अजून तरी कांहीं पैसे मिळाले नाहींत. आज देतों उद्यां देतों असं एकसारखं चाललं आहे. बाबा देसाई जामीन पाहून देणार होते, त्यांनींही अशीच टोलवाटोलवी चालविली आहे. ते म्हणतात कीं, कबुलायत देतोस तर जामीन राहतों. पण ते कांहीं रामजी-बाबा करायला तयार नाहीं. कारण त्यानं एकानं तसं केलं, कीं साऱ्या गांवाचं वाटोळं व्हायला मग उशीर नाहीं.

" बरोबर आहे. म्हणूनच प्राण गेला तरी साऱ्या गांवाला जाचेल अशी ती गोष्ट करायची नाहीं, असं मींदेखील बाबांना सांगितलं आहे. पण आमच्या दहीबावच्या सावकाराची मात्र मला मोठी चीड येते. आमचे पैसे असून आम्हांला वेळेवर त्यांचा उपयोग नाहीं म्हणजे काय ? "

" तें कांहीं विचारूं नकोस. पण रामजीबाबाही आतां सावकाराच्या भरंवशावर बसून नाहीं. तो गांवांत प्रयत्न करतो आहे. पण कुणी मदतीला उभा राहील तर शपथ ! ज्याला त्याला काय वाटतं कीं धन्याच्या नावडत्या कुळाला मदत केल्यानं धनी बिथरतील.. कालच रामजीबाबा कुठें परगांवीं सोय पाहण्यासाठीं गेला आहे. आज सांजपावेतों कसंही करून इथं येतों असं तो सांगून गेला आहे. "

" म्हणजे, बाबा गांवीं नाहींत ? आणि मग मुलाजवळ कोण ? "

" भगवान !—एका दोघांना मीं सांगून ठेवलं आहे तुझ्या घराकडे लक्ष ठेवायला. ते काय करतील तें खरं. एक मात्र आम्हीं केलं आहे. समज, रामजीबाबा आज सांजपावेतों आला नाहीं, तर कचेरी बंद व्हायच्यापूर्वी कसंही करून तुझा जामीन पटला जाऊन तूं मोकळा होशील अशी व्यवस्था आम्हीं केली आहे. "

" काय व्यवस्था केली आहे तुम्हीं ? "

" केली आहे कांहींतरी. मीं माझीं भांडीं गहाण ठेवून आठ रुपये जमवले, तसेच कुणी बायकोची पुतळी, तर कुणी गाठलं, तर कुणी मोतीं गहाण ठेवून, असे एकूण साठ रुपये गोळा केले आहेत. आणि चाळीस रुपये कालच सखारामला त्याच्या भावाकडून मुंबईहून आले ते अनायासें उपयोगी पडले. अशी शंभर रुपयांची भर आम्हीं केली आहे. आणि कैंजळवाडीचा जोतीबा पाडावा शंभर रुपयांना जामीन राहायला तयार झाला आहे. "

" पण तो कुळकर्ण्यांचं कुळ आहे ना ? हें कुळकर्ण्याला कळलं तर—"

" म्हणूनच त्याला आम्हीं आमच्याबरोबर घेऊन आलों आहों. बाकी, तो कुळकर्ण्याला तितकासा भीत नाहीं म्हणा ! त्यानंच उलट कुळकर्ण्याला गेल्या सालीं पांचशें रुपये कर्जाऊ दिलेले आहेत. रामजीबाबा आला आणि

कांहीं व्यवस्था झाली तर ठीकच, नाहींपेक्षां आपलं तुझ्यापुरतं तरी अडत नाहीं खास. आम्हीं गंगारामलाही विचारलं कीं फंडांतले पैसे कांहीं शिल्लक असतील ते दे. पण तो म्हणाला कीं शिल्लक एक पै देखील नाहीं. उलट आपलेच पैसे मोजणीदारांना दूध आणि अंडीं—कोंबडीं आपण पुरविलीं ते वसूल व्हायचे आहेत म्हणाला."

"बरोबर आहे! त्यानं तसंच म्हणायचं. बरं, बाकीची मंडळी कुठं आहेत?"

"वकिलाकडे गेली आहेत. जोतीबाही त्यांच्याबरोबरच गेला आहे. तुझ्याबरोबरच आमच्यावरसुद्धां घोरपड आलेली आहे ना? ती नको का निस्तरायला? बरं, आतां मी जातों तिकडे. संध्याकाळीं पारभर दिवसाला आमचं काम झाल्यावर येऊ आम्ही. कांहीं काळजी करूं नकोस." असें आश्वासन देऊन दत्तू तिथून निघून गेला.

त्या दिवशीं रघुनाथला जेवण देखील सुचलें नाहीं. खानावळींत त्याला नेण्यासाठीं पोलिस शिपायी आला, पण त्यानें भूक नसल्याचें सांगितलें.

हां हां म्हणतां सायंकाळपावेतोंचा वेळ निघून गेला. रघुनाथ चातकाप्रमाणें दत्तूची व इतर गांवकऱ्यांची केव्हांपासून वाट पाहात होता.

अखेर एकदांची गांवकरी मंडळी मामलेदाराकडचें काम आटोपून भेटायला आली. तेव्हां रघुनाथच्या अंमळ जिवांत जीव आला.

"रामजीबाबा अजून आला नाहीं?" दत्तूनें विचारलें.

"नाहीं आले बाबा." रघुनाथ उत्तरला.

"नाहीं तर नाहीं. आपण आटपून टाकूं सारं काम. चला मामलेदारसाहेबांकडे." जोतीबा म्हणाला.

"आणि बाकीच्यांचं काय झालं?" रघुनाथनें विचारलें.

"सर्वांनीं जामीन हे दिलेच पाहिजेत. आठ दिवसांची मुदत मात्र मिळाली आहे." दत्तू उत्तरला.

"आणि बाबांचं काय झालं?" रघुनाथनें प्रश्न केला.

"तो हजर न झाल्यामुळें त्याला पकडसमान सुटेल. त्यापूर्वीं तो येऊन आपण होऊन हजर झाला तरी चालेल. तें काय करायचं तें आपण गांवीं

गेल्यावर पाहूं. अगोदर तुझं काम तर आटोपून घेऊं!" असें म्हणून दत्तू जोतीबाला घेऊन मामलेदाराकडे गेला. कचेरी बंद होण्याच्यापूर्वी त्याला रघुनाथसाठीं जामीनकी पटवायची होती.

थोड्याच वेळांत मामलेदारच्या हुकुमावरून रघुनाथला पोलिसांनीं मामलेदारासमोर नेऊन उभें केलें. जोतीबानें दत्तूच्या हातून मिळालेले रोख शंभर रुपये मामलेदारासमोर मांडले, व आपला खातेउतारा वगैरे कागदपत्र दाखवून आपण दरसाल अडतीस रुपये शेतसारा भरतों अशी मामलेदाराची खात्री करून देऊन रघुनाथला जामीन राहण्याची तयारी दर्शविली. मामलेदार प्रथम कां कूं करीत होता. तो जोतीबाची लायकी सरळपणें मान्य करायला तयार होईना. पण प्रश्न फक्त शंभर रुपयांच्या जामीनकीचा होता. ते शंभर रुपये जोतीबानें पाहिजे तर रोखही देण्याची तयारी दर्शविल्यावर मामलेदाराचा नाइलाज झाला. आतां अडचण उरली त्याच्या हाताखालच्या कारकुनाची. पण त्याचा हात दत्तूनें जरा रुपेरी पाण्यानें ओला केल्यावर तीही अडचण दूर झाली.

जामीन रीतसर पटला, व रघुनाथ मोकळा झाला. पण मामलेदारानें जोतीबाला मात्र जातां जातां एक विषारी टोमणा मारला, " तूं ह्या गुंडांचा दादा आहेस नाहीं का ? ठीक आहे. "

तरी रघुनाथचें सुदैव, कीं मामलेदारानें हे शब्द जामीन पटायच्या अगोदर उच्चारले नाहींत. ते जर अगोदर उच्चारले असते, तर जोतीबा जामीन राहायला खास तयार झाला नसता.

ती मंडळी मामलेदार कचेरींतून बाहेर पडते, तोंच रामराव धापा टाकीत काठी टेकीत तिथें येऊन पोहोंचला. त्याला लेकासाठीं जामीनकीची कोणतीच तयारी त्या क्षणापावेतों करणें शक्य झालें नव्हतें. पण गांवीं जातांच जोतीबा जामीनकीसाठीं उभा राहिला आहे हें त्याला कळलें, त्याबरोबर जरा धीर धरून तो इतका धांवत धडपडत तिथें आला होता.

" शंकऱ्या कसा आहे ? " रघुनाथनें प्रथम विचारलें.

" आज सकाळींच त्याला गेल्या चार दिवसांत पहिल्यानें जरा झोंप लागली आहे. " रामराव उत्तरला.

रघुनाथला व सर्वांनाच तें ऐकून जरा समाधान वाटलें. कारण शंकरची आशा फारशी कुणालाच नव्हती. लगेच रामराव मामलेदारासमोर हजर झाला. जो निकाल इतरांच्या बाबतींत, तोच त्याच्याही बाबतींत व्हायचा हें ठरलेंच होतें. उशिरां आल्यामुळें त्याला जमादारापासून मामलेदारापावेतों प्रत्येकाच्या शिव्या खाव्या लागल्या. तरी पण पकड वारंटाअन्वयें शिपायांच्या हातीं कैद होऊन ठाण्यावर येण्याचा प्रसंग त्याच्यावर आला नाहीं, हें काय थोडें झालें ?

सूर्य मावळण्याच्या बेताला आला. तरी देखील रामरावानें नातवासाठीं ताबडतोब घरीं जाण्याचा हेका धरला. इतरांना त्याचा शब्द मोडवेना. नातवासाठीं कर्पुरार्कांची बाटली तेवढी त्यानें बाजारांतून जाऊन आणली, आणि सर्वजण तसेच रातोरात काजरोळीला जायला निघाले.

देवगडाहून काजरोळीला माघारीं जातांना पुन्हा तोच विषय निघाला. सर्वच्या सर्व लोकांना जामीन भरावे लागणार हें आतां निश्चित झाल्यामुळें प्रत्येकजण खवळला होता. त्या आवेशांत दत्तूनें विषयाला तोंड पाडलें, " माझी अशी खात्री आहे कीं आमच्यांकडून जामीन जे मागण्यांत आले, त्यांत बाबा वळचणकर, कुळकर्णी, मिराशी ह्या तिघांही धन्यांचें अंग असावं. त्यांनीं आमच्यावर ज्या खोट्या फिर्यादी केल्या आहेत, त्यामुळं आम्ही चिडून गांवांत दंगाधोपा करूं, ह्या भयानं त्यांनीं खोट्यानाट्या चहाड्या करून ही धोंड आमच्या उरावर लोटली असली पाहिजे. "

" मग तुझा विचार काय ? किरडुवाला तुम्ही दगडाखालीं चेंचूं लागलां तर त्यानें स्वतःचा जीव वांचवायसाठीं तुम्हांला डसायला डोकी वर करूंच नये ? " रघुनाथनें विचारलें.

" पण किरडूं आपला जीव बचावण्यासाठीं धडपडतं तसंच आम्हांलाही त्याची दावेदार जात ओळखून त्याच्यापासून स्वतःला बचावायला नको काय ? " सखारामनें प्रश्न केला.

" तें आपण समजतों तितकं सोपं नाहीं. तुम्ही समजतां त्यापेक्षां हीं किरडुवं किती तरी भयंकर विषारी आहेत. असल्या विषारी जनावरांच्या वर्मीं घाव पडला तरच लागू पडतो, नाहींपेक्षां तीं जनावरं चिडून उलटून आपला चावा घ्यायला कमी करीत नाहींत. " रघुनाथ उद्गारला.

"गड्या! असं भिऊन आपला मुळींच पल्ला यायचा नाहीं. नुसतीं किरडुवं नव्हेत तीं, साप आहेत ते. ते दावा धरल्यावर डसेपावेतों पिच्छा सोडायचे नाहींत. त्यापेक्षां एकदां काय तो निकाल लागलेला बरा नाहीं का? मी तर म्हणतों, आपण फांशी गेलों तरी बेहेत्तर. पण ह्या सगळ्यांचा एकदम कांटा काढून टाकावा." दत्तू म्हणाला. त्याला रामराव व जोतीबा यांच्याखेरीज बाकीच्यांनीं कमीअधिक पाठिंबा दिला.

रघुनाथ त्यावर सर्व मोठ्या माणसांना उद्देशून म्हणाला, "वडील माणसं आहां तुम्ही सारीं; तुम्हांला मी खुळे आहां झालं असं कसं म्हणूं?—"

"तूं नको म्हणूंस, मी म्हणतों." जोतीबा म्हणाला, "खुळे तुम्ही नसतां, तर त्या गंग्या देवळ्याच्या नादीं कशाला लागलां असतां? तो कैवार घेतो आहे तुमचा. पण आहे भटाचा लेकावळा–तुमचे सारे बेत तो ऐकतो आणि धन्यांना जाऊन सांगतो."

"सांगूं दे. आजवर गांव फसला म्हणून यापुढेंही फसेल कीं काय?" नारू म्हणाला.

"पण आजवर फसलां त्याचं काय?" कृष्णानें विचारलें.

"ते कांहीं असलं तरी मला एवढं कळतं, कीं आपली ताकद पाहून आपण वागलं पाहिजे. तितकी एकजूट आहे का तुमच्यांत? साधी गोष्ट घ्या. कुळांनीं धन्यांना एक साल खंड द्यायचा नाहीं असं ठरलं, तर तो नियम देखील अनेकांच्यानं पाळवला नाहीं. जो उठला तो शेजाऱ्याच्या पोटावर पाय देऊन पुढं जायला तयार. इतकी देखील एकजुटीनं झीज सोसायची आपली तयारी नाहीं; मग ह्या पुढच्या गोष्टी कशाला?" रघुनाथ म्हणाला.

ते रघुनाथचे उद्गार तुकाराम चिंदरकर व तात्या गावडे ह्या दोघांनाही झोंबले. धन्यांना वर्षभर खंड द्यायचा नाहीं असा साऱ्या गांवांतील शेतकरी कुळांच्या सभेंत शपथेवर निर्धार झाला असतांना त्या दोघांनींच ती अट मोडून थोडाफार खंड धन्यांना घातला होता.

तुकाराम म्हणाला, "मीं खंड घातला खरा थोडा. पण मी कांहीं त्या दिवशीं तुमच्या सभेला हजर नव्हतों, आणि शपथही कांहीं मीं घेतली नव्हती.—"

“शपथ मींही घेतली नव्हती.” तात्या म्हणाला.

“अरे! पण तुम्हीं शपथ घेतली नव्हती याचा अर्थ आम्ही बाकीचे सारे शपथ घेणारे मूर्ख काय? आम्हांला काय माणुसकी नव्हती?” नारू म्हणाला.

“असं कुठं म्हटलं आम्ही?” तुकाराम आपल्या व तात्याच्याही वतीनें म्हणाला, “गांव करील तें आम्हांला मान्यच आहे. गांवांत पट्टी जमा केली, तेव्हां आम्ही नाहीं का सगळ्यांपेक्षां जास्त पट्टी दिली? आम्हीं नाहीं का किती तरी गरीब कुळांना मिरगाच्या वेळीं सवाईला भात–नाचणे देऊन त्यांच्या वेळा निभावून नेल्या?”

“मी फक्त धन्यांना खंड देण्याबद्दल बोलतों. तुमच्यासारख्या मोठ्या लोकांनीं तो नियम पाळला असता, म्हणजें बाकीच्यांना तो पाळायला धीर आला असता. तुम्ही श्रीमंत झालां, म्हणून गांवाविरुद्ध जाऊन तुमचा पल्ला येईल काय?”

“थांब.” तात्या मध्येंच रघुनाथला थांबवीत म्हणाला, “माझं अगो-दर ऐकून घे, आणि मग बोल. कुळांनीं धन्यांना खंड कां देत नाहीं म्हणून सांगायचा? सवड नाहीं म्हणून अथवा शेत नीट पिकलं नाहीं म्हणून ना?”

“तें खोटं बोलायचं तुझ्या जिवावर आलं असेल!” दत्तूनें मध्येंच टोमणा हाणला. रघुनाथनें त्याला हळूच चिमटा घेऊन गप्प राहण्याची सूचना दिली.

“खऱ्याखोट्याचं नाहीं कांहीं मोठंसं. पण माणसानं शोभेल तेंच बोलणं बरं नाहीं का? आम्हांला सवड नाहीं अथवा अडचण आहे असं आम्हीं सांगितलं असतं, तर त्यावर धन्यांचा विश्वास बसला असता का?” तुकारामनें प्रश्न केला.

“म्हणतों काय; तुम्ही श्रीमंत आणि तुमचे धनी श्रीमंत. श्रीमंतांना श्रीमंतांच्या विश्वास–गैरविश्वासाची पर्वा! पण आम्हां गरिबांना धन्यांच्या विश्वासाशीं काय करायचं आहे? लांडग्याचा विश्वास धरून कोकरांचा कधीं पल्ला आला आहे? आमचंच पाहा कीं! आज किती पिढ्यांपासून वृंदावन आमच्या घराण्यांत खंडानं आहे बरं? मूळ नुसता डोंगर आणि

आणि खराबा होता. दोन दोन पुरुष रान वाढलं होतं त्या जागीं. फार जुनी गोष्ट सांगत नाहीं मी, माझ्या आजोबांच्या वेळीं पाहिलेला प्रकार सांगतों आहें.—"

रघुनाथचें बोलून संपण्यापूर्वीच रामराव म्हणाला, "माझ्या लहानपणापासूनचं मला आठवतं आहे. वृंदावनचा खंड तेव्हां सारा पांच मण होता. नदीकांठच्या मळ्यांतल्या फाळ्यांत तेवढं भात पिकत असे. बाकीची थोडीशी वरकस जमीन होती. त्यांत थोडीशी वरी, नाचणा, सावा असं कांहीं तरी पिके झालं. झाडंपेडं सारीं माझ्या लहानपणीं आमच्या हातून लागलीं आहेत. माझ्या बाबांनीं कवळकाड तोडून डोंगर फोडून जमीन पाडली, नंतर कांही आम्हीं पाडली. तुम्हांला माहीत नसेल, माझा आजोबा याच शेतांत जमीन पाडतांना फुरसं चावून मेला. आणि माझ्या एका आत्तेला ती वर डोंगरावर कवळं तोडीत असतांना वाघानं ठार केलं होतं. पांच मणांचा खंड आठ मण रावसाहेबांच्या वडिलांनीं केला. आठ मणांचा बारा मण रावसाहेबांनीं केला. आणि झाडं धरूं लागल्यावर त्यांची निराळी किरण मागितली. माड, पोफळी आम्हीं जमीन पाडून तिच्यांत लावल्यावर व तीं झाडं धरूं लागल्यावर तें बागाईत झालं; म्हणून त्यांनीं आमच्यावर आणखी खंड वाढवला. प्रथम तोंडानं नुसतं म्हणाले होते कीं जमीन तुम्ही पाडा आणि बारा वर्षे फुकट पिकवून खा. पण जमीन तयार होऊन पीक येऊं लागल्यावर दुसऱ्याच वर्षापासून खंड वाढवायला सुरुवात केली. आतां सांगा, धन्यांचा विश्वास कुठं राहिला? 'इतका खंड आमच्या जमिनीचा द्या, नाहीं तर चालूं लागा. तुम्ही नाहीं तर तुमचे काका सत्रा आहेत' ही काय बोलायची भाषा झाली? ज्या जमिनींतून पैचंही उत्पन्न होत नाहीं, अशा जमिनी लागवडीला आणायच्या आम्हीं; आणि जमीन जरा कुठं पिकूं लागली कीं मात्र ती हिसकावून घ्यायला धनी पुढं! शेतकऱ्यांच्या श्रमांखेरीज जमिनी आपोआप पिकत असतील, तर धन्यांना म्हणावं, नदींतले गोटे आणि कातळ फोडून खा, गवत—कवळकाड तोंडीं लावा, आणि केळींचे सोपाटे, पोफळींच्या विऱ्या नाहीं तर माडाच्या सावळी नेसा जा पाहूं कशा नेसतां त्या!—"

"पण केळीचें सोपाटे आणि माडाच्या सावळी नेसायला झालं तरी मुळांत तीं झाडं अगोदर कुणींतरी लावायला हवींत ना?" दत्तूनें मध्येंच विचारलें.

"हो! नाहींतर कुंभ्याच्या साली नेसा म्हणावं!" सखाराम हंसून उद्गारला.

"पण कुंभ्याच्या साली तरी सोलतां कुठं येतात धन्यांना आणि श्रीमंतांना? कुंभ्याचीं झाडं रानांत फुकटचीं रुजलीं, तरी तीं झाडं कांहीं आपल्या साली सोलून नेऊन धन्यांच्या घरीं पोंचवीत नाहींत!" नारू थट्टेनें म्हणाला.

"अरे! जमिनीच्या जिवावर इतकं जगायची गोष्ट कशाला? श्रम करवत नाहींत आणि जगतां येत नाहीं म्हणून सर्व आयतखाऊ धन्यांनीं काजरा खाऊन मरायचं मनांत आणलं तरी देखील काजऱ्याच्या बिया आणायसाठीं काजरघाटीवर जायला हवंच. निदान आड्यांतल्या काजऱ्याखालच्या बिया शोधायचे तर श्रम घ्यायला हवेच!" कृष्णानें त्या विनोदांत भाग घेतला.

"यावरून काय ठरलं, कीं माणसाला पोटासाठीं श्रम केले पाहिजेत; तरच जगांत कुणालाही सुखानं जगायचा अधिकार आहे व आयुष्यांत सुखाची आशा आहे. आतां मला सांगा, आमचे हे धनी आज पिढ्यान्‌पिढ्या कांहीं देखील श्रम न करतां कसे रे चैनींत जगतात? तुम्हां आम्हांला मरेमरेतों सहाकाळ बारामास शेतांत खपून, आमच्या बायकोपोरांनाही खपवून आमचीं पोटं जाळायला मारामार पडते; आणि धन्यांना कांहीं श्रम न करतां भावणी नायकिणी देखील पोसतां येतात. आजची आपली स्थिति पहा ना! धन्यांना वाटली कुळांतल्या एखाद्या गरिबाची बाईल आंगाखालीं आणावीशी, कीं तिला लुगडेंचोळीची भूल धनी घालतो. हा आमच्या बायकांना भुलवायसाठीं लुगडंचोळीला लागणारा पैसा धन्याला आमच्याकडूनच घरबसल्या मिळतो कीं नाहीं? धन्याचीं रांडापोरं चैनींत दिवस काढतात म्हणजे तरी काय? आम्ही आमच्या बायकापोरांसह शेतांत राबूनच त्या रांडापोरांना पोसतों कीं नाहीं? आमच्या पोरांनीं दुधासाठीं घरांत तडफडून मरायचं, आणि आमच्या गोठ्यांतल्या दुभत्या गाई धन्यांनीं

ओढून नेऊन आपल्या रांडापोरांच्या चैनीसाठीं त्यांच्या दारीं बांधायच्या!"

मुलाची कल्पना मनांत येतांच एकदम रघुनाथचा कंठ दाटून आला. त्याच्या तोंडून शब्द उमटेनासा झाला. शंकरची तिकडे काय गत झाली असेल या अमंगळ भीतीचा नवा धक्का अगोदरच जायबंदी झालेल्या त्याच्या हृदयाला चांगलाच जाणवला. रामरावाचीही तशीच अवस्था झाली. त्यानें कापराच्या अर्काची बाटली आपल्या बंडीच्या खिशांत नीट शाबूत आहे कीं नाहीं तें उगीच एकवार चांचपून पाहिलें.

"आणि न्याय उलटा पहा कसा! माझ्या नातवाला विकतचं दूध मागायला गेलों तरी भावीण नाहीं म्हणाली. कारण जमादाराच्या चहापाण्यांत दूध सारं खलास!" रामराव उद्गारला.

"म्हणजे धनी आमची गाय गोठ्यांतून ओढून नेणार, आणि जमादाराला तिचं दूध पाजून त्याला मिंधा करून आमची छळणूक करायला—आमच्या आईमाईचा उद्धार करायला त्याला जोर आणणार!" दत्तू म्हणाला.

रामराव सर्वांना उद्देशून म्हणाला, "बाबारे! काजऱ्याचं रोप दुधानं शिपून वाढवलं तरी त्यावर फळं धरायचीं तीं विषारीच असायचीं."

तात्याबा म्हणाला, "आम्ही मुद्दाम मागं राहिलों अशासाठीं, कीं उगाच धन्यांच्या डोळ्यांवर यायला नको. पण आतां कळून चुकलं कीं ज्या अर्थी सारे धनी इतके जिवानिशीं आमच्या अब्रूवर उठले आहेत त्या अर्थी आतां गय करून उपयोगी नाहीं."

"मला देखील तसंच वाटतं. गेले तर गेले कांहीं लोक फांशी. जन्माला आलेल्या प्राण्याला आज ना उद्यां मरायचंच आहे. उद्यां मरायचं तें आज मेलं. रयत तरी सुखी होईल त्यामुळं." तुकाराम म्हणाला.

सर्वच जण धन्यांवर तेव्हां संतापले होते. त्या सर्वांनाच ते अत्याचाराचे भयंकर बोल थोड्या फार प्रमाणांत पटले. त्याला अपवाद असे काय ते दोघे—एक रघुनाथ व दुसरा जोतीबा. रामरावाचें त्या बोलण्यांत लक्षच नव्हतें. तो तिथें असून नसल्यासारखा होता. जोतीबाच्या अंगावर मात्र ते विचार ऐकून कांटा उभा राहिला. त्यानें वारंवार बोलून सर्वांची समजूत घालायचा

प्रयत्न केला. पण ‘ जोतीबाबा! तूं म्हाताऱ्यानें यांत मन घालूं नये. स्वस्थ बसावें! ’ असें दत्तूनें त्याला सांगून गप्प बसविलें होतें. आपलें ह्या मंडळींत कांहीं चालत नाहीं असें पाहून त्यानें जरी तोंड आवरलें, तरी त्याचें पुंजीधारी मन मात्र त्याला आतां सावधगिरीची सूचना देऊं लागलें होतें, ‘ गड्या! तूं ह्या लोकांच्या तंत्रानें वागतोस असें धन्यांना दिसून आलें तर ते तुझे अकारण शत्रु होतील आणि तुला पावलोपावलीं नडवूं लागतील. पोलिसांचा ससेमिराही तुझ्यामागें लागेल. मामलेदार आजच तुला ‘ गुंडाचा राजा ’ म्हणाला तें ऐकलें नाहींस का? आणि आतां तर तूं रघुनाथला जामीन आहेस...’

त्या खवळलेल्या लोकांची समजूत घालायला रघुनाथला भगीरथ प्रयत्न करावे लागले. त्यानें तात्याबा व तुकाराम यांना उद्देशून म्हटलें, “ तुमची गोष्ट निराळी आहे, आणि आमच्यासारख्या दरिद्री शेतकऱ्यांची गोष्ट निराळी आहे. प्रसंग आला तर तुम्हांला धन्यांच्या जमिनी अजिबात सोडून देऊन धन्यांची कुचंबणाही करतां येईल. पण धन्यांना कांहीं पोटासाठीं तुमची अडवणूक करतां यायची नाहीं. सरकारदरबार करायचा झाला तरी तुमच्यापाशीं पैसा आहे. चांगला वकील पसाभर रुपये देऊन तुम्हांला आपल्या बाजूनें भांडायला उभा करतां येईल. पण आम्ही पैसेवाले कुठें आहों? असला भलतासलता अत्याचार करून फांशी जायची पाळी आमच्यावर आली, तर आम्हीं तसला वकील कुठून द्यायचा? मग आमचीं बायकापोरं अन्नाविणं तडफडून मरतील त्याची काय वाट?

“ महात्मा गांधी देखील सांगतात ना कायदेभंग करावा म्हणून?” नारू म्हणाला.

“ पण महात्मा गांधी कांहीं खून करावे असं सांगत नाहींत. असल्या अत्याचारांचं गांधींना अगदीं वावडं आहे ” रघुनाथ म्हणाला.

“ खून करावा असं गांधी सांगत नाहींत याला कारण खून करून पचवायला लोकांच्या आंगीं बळ नाहीं म्हणून! पण समजा, आमच्या जिवावर— आमच्या बायकांच्या अब्रूवर देखील श्रीमंत धनी घाला घालूं लागले, आम्हांला बळजबरीनं लुटूं लागले, तरी देखील आम्ही स्वतःचं रक्षण करूं नये असं गांधी सांगत असला तर त्याला विचारून ये बरं?” दत्तू म्हणाला.

" पण केव्हां तरी ह्या धन्यांना अजिबात उडवून दिल्याखेरीज आपल्याला गतच नाहीं. तसा कायदा झाला पाहिजे मात्र.–" तात्या म्हणाला. त्याचा हा वेळपावेतोंचा आवेश आतां अमळ ओसरला होता. वर्तमानपत्रांत तसें केव्हां तरी कुठें तरी छापून आलेलें त्याला कुणीतरी वाचून दाखविलें होतें, तें आठवून तो बोलत होता.

" कायदा झाला पाहिजे हें बरोबर बोललास. तो कायदा होईल तेव्हां होईल. तुम्ही आम्ही जेव्हां कायदा करण्याइतके समर्थ होऊं, तेव्हांच्या त्या गोष्टी आहेत. आजचे कायदे श्रीमंतांसाठीं आहेत, गरिबांसाठीं नाहींत. तेही होतील म्हणा ! पण तोंवर आम्हांला आणि आमच्या बायकापोरांना जगलं तर पाहिजे ? " रघुनाथ म्हणाला.

" बरं; तें सारं झालं. पण आतां आपल्यावर धन्यांनीं फिर्यादी केल्या आहेत त्याचं काय करायचं तेवढं सर्वांच्या विचारानं आगाऊ ठरलेलं असलं म्हणजे बरं. आपला वकील म्हणाला कीं, जर तुम्हीं कुळांनीं कबुलायती दिल्या नसतील, तर धन्यांच्या फिर्यादी कांहीं केल्या टिकायच्या नाहींत. " तुकाराम म्हणाला.

" नाहींच टिकायच्या. आपल्यापैकीं कुणीं आपल्या धन्यांना अलीकडे ते मागतात तशी एकसाली कबुलायत दिलेली नाहीं ना ? " रघुनाथनें विचारलें.

" नाहीं. " सर्वजण उत्तरले. जोतीबा मात्र कांहींच उत्तरला नाहीं. पण त्याकडे कुणाचें लक्षही गेलें नाहीं.

" आम्हांला वकिलानं सांगितलं कीं सगळ्या धन्यांचा विचार आम्हांला एकसाली कुळं ठरवून गेल्या तीन सालचा खंड आमच्यापासून चोपून वसूल करायचा आहे. " बाबू चुनेकर त्या दिवशीं प्रथमच बोलला, " आणि आमच्यापैकीं कुणाकडे तर एक सालापेक्षां जास्त खंडाची बाकीच थकलेली नाहीं. "

" मग धन्यांना तीन वर्षांचा खंड कुठून मिळेल ? " रामरावानें मध्येंच प्रश्न केला.

“ वकील म्हणाला कीं त्यांना कायद्यानं तीन सालचा खंड मागतां येतो. आणि आमच्यापाशीं तर धन्यांची गेल्या तीन सालीं किंवा अगोदर देखील खंड पावल्याची एकही पावती नाहीं. ” तुकारामनें शंका काढली.

“ आमच्याकडे पावती नाहीं तशी धन्यांपाशीं आमची कबुलायतही नाहीं. पाहूं काय होईल तें. त्याची वाटाघाट आजच अधिक करून काय करायची? आज आपणाला एवढंच ध्यानीं ठेवायचं कीं यापुढं आपला सर्व गांवाचा एकविचार ठरेपावेतों पावशेर वसूल म्हणून कुणीं धन्यांना घालायचा नाहीं. ज्यानं त्यानं आपल्या वाडीवरच्या लोकांना हें नीट समजावून सांगून त्यांना आवरून धरावं. कबुलायतही कुणीं द्यायची नाहीं. प्रथम आमचं मागणं धनी कबूल करूंदेत, कीं मग आम्ही त्यांचे आणि ते आमचे. नाहींतर... तें पुढचं आपण आजच कशाला बोला? ” रघुनाथ म्हणाला.

एवढ्यांत चार घटका रात्र पडली होती. आतां ते सर्वजण बोलत बोलत रघुनाथच्या घरावरच्या काजरघाटीच्या माथ्यावर येऊन पोहोंचले होते.

“ चला सर्वांनीं काजराईसमोर हात लावून पण करून द्या कीं आतां ठरलं त्यावेगळं कुणी कांहीं करणार नाहीं म्हणून.” रामराव म्हणाला.

“ चला. ” असें म्हणून दत्तू सर्वांच्या पुढें झाला. त्यानें सर्वांच्या अगोदर हात लावून दिला. त्याचें पाहून मग रघुनाथ, त्याच्या मागोमाग रामराव, व त्याच्या मागोमाग बाकीच्या सर्वांनीं काजराईच्या पायांना हात लावून शपथा घेतल्या. जोतीबानें देखील भावनेच्या भरांत तशी शपथ घेतली. शपथा घेऊन झाल्या. सर्वजण घाटी उतरून घरच्या वाटेला लागले. तोंच घाटीच्या पायथ्याशीं जातांच त्या रात्रीच्या प्रशांत समयीं रामरावाच्या मांगरांतून जमनाची हृदयभेदक किंचाळी सर्वांना ऐकूं आली. मग लोक घरीं कसले जातात?



पोटच्या गोळ्याचें मरण हा आपणावर व आपल्या कुटुंबावर कोसळूं लागलेल्या संकटाच्या पर्वतावरचा लहानसा दगड आहे, याची तेव्हां रघुनाथ, रामराव व जमना यांना कल्पनाही नव्हती. पण कल्पनेंत न सामावणारीं संकटेंच अंधारांतल्या घावाप्रमाणें जास्त मर्मभेदक असतात.

शंकर वारला, म्हणून रडत अथवा शोक करीत बसायला रघुनाथला फुरसत कुठें होती? शंकर वारल्या दिवसापासून रामराव व जमना यांनीं आंथरूण धरल्यामुळें उलट त्याची दगदग मात्र वाढली होती. रामरावासह सर्वांचे रोखीचे जामीन मामलेदारापाशीं आठ दिवसांत पटायचे होते. ते रुपये आपसांत वर्गणी करून जमवितांना रघुनाथला व त्याच्या समदुःखी सोबत्यांना नको जन्मसा झाला. गंगाराम देवळी या वेळीं त्यांतून वगळला गेल्यामुळें तो त्यांच्या उद्योगांत कधीं मनचे तर कधीं बाबांसारख्यांच्या सांगण्यावरून बखेडे उत्पन्न करीतच होता. तरीही तुकाराम व तात्याबा यांनीं कंबरा बांधल्यामुळें सर्वांचे जामीन एकदांचे पटले. पण जामीन पटले म्हणजे तरी काय, तर ते बिचारे आठही शेतकरी घरांतल्या घरांत बंदिवान होऊन बसले! कुठें कांहीं बोलायचें नाहीं, कुठें कांहीं करायचें नाहीं. हो, न जाणो! शांतताभंग झाला असें म्हणून धनी व गंगाराम देवळी आपणाला खड्ड्यांत घालतील ही दहशत!

दंड भरून ते लोक मोकळे होतात, तोंच धन्यांनीं खंडाबद्दल व जमिनींच्या कबजाबद्दल केलेल्या फिर्यादीचा ससेमिरा त्यांच्या मागें होताच. त्या फिर्यादी दीड महिना चालून काल आज इतक्यांत निकाल जाहीर व्हायचा होता. कुळांच्या वकिलांनीं त्यांना मरे धीर दिला होता कीं, कांहीं झालें तरी आम्ही निकाल तुमच्यासारखा करून घेतों. पण आपली ही निव्वळ थापबाजी आहे, हें वकिलांनाही कळत होतें. आपण कधींच कबुलायती धन्यांना दिल्या नाहींत असें कुळांनीं निक्षून सांगितलें असतांना धन्यांनीं प्रत्येकाच्या हातची एखाददुसरी कबुलायत नेमकी कोर्टांत हजर केली, व त्या कबुलायती बनावट आहेत असें कुळांना कांहीं शाबीत करतां आलें नाहीं. आम्हीं कबुलायती मुळींच दिल्या नाहींत असें कुळांनीं सांगितलें खरें. पण बाबा वळचणकर, मिराशी, कुळकर्णी वगैरे प्रतिष्ठित जमीनदारांनीं हें कांहींतरी खोटें कर्म केलें असेल व भिकारडीं कुळेंच खरें बोलत असतील, असा विश्वास मुन्सफाला तरी कसा वाटावा? लबाडी केव्हांही पोटार्थी व गरीब अशीं हलकीं कुळेंच करतात, असा आजकालच्या भांडवलशाही श्रीमंत जगाचा ठाम समज झालेला. त्यांना देखील कुळांच्या डोक्यांत हाणण्यासाठीं कायद्याचा बडगा शोधून काढणें भागच होतें. त्यांचीं कुळें

जेव्हां कबुलायती दिल्याचें नाकबूल करूं लागलीं, तेव्हां तें सिद्ध करण्याची कायदेशीर जबाबदारी त्या फिर्यादीवर पडलीच.

तें सर्व फिर्यादी धनी आरंभापासूनच ओळखून होते व त्या अडचणीच्या निराकरणाची सर्व कायदेशीर सिद्धताही त्यांनीं केली होती. त्यांनीं त्या त्या कुळांच्या सह्या ज्या इतरत्र कुठें गुंतलेल्या होत्या त्या हुडकून काढून मुन्सबा-समोर ठेवल्या, व त्या आधारानें कबुलायती खऱ्या आहेत आणि कुळें खोटें बोलतात हें सिद्ध करून दिलें. पण असें सिद्ध करायचा त्रास देखील जीं कुळें गेलीं बारा वर्षें जातीनें स्वतः शेत पिकवीत होतीं व जीं स्वतःच गेल्या बाराचौदा वर्षांत आपल्या घरांतील कर्ते पुरुष होतीं त्यांच्या बाबतींतच धन्यांना घ्यावा लागणार होता. रामराव आजारी असल्यानें तो कोर्टांत हजर राहूंच शकला नाहीं. त्यामुळें त्याची कबुलायत शाबीत करायला बाबा वळचणकरांच्या वकिलाला मुळींच त्रास पडला नाहीं. बाकीचीं चार कुळें तुकाराम चिंदरकर, तात्याबा गावडा, दत्तू हिर्लेकर व सखाराम तांबेकर ह्या चौघांना एकसाली कुळें ठरवितांना अनुक्रमें तुकारामचा वडील भाऊ, तात्याबाचा एकत्रांतील चुलता, दत्तूचा बाप आणि सखारामचा आजोबा ह्या चौघांच्या नांवच्या कबुलायती मागच्या पुढच्या काळांतल्या पण पांच चार वर्षांच्या मुदतींतल्या हजर करण्यांत आल्या होत्या. हे चौघेही-जण त्यांच्या हयातींत त्यांच्या घरांतले कर्ते पुरुष होते, व ते सारे गेल्या पांच वर्षांत निवर्तले होते. त्या मयतांना लिहितां वाचतां येत नव्हतें हा आणखी त्यांतला विशेष! त्यांच्या ज्या कबुलायती पुढें करण्यांत आल्या होत्या, त्यांपैकीं एकीवर हरिबाचा दस्तुर होता. दोहोंवर दाजीबाचा दस्तुर होता. आणि एकीवर गंगाराम देवळ्याचा दस्तुर होता. रामरावाच्या कबु-लायतीवरही दस्तुर दाजीबाचाच होता. मयतांच्या कबुलायतींवर तर मयतांचे आंगठे देखील होते म्हणे! ते खोटे आहेत असें सिद्ध करायचें ज्ञान व सामर्थ्य बिचाऱ्या त्या मयतांच्या वारस कुळांना नसल्यावर त्यांचा बनावटपणा शाबीत कसा होणार? शिवाय दाजीबा, हरिबा व गंगाराम ह्या तिघां साक्षी-दारांनीं आपण दस्तुर केल्याचें सांगितल्यावर बाकी काय राहिलें?

अखेर कबुलायती सर्व शाबीत झाल्या. आपण नेहमीं कुळांना पावत्या देतों असें धन्यांनीं कोर्टांत ठासून सांगून साक्षीपुराव्यानें सिद्ध केल्यामुळें

कुळांकडे धन्यांचें तीन सालचें खंडाचें येणेंही शाबीत झालें. फिर्यादी धनी प्रामाणिक आहेत व कुळें लबाड आहेत असाच मुन्सबाचा कायदेशीर ग्रह झाल्याचें स्पष्ट दिसत होतें. तथापि उघड्या डोळ्यांनीं प्राण जात नाहीं म्हणतात त्याप्रमाणें खटल्याचा निकाल विचारून येण्यासाठीं सर्व कुळांनीं मिळून कालच दत्तूला देवगड येथें आपल्या वकिलाकडे पाठविलें होतें. तो निकाल ऐकण्यासाठीं दत्तू आतां येईल, मग येईल, ह्या आशेनें त्या दिवशीं सकाळीं रघुनाथच्या घराजवळील डोंगरांतल्या झरीवर रघुनाथ, तुकाराम, वगैरे समदुःखी लोक काजरघाटीकडे—दत्तूच्या वाटेकडे डोळे लावून बसले होते.

तेव्हांही त्या मंडळीचा आपसांत खल त्या फिर्यादींतील पुराव्याविषयींच चालला होता. एक म्हणाला, “मीं सही कधींच कबुलायतीवर केलेली मला आठवत नाहीं. मग धन्यांनीं फसवून एखाद्या कागदावर माझी सही कधीं घेतली असली तर नकळे.”

दुसरा म्हणाला, “मला पक्कं आठवतं, मीं कबुलायत मुळींच दिलेली नाहीं. माझी सही बनावट केली आहे. त्या दुष्ट धन्याला देव पाहून घेईल.”

तिसरा म्हणाला, “माझ्या बाबापासून कधीं धन्यांनीं कबुलायत फसवून लिहून घेतली असली तर मला माहीत नाहीं.”

चौथा म्हणाला, “माझा चुलता एरव्हीं सरळ व भोळा होता खरा; पण असल्या बाबतींत कधीं फसणारा नव्हता. हरिबानं परस्पर धन्यांना कधीं तरी कबुलायत माझ्या चुलत्याच्या नांवानं लिहून दिली असेल. कारण ते दोन फितूर अलीकडे धन्यांच्या हातीं लागले आहेत ना!”

असें कुणी कांहीं तर कुणी कांहीं म्हणाला. पण खरा प्रकार अगदींच निराळा होता. तो गंगाराम, बाबा, कुळकर्णी, मिराशी, दाजीबा, हरिबा, यांखेरीज कुणालाही माहीत नव्हता. गंगारामनें गांवच्या भानगडबाज मास्तरांना हाकलून लावायच्या मिषानें जो एक अर्ज अनेकांच्या सह्यांचा लिहून घेतला होता, त्या अर्जांत कबुलायतींच्या बनावटीचा उगम होता, व कुळकर्णी तर त्याच्या सवाई! बाबा, कुळकर्णी, मिराशी हे एरव्हीं एकमेकांचे हाडवैरी खरे. पण मोजणीदारांच्या चिथावणीनें कुळें बोकांडीं बसं

लागलीं असें पाहून कुळांना वठणीवर आणण्यापुरतें त्यांनीं परस्पर सहकार्यानें वागायचें ठरविलें होतें.

दाजीबा व हरिबा यांना वश करण्याचें काम बाबा व कुळकर्णी ह्या तिघांनीं सिद्धसाधकपणानें पार पाडलें. कुळकर्ण्यांनींच आपल्या दप्तरांतले जुने कोरे कागद बरेचसे शोधून काढले, नाचण्यांच्या शिऱ्याची काळी शाई घोटून दोन तीन प्रकारची तयार केली, आणि दाजीबा, हरिबा वगैरेंच्या साह्यानें जुन्या कागदांवर कबुलायती लिहून त्यांवर हव्या त्या सह्या गिरवून ते कागद थोडे दिवस न्हाणीघरांतील धुरांत टांगून ठेवले. दोन महिन्यांत याप्रमाणें कबुलायती उबून तयार झाल्या, व साक्षीदारही गांवगुंडी शिकवणीनें उबवून तयार करण्यांत आले. फिर्यादी दाखल झाल्या दिवसापासून संगमनाथावर अरिष्टनिवारणार्थ व इष्टप्राप्तीसाठीं लघुरुद्र–महारुद्राचीं अनुष्ठानेंही सुरू झालीं. देवदेवस्की सुरू झाली. कौल सुरू झाले. वारीं निघूं लागलीं. देवाच्या अवसरांना वारंवार पडस्थळें पडूं लागलीं. निरनिराळ्या देवांच्या नांवानें नवसांच्या लांचेची खैरात भरमसाट होऊं लागली. कांहीं म्हटल्या कांहींच मानवी, दैवी व आसुरी उपाय स्वतःचा डाव साधण्यासाठीं धनी लोकांनीं करायचा बाकी ठेवला नाहीं.

असेच प्रयत्न–फक्त खोटे कागदपत्र तयार करण्याखेरीज करून–प्रतिवादी कुळांतही जारीनें सुरू होते. पण ते फक्त देवांना अथवा समंध देवचारांना आळवून कोंबडीं–बकरे–खणनारळ वगैरे नवसांचें आमिष दाखवून प्रसन्न करण्यापुरते. वेडे कुठचे शेतकरी! त्यांना काय माहीत कीं, हे देव–समंध–देवचार शेंकडों–हजारों वर्षांपूर्वीपासून त्या गांवच्या धन्यांसारख्याच श्रीमंत व अरेराव धन्यांनीं, राजामहाराजांनीं व भटांभिक्षुकांनीं स्वतःच्या सोईनें अजाण शेतकऱ्यां–कामकऱ्यांना भेडसावून गुलामांप्रमाणें पिळून खाण्यासाठीं निर्माण केले आहेत म्हणून! तें जर त्यांना माहीत असतें, तर धन्यांप्रमाणेंच धन्यांचे देवदेवचारही लबाड, स्वार्थी व पक्षपाती आहेत हें जाणून त्यांनीं तसल्या देवभोळेपणानें आपला नाश करून घेतला नसता.

असो. याप्रमाणें ते सारे समदुःखी शेतकरी त्या झरीवर सचिंतपणें सुखदुःखाच्या–नव्हे, दुःखाच्याच–गोष्टी बोलत बसले असतांना एकदांचा

दत्तू तिथें येऊन पोहोंचला. दुरूनच त्याची उदासवाणी चर्या पाहतांच आपलें कपाळ फुटलें हें सर्वांनीं ओळखलें. पण–पण–म्हणतात ना, आशा ही अमर आहे.

दत्तू अगदीं जवळ येतांच प्रथम रघुनाथनें त्याला विचारलें, "झाला निकाल?"

"झाला निकाल! अगदीं साफ निकाल झाला. आतां आम्हांला गांवांत जिवंत राहायला नको." दत्तू जवळ एक स्वच्छसा दगड पाहून पटकन् त्यावर बसत उत्तरला.

"काय झालं?" तुकारामनें विचारलें.

"तुम्ही आम्ही सारीं एकसाली कुळं ठरलों, आणि तीन वर्षांचा खंड आम्हीं धन्यांना देणं ठरला. तो तीन हप्त्यांनीं द्यायचा. पहिला हप्ता निकाल झाल्या दिवसापासून महिन्याच्या आंत द्यायचा आहे. आणि एक हप्ता थकल्यावर सर्व हप्ते एकदम वसूल करायचा अधिकार धन्यांना आहे."

तें ऐकून सर्वांनीं 'नशीब' म्हणून कपाळाला हात लावले. एकसाली कुळें ठरल्यामुळें आपली आजवरची सर्व दगदग व पैसा मोजणीदारांना चारलेला वायां गेला, याबद्दल तर सर्वांना पराकाष्ठेची हळहळ वाटलीच; पण त्यापेक्षांही त्यांना अत्यंत चीड आली ती तीनसाली वसुलाच्या क्रूर निवाड्याची. श्रीमंतांचा कायदा व सत्ता गरिबांच्या सत्यापेक्षां किती प्रभावी आहे हें त्यांना कळून आलें.

"आमचा आजवरचा सारा खंड चुकता असून देखील हे धनी आमच्याकडून आतां तीन सालांचा खंड वसूल करणार काय?" तुकाराम आवेशानें म्हणाला.

"कुळकर्ण्यांकडेच पुढच्या खंडापोटीं तीस चाळीस रुपये बाकी निघेल इतके पैसे त्यांनीं माझ्यापासून पुढील खंडापोटीं हातउसने घेतलेले आहेत. आणि पुन्हा आमच्यावर तीनसाली निवाडा? हा कहर झाला!" तात्याबा हळहळत गोरीमोरी चर्या करीत म्हणाला.

"आणि आमच्याकडे बाकी असलीच तर ती फार फार म्हणजे गेल्या गिमांतली, किंवा गेल्या सालची असेल. हीं तीन सालें कुठचीं आलीं?" रघुनाथ म्हणाला.

" मीं फक्त गिमवसचा खंड बाबांना द्यायचा आहे. पण आतां तीन सालांचा दीड खंडी खंड बोकांडीं बसला. आतां यांना काय माझीं हाडं काढून देऊं ? " दत्तू संतापून म्हणाला, " तें कांहीं नाहीं गड्यांनो ! आतां भोळ्या भावानं व गरीबपणानं आपला पल्ला यायचा नाहीं. "

" आलं खरं कपाळीं. आतां कसं निस्तरायचं तेवढाच प्रश्न आहे. " धाकू म्हणाला.

" नुसतंच कपाळीं आलं नाहीं; आतां ह्याच घिरटींत धनी साऱ्या गांवाला भरडून काढायला कमी करायचे नाहींत. वाटोळं झालं साऱ्या गांवाचं, अगदीं तळपट झालं असं समजा. " रघुनाथ उद्गारला.

" पण आतां यांतून बाहेर पडायला रस्ता ? " दत्तूनें विचारलें.

" रस्ता आतां शोधून काढलाच पाहिजे. " एवढेंच तुकाराम त्यावर म्हणाला. पण त्याच्या शब्दांत जितका अर्थ अभिप्रेत होता, त्यापेक्षां त्याच्या चर्येवरील गंभीर छटांत अधिक अर्थ सामावलेला दिसला असता. मनुष्य तोंडानें जें बोलतो, त्या उच्चारांमागें विचारांची केवढी मोठी सृष्टि उभी असते ! ती सृष्टि समोरच्या माणसाला दिसली नाहीं, तरी तिची सावली बोलणाराच्या चर्येवर आणि भालप्रदेशावरील रेषांत उमटलेली दिसते.

तात्याबाही म्हणाला, " हो तर ! भिऊन वागायचे दिवस आतां संपले. भितां भितां जीव जायची पाळी आली आहे. आमच्याकडून खंड तर तीन सालांचा धनी चोपून वसूल करणारच; पण इतर अनेक बाजूंनीं छळायलाही ते कमी करायचे नाहींत. "

" मात्र हें कुठं बोलायचं नाहीं. सर्वांना काजराईची शपथ आहे. " तुकाराम म्हणाला.

" खरं; आणखी एक वाईट बातमी माझ्या कानीं आली आहे. " दत्तू रघुनाथकडे वळून विचारूं लागला, " काय रे रघू ! जोतीबानं यापुढं तुला जामीन राहायचं नाहीं असं ठरविलं आहे हें खरं काय ? "

" मला माहीत नाहीं. " रघुनाथ चमकून उत्तरला.

" म्हणजे ? आमची त्याची इतकी दोस्ती असतांना तो ऐन वेळीं आम्हांला असा दगा देईल तरी कसा ? कांहीं तरी गप्प उठली असेल

झालं." तात्याबा म्हणाला. त्याची भीड पडल्यामुळेंच मुख्यतः जोतीबा रघुनाथला जामीन राहिला होता.

"तरी पण तूं जाऊन एकदां चौकशी करून तर ये." तुकाराम म्हणाला.

"मला नक्की कळलं आहे कीं, जोतीबानें मामलेदाराकडे तसा अर्जही पाठवला आहे." दत्तू म्हणला.

"चौकशी करतोंच मी आतां समक्ष जाऊन." असें म्हणून रघुनाथ अस्वस्थ चित्तानें आपल्या मांगराकडे निघून गेला. घरांत बायको व बाप मृत्युशय्येवर तळमळत पडलीं असल्यानें तिकडे त्याचा जीव अधिक टांगणीला लागला होता.

"बरं; तुझ्या मथूची काय खबर?" सखारामनें एकदम विषयांतर करून प्रश्न केला.

"दसरा झाल्यावर चार दिवसांनीं तिच्या खटल्याची तारीख आहे. त्यासाठीं मी दसरा झाल्यावर रत्नागिरीला जाणार आहें." दत्तू उत्तरला.

"ती सेशनांत सुटेल का पण? जरा कठीणच दिसतं." तात्याबा म्हणाला.

"सुटली तर पाह्यचं! नाहीं तर तिचं नशीब!" दत्तू म्हणाला.

"आणि सुटली तर तुझें नशीब!" तुकाराम हंसत उद्गारला, "पण एकदां लौकर तिकडून जाऊन ये तूं. मग आपणाला सारा गांव जमवून धन्यांची घोरपड कशी वारायची याचा एकदां कांहींतरी नक्की विचार केला पाहिजे."

एवढें बोलून सर्वजण आपापल्या घरोघर गेले.

•

जोतीबानें जर खरोखरच जामीनकीला नकार दिला असला, तर आपणाला पुन्हा पोलीस पकडून नेतील, व घरांत आजारी म्हातारा आणि बायको यांची आबाळ होईल, हें भविष्य आठवीत घरीं जातां जातां रघुनाथच्या डोळ्यांसमोर आंधाऱ्या येऊं लागल्या व अन्तःकरणांत जोराची कालवाकालव सुरू झाली. तो घरीं गेला न गेलासें करून तसाच जोतीबाकडे जायला

निघाला. घरांत बाप व बायको यांना पाणी देखील द्यायला कोणी नव्हतें. रघुनाथची भावजय तिची आई आजारी असल्यानें पंधरा दिवसांपूर्वीच माहेरीं गेली होती. पण त्या दोघांना तशाच स्थितींत टाकून रघुनाथला जोतीबाकडे जाणें भाग होतें. म्हाताऱ्याच्या मनाला नवी व्यथा नको म्हणून खटल्याच्या निकालाविषयीं कांहींही घरांत न सांगतां तो तसाच मांगराबाहेर पडला.

रामरावानें त्याला विचारलें, "कुठं चाललास ?"

रघुनाथनें खोटेंच सांगितलें, "जरा नारिंग्याला जाऊन येतों वैद्याकडे. पाहूं तो तरी कांहीं उपाय सांगतो का!"

रघुनाथ औषध आणण्यासाठीं म्हणून गेला, तो आतां येईल मग येईल असे त्याच्या वाटेकडे रामराव व जमना ह्या दोघांचेही डोळे लागून राहिले होते. त्या वेळीं त्यांच्या दुःखावर डागणी देण्यासाठींच कीं काय, नारायण-शेट तिथें आला. तो मुद्दाम रामरावाकडे म्हणून आला नव्हता. वृंदावन ठिकाण बाबांनीं त्याला विकत द्यायचें ठरवून तोंडी खरेदीचा करार झाल्या-सारखाच होता. वसूल वगैरे यापुढें नारायणशेटनेंच घ्यायचा होता, व ठिकाणांत मालकी हक्कानें वहिवाटही करायची होती. रामरावाच्या जळून खाक झालेल्या घराच्या चवथऱ्यावर भोपळा—काकडीचीं आळीं लावून नारायणशेटनें आपली वहिवाट तिथें सुरूही केली होती. मात्र रामरावाला एकदम दुखवायचें नाहीं यासाठीं त्या आळ्यांतील वेलांची जतन करण्याचें काम त्यानें मुद्दाम त्याला सांगितलें होतें. रामरावानेंही इमानें इतबारें त्या वेलांची जोपासना केल्यामुळें ते वेल असे फोफावून बाजाला आले होते कीं जसे कांहीं नारायणशेटचे सातां—जन्मांचे देणेकरी!

त्या वेलांवरचे भोपळे व कांकड्या काढून नेण्यासाठीं व त्या निमित्तानें ठिकाणावर देखरेख ठेवण्यासाठीं नारायणशेट मधून मधून तिथें येई. त्याप्रमाणें आजही आला होता. दसरा आतां दोन दिवसांवर आला होता. आपल्या ठिकाणांतले जून भोपळे, तवशीं वगैरे तोडून थोडी भाजी देवाला, थोडी भटाला, थोडी बाबांना, थोडी कुळकर्णी, मिराशी वगैरे गांवांतल्या थोर लोकांना, आणि उरल्यास थोडी भाविणी—नायकिणीला देण्याचा त्याचा मानस होता.

पण भाजी तोडून रघुनाथच्या डोकीवरून ज्याच्या त्याच्या घरीं पाठवूं असे बेत करीत नारायणशेट तिथें येऊन पाहातो तों काय! रात्रीं कुणाच्या तरी गुरांनीं येऊन सर्व वेलांची खाऊन व तुडवून अगदीं नासधूस करून टाकली होती! तें पाहून नारायणशेटच्या संतापाचा पारा एकदम इतका चढला कीं, तो तिथूनच रामरावाला आईमाईवरच्या शिव्या हासडीत त्याच्या मांगरासमोर येऊन उभा राहिला.

"गाढवाच्या लेकांनो! इतके माजलां काय रे? गुरांकडून मुद्दाम वेल खाववलेत काय? थांबा! पंधरा दिवसांच्या आंत नाहीं तुमचीं गाडगीं मडकीं बाहेर फेकून द्यायला लावलीं तर नांवाचा नारायणशेट नव्हे! हरामखोर!..." यापेक्षांही तीव्र व ओंगळ अशा अपशब्दांची फैर नारायण-शेटच्या तोंडून एकसारखी रामरावावर झडूं लागली.

पण त्यावर एक शब्दही बोलण्याचें त्राण बिचाऱ्या रामरावाच्या अंगीं नस-ल्यानें तो मुकाटपणें ती सर्व शिवीगाळ पुष्पांजली समजून सहन करीत होता. तीच गत जमनाचीही झाली होती. ती तर ओक्साबोक्शी रडत होती. मात्र तिचें रडें बाहेर ऐकूं येत नव्हतें. जिवंत मढ्याचें रडें तें! मोठ्यानें रडायला तिच्या अंगीं शक्ति कुठें होती?

नारायणशेटला वाटलें कीं रघुनाथ घरांत तोंड लपवून बसला आहे. त्याला उद्देशून तो अधिकच अरेरावीनें म्हणाला, "मर्दासारखा मर्द असून आतां कसा बसला भागूबाईसारखा लपून घरांत? छाती असेल तर ये बाहेर, तोंड दाखव म्हणावं म्हणजे पाहा एकेकाचं कसं पायतणानं थोबाड फोडतों तें!"

त्या नाटकी आवेशांत नारायणशेटनें पायांतलें पायतण काढून हातीं घेतल्यासारखें रामरावाला दाखविलें. तोंच रघुनाथ त्याच्यासमोर येऊन उभा राहिला. रघुनाथला पाहतांक्षणीं नारायणशेटच्या हातांतलें पायतण गळून खालीं पडलें.

आधींच रघुनाथ जोतीबाकडून संतापून आला होता. जोतिबानें जामी-नकी रद्द केल्याची बातमी जी त्याच्या कानीं आली होती, ती खरीच होती. चार दिवसांपूर्वीच जोतीबानें आपण यापुढें रघुनाथला जामीन राहायला तयार नसल्याबद्दल मामलेदाराला लिहून कळविलें होतें. रघुनाथनें कारण

काय म्हणून विचारतां त्यानें खरें कारण सांगितलें तें असें कीं–' बाबारे! मला गांवांत राहायचं आहे. मला लोकही पाहिजेत आणि धनीही पाहिजेत. मला बाबांनीं बोलावून धमकी घातली कीं, तूं जर रघूला जामीन राहिलास तर आमचं आणि तुझं वाकडं येईल. पोलिसपाटलानं मला मुद्दाम बोलावून घेऊन पोलिसशिपायासमोर मला धमकी दिली कीं रघू सरकारच्या मर्जीतून उतरलेला माणूस आहे; त्याच्याशीं तूं असा संबंध ठेवशील, तर सरकारचा तुझ्यावर रोष होऊन तुझ्यावर देखील कांहींतरी किटाळ येईल. त्यापेक्षां म्हटलं, आपण त्या फंदांत पडाच कशाला!–"

जोतीबानें ह्या ज्या अडचणी सांगितल्या त्यांतल्या कांहीं खऱ्या व कांहीं खोट्या होत्या. बाबांनीं त्याला बोलावून धमकी दिली होती हें खरें. आणि मूळ-पासूनच डळमळणाऱ्या त्याच्या मनाला लुलेंपांगळें करायला ती धमकी पुरेशी होतीही. पोलिसपाटलानेंही त्याला भेटून त्याचे कान फुंकले होते हेंही खरें. पण तें त्या अर्थानें मात्र नव्हे. जोतीबा सुखवस्तु होता, त्याला सरकारांतून रावसाहेबी मिळवायची होती. रावसाहेब होण्याला बिन्नोकरींतील सुखवस्तु माणसाच्या अंगीं जे गुण असावे लागतात ते बहुतेक सर्व जोती-बाच्या अंगीं होते. गंगाराम, बाबा, कुळकर्णी वगैरे बुद्रुक गांवकऱ्यांनीं त्याला रावसाहेबी मिळवून देण्याचें कबूल करून वेळोवेळीं त्याच्यापासून बरेच पैसे उपटले होते. रघुनाथशीं संबंध ठेवल्यास तुला रावसाहेबी मिळायला अडचण पडेल असें बाबा व गंगाराम या दोघांनींही त्याला पटवून दिल्यामुळें तो भ्याला होता.

"कुणाचं थोबाड पायतणानं फोडणार तूं? आमचं?" रघुनाथनें समोर येतांच रागाच्या भरांत आपल्या पायांतलें पायतण काढून हातीं घेत एक-दम एकेरीवर येऊन विचारलें, "काय केलं आम्ही तुझं पायतणानं मारायला?"

आतां याच्यापुढें आपली कांहीं मात्रा चालणार नाहीं हें नारायणशेटनें ओळखलें, व एकदम तिसऱ्या सप्तकांतून पहिल्या सप्तकांत माघारी उडी मारून नरमाईनें बोलायला प्रारंभ केला, "अरे! तीं आळीं गुरांनीं खाऊन टाकलीं, जरा लक्ष ठेवायचं होतं कीं नाहीं?"

माझ्या घरांत माणसं मरायला घातलेलीं असतांना मी तुझ्या भाजी-पाल्याची राखण करीत बसूं काय? घर माझं गरिबाचं जळलं, आणि त्या जळक्या चौथऱ्यावर तूं भाजी पिकवून खाणार! तीही पिकवणार आम्ही आणि खाणार तूं! उद्यां तुझं घर जळलं तर अशींच त्या चौथऱ्यावर मींही आळीं लावायला येईन. इतके दिवस मिठाचा खडा तोंडांत धरून बोललों नाहीं मी, म्हणून इतका शेफारून गेलास काय? चल हो चालता अगोदर इथून! याद राखून ठेव, पुन्हा इथं पाऊल टाकशील तर पायच मोडून घालीन!"

रघुनाथ नुसतें पायताण हातीं घेऊन बोलूनच थांबला, त्यानें पायतणानें बडविलें नाहीं, हीच ईश्वराची मोठी कृपा समजून नारायणशेटनें तिथून मुकाट्यानें हलकेच काढता पाय घेतला. पण त्याच्या मनाला बोंचणारीं अपमानशल्यें हजार पायतणें मारल्याप्रमाणें त्याला तापदायक होत होतीं.

•

"तो काळ गेला का?" अंमळशानें रामरावानें क्षीण स्वरांत विचारलें.

"गेला. आतां तुम्हांला कसं वाटतं?" रघुनाथ रामरावाच्या उशाशीं बसून त्याच्या अंगाला हात लावून पाहात विचारूं लागला.

"तूं आतां एक करशील?"

"काय?"

"अगोदर घांसभर भात उकडून खाऊन घे पाहूं!"

"कां?"

"तूं आपलं माझं ऐक. आणि हें बघ, मला बरं वाटलं किंवा न वाटलं, तरी आतां हा गांव सोडून तूं दुसरीकडे राहायला जा बरं माझ्या बाबा! इथं ह्या चांडाळ धन्यांच्या रावणराज्यांत तुझा पळा यायचा नाहीं. तुला हे लांडगे हकनाहक फाडून खातील रे! जाशील ना तूं?"

"पण बाबा! आमचा कुळस्वामी!"

"आग लागो त्या कुळस्वामीच्या तोंडाला. कुळस्वामी देव नाहीं; धोंडा आहे—निव्वळ धोंडा. सगळे देव धोंडे आहेत. फेंकून दे त्यांना नदींत. देवपणा त्यांच्या ठायीं असता, तर आपण इतक्या सचोटीनं वागत असतांना

आपली इतकी वाताहात कां रे उडाली असती ? देव नाहींत रे हे ! निव्वळ धोंडे आहेत. प्रामाणिक कष्टाळू गरिबांची ह्या जगांत अशी उपासमार व्हावी आणि गब्रू लब्राडांची चैन चालावी, हें काय देवाच्या देवपणाचं थोरपण ! बाबारे ! हें कलियुग आहे म्हणतात तेंच खरं. ह्या कलियुगांत देव–धर्म सब झूट आहे." वैतागानें रामराव बोलून गेला. पण बोलून चालून देवभोळा तो ! तो तेव्हांच मनांत देवाला अपशब्द बोलल्याबद्दल चुटपुटला. अंमळ थांबून पुढें म्हणाला, " बरं, त्या नतद्रष्ट सावकाराची ब्याद तूं कशी टाळशील मला सांग पाहूं ? "

" पण आतांच त्याचं काय अडलं आहे बाबा ? "

" असं म्हणूं नकोस माझ्या मुला ! माणसाचा घडीचाही भरंवसा नसतो. समज, माझं कांहीं आज उद्यां इतक्यांत बरंवाईट झालं तर ! म्हणून वाचा आहे तोंवर सारं सांगून ठेवतों. ती परमेश्वरी–आपल्या पेटाऱ्यांत तुझे कागद आहेत ना, त्यांत मीं एका लखोट्यांत ठेवली आहे. नीट पाहून घे. फिर्याद केल्याखेरीज पैसे देत नाहीं असंच सांगितलंन् ना सावकारानं अखेर ? "

" होय. "

" मग वकिलाला विचारून एकदां फिर्याद दाखल करच ना ? एरव्हीं त्याच्यापासून पै देखील वसूल व्हायची नाहीं. आपल्याला ह्या गांवांत–ह्या नरकांत कांहीं आतां राह्यचं नाहीं. इथं आपणाला घरदार नको, वतनवाडी नको, कांहीं नको.–जा ! माझ्यादेखत घे पाहूं ती परमेश्वरी नीट पाहून ! अजून बोलायची ताक़द थोडी तरी माझ्या जिभेंत आहे, तोंवर सारी निरवानिरव करून टाकूं दे. "

म्हाताऱ्याला आतां चालत्या घडीचाही भरंवसा वाटेनासा झाल्यामुळें त्यानें निरवानिरव चालविली आहे, हें रघुनाथच्या तेव्हांच ध्यानीं आलें. त्याला अत्यंत वाईट वाटलें. पण करतो काय ? रामरावाचा आग्रह पडल्यामुळें व्यवहार म्हणून त्यानें एकेक बाब पडताळून घ्यायला प्रारंभ केला. बाप आणि बायको मृत्युमुखीं उभीं असतांना मन पाषाणासारखें करून आर्थिक व्यवहारांत गुंतविण्याला आपणाला धनी व सावकार भाग पाडीत आहेत हें त्याला तेव्हांही जाणवलें.

"औषध सूनबाईसाठीं आणलंस का?" रामरावानें मध्येंच विचारलें.

"नाहीं. वैद्य भेटलाच नाहीं." रघुनाथ उत्तरला. खोटें बोलायचें त्याच्या अगदीं जिवावर येई. पण म्हाताऱ्याच्या मनाला अंतकाळीं आणखी त्रास व्हायला नको, म्हणून त्यानें जोतीबाकडची गंधवार्ताही त्याला कळूं न देण्याचें ठरविलें होतें.

"नको रे तिची अशी आबाळ करूं! लक्ष्मी आहे रे ती तुझ्या घरांतली! मी मेलों तर कांहीं वाईट नाहीं, माझे सर्व कांहीं सोहाळे झाले आहेत. पण ही कोंवळी पोरगी!–रघ्या! ते परमेश्वरीचे पैसे वसूल कर, नाहीं तर ती कुणाला तरी शें पन्नास रुपये कमी घेऊन बेचन दे झाली तरी. प्रथम तो चांडाळ सावकार शंभर रुपये कमी करून तरी पैसे देतोसे विचार. उगीच आणखी वांकडं नको यायला त्या सापाशीं. पण तो जर आणखी टंगळमंगळ करायला लागला,—"

"तो टंगळमंगळ करणारच. आणि कागद मुदतींतून जाईपावेतों आम्हांला खेळवणार."

"इतका तूं थांबतोसच कशाला पण? तुझ्या हातांत देखील पैसा नाहीं; आणि सगळीकडून आपला असा कोंडमारा चालविला आहे गुलामांनीं!– शेंपन्नास कमी तर कमी घेऊन मोकळा हो, आणि जामिनासाठीं कर्ज आहे जोतीबाचं आपल्या डोक्यावर तें देऊन टाक अगोदर. मीं ऐकलं होतं परवां, कीं तो जामीन राह्यला देखील कुरकुरत होता. त्याला विचार, नाहींतर आपला रोख जामीन भरून टाक एकदांचा! ही गांवाला लागलेली आग कांहीं इतक्यांत विझायची नाहीं. पुढचीं लक्षणं मला कांहीं धड दिसत नाहींत. ही आग धन्यांना जाळील, आम्हां कुळांनाही जाळील, तेव्हां विझेल. तुमच्यावरच्या फिर्यादींचा एकदां निकाल लागला, कीं धन्याचं देणं काय बाकी असेल तें देऊन टाक. त्यानं आपणाला फसवलं असलं तरी आपण सत्य सोडायचं नाहीं, आपले पितर नरकांत घालायचे नाहींत. एक वर्षाचा खंड आहे धन्याचा द्यायचा, आणखी कांहीं नाहीं. तें सारं देणं मग सावकाश भागव. अगोदर कागदाचे पैसे येतील ते आण, आणि ह्या पोरीला औषधपाणी नीट कर बरं! तिच्यासाठीं तूं अगदीं भिकारी झालास

तरी हरकत नाहीं. पण तिला—माझ्या सोन्या! काळाच्या दाढेंतून ओढून काढ. लक्ष्मी आहे रे ती आपल्या घरांतली नांदती बोलती लक्ष्मी आहे! तिचं मन राजी ठेवलंस, तर तुला पृथ्वीच्या पाठीवर कुठंही कांहीं देखील उणं पडायचं नाहीं. माझ्या बाळांनो! तुमची दानत मात्र खरी ठेवा, कीं देव तुम्हांला कांहीं कमी करणार नाहीं."

रघुनाथ दुःखामुळें स्फुंदत स्फुंदत रामरावाचे अखेरचे बोल ऐकत होता. जमनाविषयींचे धन्योद्गार त्याच्या तोंडून निघालेले ऐकतांना त्या दारुण दुःखदायक स्थितींतही मूठभर मांस आपल्या अंगावर चढत असल्याचा त्याला भास झाला.

"आतां कसं वाटतं तुला?" रघुनाथनें जमनाच्या तोंडापाशीं तोंड नेऊन् हळूच विचारलें.

"बरं वाटतं. अगोदर मामंजीकडे लक्ष द्या." जमना निर्जीव दुबळ्या वाणीनें उद्गारली. तिला रघुनाथशीं आणखी बोलायचें होतें पुष्कळ, म्हाताऱ्यासाठीं चपळाई करून चांगला वैद्य हुडकून आणा असेंही सांगायचें होतें. पण अशक्ततेमुळें तिच्या तोंडावाटे शब्दच निघेना. तिनें आपले ते विचार खळकन् आसवें गाळून त्या मुक्या भाषेंत ओकून टाकले.

रघुनाथलाही वाटलें, बायकोसाठीं सारा पैसा खर्च झाला तरी हरकत नाहीं. पण—! त्याच्या व रामरावाच्या सर्व उड्या ज्या प्रॉमिसरी नोटीवर चालल्या होत्या, ती नोट त्यानें उघडून पाहिली मात्र, आणि त्याच्या सर्व आशा—आकांक्षांवर जणूं वीज पडली. ती प्रॉमिसरी नोट चार वर्षांपूर्वीच्या तारखेची होती. बापटशास्त्र्यानें मुद्दामच, रामरावाला लिहितां वाचतां येत नाहीं याचा फायदा घेऊन त्याच्या तोंडाला तशीं पानें पुसलीं होतीं. ती प्रॉमिसरी नोट बरोबर ज्या तारखेला पैसे रामरावानें त्याच्याकडे नेऊन दिले त्या तारखेची, रघुनाथचा वडील भाऊ मयत होता त्याच्या नांवची होती. रघुनाथला प्रॉमिसरी नोटांचा व्यवहार माहीत असल्यानें तें तेव्हांच कळून आलें व त्या चिटोऱ्याचा कांहीं उपयोग नाहीं असें पाहातांच त्याला ब्रह्मांड आठवूं लागलें. सावकारानें सावकारी पाश फेंकून आपला केंसानें गळा कापला हें त्याला कळून चुकलें. पण करतो काय? सावकारानें

फसविलें हें त्यानें कसें शाबीत करावें? खासगी आयतखाऊ श्रीमंतीवर चालणाऱ्या ह्या जगांत जिथें सत्य–नीति–धर्म–कायदा सारें श्रीमंतांच्या मर्जी-नुरूप चालतें, तिथें ह्या भांडवलशाही जगांत गरिबांची दाद कोण घेणार? त्यांच्यावर विश्वास कोण ठेवणार? रघुनाथ हें सारें ध्यानीं आणून स्वतःशीं म्हणाला, "आतां कुठची जामिनकी आणि कुठचं जमनाला औषधपाणी!"

आपला सत्यनाश झाला, सध्यांच्या संकटांतून कोणत्याच उपायानें बाहेर पडायला मार्ग मोकळा नाहीं, अशी पूर्ण निराशा होतांच रघुनाथनें ताड्ताड् आपल्या कपाळावर हात मारून घेतले. त्याला हुंदके आवरेनासे झाले. जमना व रामराव यांना वाटलें कीं, हा वैतागला आहे. जमनाला बोलवत नव्हतें तरी ती क्षीण स्वरानें कण्हत कण्हत म्हणाली, "असं काय करतां? बापयेगडी तुम्ही, प्रसंगाला धीरानं तोंड द्यायला नको का? मामाजी घाबरे होत आहेत, त्यांना कुणाला तरी विचारून कांहीं औषधपाणी करायचं कीं असंच रडत बसायचं?"

"हा मी जातोंच. आणि मिराशीबाबांना तरी घेऊन येतों." असें म्हणून रघुनाथ रामरावाकडे लक्ष ठेवायला बायकोला सांगून निघाला.

"मिराशीबाबा येतील का?" जमनानें विचारलें.

"येतील. एरव्हीं कांहीं असलं तरी औषधपाण्याच्या बाबतींत ते नाहीं कधीं कुणाला नाराज करीत." रघुनाथ म्हणाला.

"नाहीं तर ते कांहींच्या बाहींच औषध सांगतील, नी तें तुम्हांला कळायचं नाहीं.—" तीन महिन्यांपूर्वीं शंकरला त्यांनीं अजाणपणें दिलेल्या अफूची आठवण होऊन ती अंगावर शहारे आल्यासारखें करून म्हणाली.

"तसं नेहमींच होतं कीं काय? मी त्यांना बरोबर घेऊनच येतों दाख-वायला, मग तर झालं ना?" रघुनाथ आंसवांनीं डबडबलेले आपले डोळे पुसून कोरडे करीत बाहेर जातां जातां रामरावाला म्हणाला, "बाबा! मी जाऊन येतों."

रामरावाला स्वतःचा आतां घडीचाही भरंवसा वाटेनासा झाला होता. औषधोपचारांचा कांहीं देखील उपयोग व्हायचा नाहीं हें त्याला पूर्णपणें कळत होतें. त्याला काळजी एकच वाटत होती, आपण अवेळीं मेलों तर

आपला पोरगा घरांतल्या व बाहेरल्या दगदगीमुळें कालपासून उपाशी असलेला सारा दिवसभर बिचारा अन्नाविणें ताटकळत राहील! तेवढ्यासाठीं—रघुनाथचें जेवण होईतों चार घटका जगण्यासाठीं त्याची धडपड चालली होती. तो रघुनाथला म्हणाला, “अरे! कशाला औषधपाणी आतां? तूं घांसभर अगोदर खाऊन घे म्हटलं ना तुला?”

पण कुणा चांडाळाला अशा वेळीं जेवणखाण रुचेल? म्हाताऱ्याची समजूत करण्यासाठीं रघुनाथ कांहींतरी सबब सांगायची म्हणून सांगून मोकळा झाला, “तिकडेच हवा झाला तर कुणापाशीं तरी घांसभर भात मागून खाईन. नाहींतर मागं मी पुजारी भटजींच्या घरचीं गळतीं काढलीं होतीं, त्यांच्याकडची न्याहारी मागून खाईन.”

“तसं कर. आणि हें बघ वेड्या! औषध बिवूषध आतां नको, खरंच सांगतों मी तुला. फक्त मिराशीबाबांकडे मिळाली तर पळीभर गंगा आणि तुळशीपत्र घेऊन ये. त्यांच्याकडे गंगा आहे. नाहींच म्हटलं, तर पुजारीबाबांकडे जाणारच आहेस, थोडं देवाचं तीर्थ घेऊन ये. निदान भटाच्या पायाचं पळीभर तीर्थ आण. पण लौकर ये बरं! फार वेळ गमूं नकोस.”

यावर ‘बरें’ म्हणून रघुनाथ गंगेसाठीं घरांतली एक वाटी घेऊन बाहेर पडला. तो प्रथमच मिराशीबाबांच्या घरीं गेला. मिराशी तेव्हां देवपूजा करीत बसले होते. ते देवघरांतून बाहेर येईतों त्यांच्या भावी उपकारांची आगाऊ फेड करण्याची संधी रघुनाथनें गमावली नाहीं. मिराशांच्या पडवीची जमीन नुक्तीच केली गेली होती, ती चोपायची होती. मिराशीणबाईनें रघुनाथला पाहून ‘जमीन चोपायची आहे’ असें ओझरतें म्हटलें. त्याबरोबर रघुनाथनें आपण होऊन उठून विचारलें, “भुरवणं कुठं आहे?”

मिराशीणबाईनीं मागील दारचें चोपणें आणून देतांना कांहीं तरी औपचारिक कळकळ दाखवायची म्हणून तोंडदेखलें विचारलें, “कशी आहे रामरावाची प्रकृति?”

“घडीचा कांहीं भरंवसा नाहीं आई! त्यांच्या मुखांत अखेरच्या क्षणीं गंगा घालायला मिळाली तर पाहावी म्हणून आलों आहें.”

“हळू बोल. पूजा चालली आहे आंत.” असें सांगून मिराशीणबाई आंत गेली. रघुनाथ बापाच्या काळजीनें अंतःकरण तीळतीळ तुटत

असतांनाही निरुपाय म्हणून गंगाजलाच्या आशेनें तें चोपणें घेऊन पडवी चोपूं लागला.

त्या पडवीला लागून ओटी, व ओटीला लागून एका बाजूला देवघर होतें. मिराशीबाबांनीं आपली बायको व रघुनाथ यांचें सर्व संभाषण देवघरांतून ऐकलें होतें. त्यांची पूजाही आटोपत आली होती. पण लौकर बाहेर गेल्यास कदाचित् रघुनाथ बाप मरायला टेकल्याचें निमित्त करून लौकर निघून जाईल आणि पडवी चोपायची तशीच राहून जाईल, या भयानें चोपणी संपेपावेतों त्यांनीं पूजा लांबविली. देवघराच्या खिडकींतून त्यांना सारें दिसतच होतें. तें काम पूर्ण झालेलें पाहून त्यांनीं देव्हाऱ्यांत पूजेला लावलेला गंगेचा चंबू उघडून पाहिला, तों आंत सारी चार चमचे गंगा होती. ती त्या कुण-बटाला देऊन मग आणखी कुणा जवळच्या माणसावर तसा प्रसंग आला तर ?—लगेच त्यांनीं तो चंबू तसाच बंद करून जिथल्या तिथें ठेवून दिला. एकदां त्यांना वाटलें, गंगा संपली म्हणून सांगावें. पण रघुनाथचे घेतलेले श्रम फेडणें तर अवश्य ! नाहीं तर तो म्हणायचा, माझा बाप तिकडे नाकीं सूत धरून क्षण मोजीत पडलेला असतांना यांनीं मला कामाला जुंपलें ! तो गैरसमज टाळण्यासाठीं त्यांनीं ताम्हनांतलें दोन चमचे तीर्थ संध्येच्या पळीनें पंचपात्रींत निराळें काढून घेतलें व त्यांत चार पळ्या पाणी मिसळून बनावट गंगाजलाचें रसायन तयार करून बाजूला ठेवून दिलें.

लगेच ते बाहेर गेले, व जसें काय आपण आतांच पाहतों आहों असा बहाणा करून रघुनाथकडे पाहून म्हणाले, "अरे! तूं केव्हां आलास ?"

"थोडा वेळ झाला काका ! ही जरा जमीन चोपली एवढीच."

"कशी काय आहे रामरावाची प्रकृति ?"

"घटकेचाही भरंवसा नाहीं त्यांचा ! अखेरीला त्यांच्या मुखांत गंगा घालायला मिळाली तर मागायला आलों आहें तुमच्याकडे."

"गंगा.—शिल्लक आहे कीं नाहीं पाहातों हं ! थांब जरा." असें म्हणून मिराशीबाबा देवघरांत गेले, व पळीनें तांब्या जरा खडबडावून गंगापात्र उघडून पाहिल्याचें नाटक करून नुक्तेंच तयार करून ठेवलेलें गंगारसायन घेऊन बाहेर आले. रघुनाथनें वाटी पुढें केली. तिच्यांत तें रसायन ओतीत

ते म्हणाले, " रामराव खरा पुण्यवान. त्याच्यापुरती नेमकी संध्येच्या चार पळ्या गंगा गंगापात्रांत शिल्लक होती." ते देवघरांत जातां जातां म्हणाले, " अरे कसा काय चालला आहे तुमचा संप ? "

" मी त्या संपांत नाहीं काका ! कसला डोंबलाचा करतात संप !—मोठे मोठे भांडतात आणि आम्हां गरिबांची मात्र मधल्यामध्यें वाताहात उडते. आणि त्यांत आणखी हा घरांतला आजारीपणा. नकोसा झाला आहे जीव अगदीं ! " असें म्हणत रघुनाथ गंगाजलाची वाटी घेऊन बाहेर पडला. त्याचे डोळे रामरावाकडे लागले होते.

" अरे मग तुमच्या संपाचा पुढारी तरी कोण ? " मिराशीबाबांनीं देव-घराच्या दारांत उभें राहून मुद्दाम खवचटपणानें विचारलें.

" कसला पुढारी आणि कसलं काय घेऊन बसलां काका ! सारी आमच्या जन्माची विटंबना आहे झालं ! " असें म्हणून रघुनाथ तिथून निसटला तो थेट संगमनाथाच्या देवालयाकडे गेला. जातां जातां देवाचा अंगारा आणि तीर्थ म्हाताऱ्यासाठीं व बायकोसाठीं नेण्याचा त्याचा विचार होता.

पण ज्या देवावर रघुनाथची इतकी श्रद्धा, तो देव तरी कुठें त्याला धारजिणा होता ? ' बळी तो कान पिळी ' या न्यायानें आजकालच्या जगां-तले सारे लोक मोठ्या नांवांच्या मागें लागतात त्याप्रमाणें तो देव बाबा, कुळकर्णी वगैरे धन्यांचा पक्षपाती असो, बाबांच्या करणीमुळें जमीनमहसुलांत भरमसाट वाढ होऊन आपण गरगरीत श्रीमंत होणार ह्या बाबांच्या काम-गिरीवर खूष होऊन असो, गंगाराम देवळ्याची सुंदर बहीण चंद्रा भावीण नेहमीं त्याची सेवा करीत असे म्हणून असो, अथवा बाबांच्या एका नाठाळ कुळावर आपण कृपा केली तर बाबा आज आपल्या देवस्थानांतलें अर्धें मुर्धें उत्पन्न गट्ट करतो तो रागानें आणखी गट्ट करूं लागेल या भीतीमुळें असो; पव रघुनाथच्या हांकेच्या वेळीं तो देव कानांत बोटें घालून उभा होता. रघुनाथ इतक्या भक्तिभावानें अंगारा आणण्यासाठीं देवळांत गेला, व पुजारी तिथें नाहीं असें पाहून गोपुरांत येऊन पुजाऱ्याच्या कोठडीकडे पाहून ' वासूकाका ! वासूकाका ! ' अशा हांका मारूं लागला, तेव्हांच गंगाराम आपल्या बरोबर दोघां शिपायांना घेऊन देवळाच्या सोंडेवरून सभामंडपांत प्रविष्ट झाला.

पुजारी वासूकाका त्या शांत वेळीं मागील दारीं शेजारच्या एका मर्जी-तल्या परटिणीशीं गप्पा मारीत बसल्यामुळें त्याला रघुनाथची हांक ऐकूं गेली नसेल, अथवा ऐकूं जाऊनही त्यानें मुद्दामच पुढें येण्याचा कंटाळा केला असेल. कारण ती परटीण दुसऱ्या दिवशीं दसऱ्याच्या सणा-निमित्त आपल्या माहेरीं जाणार होती, व ती महिनाभर येणार नव्हती. वासूकाका बाहेर आला नाहीं व रघुनाथला अंगारा मिळाला नाहीं. उलट गंगाराम मात्र दोन पोलिस शिपायांसह तिथें आला, व त्यानें रघुनाथकडे बोट करून त्यांना दाखवून दिलें, "रघुनाथ रामजी राणे म्हणतात तो हाच."

तें ऐकून रघुनाथच्या छातींत एकदम धडकी भरली. बाप व बायको घरांत मृत्युशय्येवर पडलीं असतांना अकस्मात् हा काय प्रसंग ओढवला या चिंतेनें त्याचें मन हादरलें.

"रघुनाथ! तुला पकडून आणायचा मामलेदारसाहेबांचा हुकूम आहे. कारण तुझ्या जामीनदारानं जामीनकी रद्द केली आहे." एक पोलिस म्हणाला.

"तूं असं कर, दुसरा जामीन कुणी मिळण्यासारखा असेल तो बरोबर घेऊन जा आणि पटवून ये म्हणजे झालं." गंगाराम साळसूदपणें म्हणाला.

"दुसरा जामीन आतां या घटकेला कुठून शोधून आणूं मी नाईक-साहेब!" रघुनाथ गयांवयां करून पोलिसांच्या पायां पडत उद्गारला.

"नसला जामीन मिळत तर तुरुंगांत बस! फुकटचं सरकारच्या पदरचं खायला मिळेल, कामधंदा करायला नको कीं कांहीं नको." पोलिस बेपर्वाईनें फिदिफिदि हंसत म्हणाला.

तो अपमान मुकाटपणें गिळून गरजवंताला अक्कल नाहीं त्याप्रमाणें रघुनाथ त्या पोलिसांना पुन्हा हात जोडून म्हणाला, "घरीं बाप म्हातारा मरायला टेकला आहे. आतां आटपतो कीं घटकेनं आटपतो याचा भरंवसा नाहीं. बायकोही आंथरुणाला खिळली आहे.—"

"मग काय बायकोला जामीन देणार होतास कीं काय?" दुसरा पोलिस —जो पहिल्यापेक्षांही क्षुद्र मनोवृत्तीचा होता तो म्हणाला.

तो प्रश्न रघुनाथच्या वर्मी झोंबला. पण प्राप्त प्रसंग ओळखून तोही अपमान पूर्ववत् सहन करून तो गंगारामकडे वळला, व त्याला हात

जोडून म्हणाला, " गंगाराम! या प्रसंगीं तूं तरी मला मदत कर रे! एक दोन दिवसांची तरी सवड मला यांच्याकडून मिळेल असं कर. म्हणजे तोंवर मला भावजयीला आणून घरांत ठेवतां येईल आणि जामीन कुठं तरी धुंडाळतां येईल. इतकंही करून जामीन नच मिळाला आणि तुरुंगांत बसावं लागलं, तर घरांत बायलेच्या तोंडांत पळीभर पाणी घालायला माणूस तरी आणून ठेवतां येईल. बाबा तर आज वांचत नाहींतच.—ही पाहा गंगा—ह्या देवाशपथ, बाबांसाठीं मिराशीबाबांकडून घरीं घेऊन चाललों आहें मी!"

" तें सारं खरं. पण अरे खुळ्या! असल्या सबबी सरकारांत कधीं चालतात का? सरकारचा हुकूम म्हणजे हुकूम! ह्या पोलिसपाटलांनीं सांगितलं तर चार घटका थांबूं आम्ही. तोंवर तुला कुणाची भेट घ्यायची असेल, कुणाला कांहीं सांगायचं असेल तर त्याला आम्ही महार पाठवून बोलावूनही आणूं. यापेक्षां जास्त आम्हांला नाहीं कांहीं करतां यायचं." एक पोलिस म्हणाला.

तोंच दुसरा म्हणाला, " अरे! आपणाला इथं कसं थांबतां येईल? हा पहा दोन प्रहरांवर दिवस आला. आतां दुपारला काय आणखी शिंगं राहिलीं आहेत? आपणाला आज दुपारीं दहीबावीच्या पोलीसपाटलाच्या घरीं काम आहे नाहीं का?"

" खरंच! त्याची मला आठवणच नव्हती." पहिला पोलिस भुंवया चढवीत म्हणाला.

दहीबावच्या पोलिसपाटलाकडे काम म्हणजे त्यानें त्या पोलिसांना त्या दिवशीं कोंबडी कापून मेजवानी द्यायचें ठरविलें होतें. कारण त्याला त्या पोलिसांच्या हातून गांवांत एका प्रतिस्पर्ध्याला धाकदपटशा व ' समज ' द्यायला लावायची होती!

इतका वेळ रघुनाथनें बाबापुता करून पाहिलें, पण कांहीं उपयोग झाला नाहीं. त्याला माहीत होतें, पोलिसपाटलानें सांगितलें असतें तर अथवा न सांगतांही पोलीस त्याला सायंकाळपावेतों सवड देऊं शकले असते. मामलेदार झाला म्हणून काय तो माणूस नव्हे? आरोपीच्या घरांत माणूस मरून पडला असतांना आरोपीला त्याचें सरण पेटवायची देखील सवड न देतां

त्याला मुसक्या बांधून आणा असें मामलेदार कसें म्हणेल ? पण इथें असल्या विचारसरणीचा कांहीं देखील उपयोग नाहीं असें पाहून तो मनांतल्या मनांत संतापून परंतु तो संताप बाहेर न दाखवितां म्हणाला, "ठीक आहे तर चला मला घेऊन मामलेदारसाहेबांकडे."

एवढा प्रकार होईतों देवळांत बघ्यांची गर्दी जमली. हा धरपकडीचा प्रकार पाहून जो तो अगदीं बावरून गेला होता. इतक्यांत त्याच गर्दीतून वाट काढीत दत्तू पुढें आला. तो आला होता रामरावाला घरघर लागली आहे, लौकर चल, असें रघुनाथला सांगण्यासाठीं. पण तिथला एकंदर रागरंग पाहून त्यानें तोंडाला कुलुप घातलें. त्यानें मनाशीं विचार केला, उगाच परस्वाधीन रघुनाथच्या अंतःकरणावर हे निखारे कशाला ओता!

दत्तूला पाहातांच रघुनाथनें त्याला हांक मारून सांगितलें, "दत्तू! ही गंगा घेऊन आमच्या घरीं जा अगोदर. बाबा मरणाला टेंकले आहेत. मी देवगडला चाललों आहें. आतां माझ्या घराकडे तूंच पाहा! बाबांना मरत्या घटकेला मांडी द्यायचं माझ्या अभाग्याच्या कपाळीं नाहीं, त्याला इलाज नाहीं. आतां माझ्या जागीं तूंच त्यांचा मुलगा. जसा प्रसंग निभावून नेतां येईल तसा निभावून ने. तशीच माघारीण घरांत मरायला टेंकली आहे. मी येईतों जिवंत राहिली तर राहिली, नाहींपेक्षां मग त्याच मांगराला—गवत आहेच गुरांसाठीं भरलेलं गोठ्यांत;—आग लावून तिचं सरण पेटवून दे कीं भगभग मिटली!" रघुनाथ दोन्ही हातांनीं तोंड झांकून ठेवून एखाद्या पोरासारखा ढसढसां रडूं लागला. तें पाहून दत्तूलाही रडूं कोसळलें, इतर मंडळीही हळहळूं लागली. बाबा तेव्हां आंत रोजच्या नियमाप्रमाणें देवाची पूजा करण्यासाठीं आले होते. पूजा झाली कीं निदान पांच तरी प्रदक्षणा देवाला घालायच्या असा त्यांचा रोजचा नियम. पण त्या दिवशीं देवळांत चाललेला तो गोंधळ पाहून त्यांनीं पूजा झटपट 'चटावर', उरकून घेतली, व रोजच्या प्रदक्षणा सायंकाळीं घालायचें ठरवून परस्पर मागच्या दिंडीनें बाहेर पाय काढला. जातां जातां त्यांना त्यांची चंद्रा भावीण देवालयाच्या आवाराबाहेर भेटली. तिच्याशीं देखील बोलायला न थांबतां, देवावरचें हिरव्या चाफ्याचें फूल काढून त्यांनीं वासासाठीं घेतलें होतें तें तेवढें तिच्या हातीं फेंकून दिलें आणि तसेच चटकन् पुढें सटकले.

दत्तू रघुनाथला म्हणाला, "तूं कांहीं चिंता करूं नकोस रघू! दोन दिवसांत आम्ही आमच्या जिवाचं रान करून तुझी जामीनगत पटवतों बघ! आणि घरची तूं कांहींच काळजी करूं नकोस. खुशाल जा. नेहमीं आपण हें लक्षांत ठेवायचं कीं आधणांतले रडतात आणि सुपांतले हंसतात. आज जे सुपांत हंसत असतील त्यांना देखील उद्यां आधणांत पडायचं आहे. तेव्हां मग ते कसे रडतात तें आम्ही पाहूं." हे अखेरचे शब्द दत्तू मुद्दाम गंगारामकडे पाहून उद्गारला, व गंगाजलाची वाटी घेऊन रामरावाकडे निघाला.

दत्तू तिकडे गेला, व पोलिस रघुनाथच्या दंडाला काढणी बांधून त्याला भररस्त्यांतून दहीवावच्या वाटेनें चालवीत नेऊं लागले. त्याची अशी उघड-उघड धिंड काढूं नका असें गंगाराम एका शब्दानेंही पोलिसांना म्हणाला नाहीं. बाबा वगैरे धन्यांच्या हितासाठीं गांवांत सर्व कुळांना अशी दहशत बसणें इष्ट आहे असें त्याला वाटलें. किंबहुना बाबांनाही तसेंच वाटलें. ह्या एका प्रमुख चळवळ्याचे असे सात पाट काढले कीं बाकीचीं सारीं कुळें सुतासारखीं सरळ व रेशमासारखीं मऊ येतील. तेवढ्यासाठीं म्हणून तर त्यांनीं मुद्दाम जोतीबाला धाक दाखवून जामीनकी सोडायला लावलें होतें. लगबगीनें घरी जातांना ते मनाशीं म्हणालेही, "गांव सोडून जायची पाळी ह्या शिंच्या कुळांनीं आमच्यावर आणिली होती. आणि हा रघ्या त्यांचा मुकुटमणि."

रघुनाथला अटक झाल्याचें वर्तमान त्याच्या घरीं कळवायचें नाहीं, म्हाताऱ्याला सुखानें प्राण सोडूं द्यायचे, असें दत्तूनें ठरविलें होतें, व त्यासाठीं त्यानें कारणही शोधून मनाशीं योजून ठेवलें होतें कीं, तो पुन्हा एकदां वैद्याकडे गेला आहे असें सांगायचें. मागाहून सायंकाळपावेतों तो आला नाहीं कीं बायको त्याची विचारील, तिची कशी तरी समजूत करावी झालें. —असें मनांत म्हणत दत्तू उद्विग्न चित्तानें रामरावाच्या मांगरांत जाऊन पोहोंचतो, तोंच जमनानें रडत कण्हत त्याला हांक मारून सांगितलें, "दत्तू-भावोजी! मामाजी पहा हो कसे लांकडासारखे पडले आहेत ते! पाहा तरी जरा!"

"पाहातों हं!" असें म्हणत दत्तू रामरावाच्या मुखीं गंगाजल घालण्यासाठीं खालीं वांकला. पाहातो तों काय? रामरावाचे प्राण कुडींतून केव्हांच निघून गेले होते.

# ५

रामराव हें जग सोडून गेल्याला तीन महिने लोटले.

आणि एके दिवशीं सकाळींच बाबा देसाई जमनाच्या मांगरापुढें येऊन उभे राहिले. चैत्र महिन्यांत काजरघाटीवर तिची व त्यांची जी गांठ पडली होती, त्यानंतर ते आज प्रथमच तिला प्रत्यक्ष भेटत होते.

मांगराचें दार आड करून घेतलेलें होतें. तें हातांतील सोट्यानें हलकेच लोटून उघडीत त्यांनीं हांक मारली, " जमना ! "

त्या हांकेला ओ देत जमना पुढें आली. तों समोर बाबांना उभे पाहून तिच्या सर्वांगांत तिरस्कार व भय यांची विजेसारखी सळसळ सुरू झाली.

म्हातारा वारल्यापासून इतके दिवस जमना तिथें त्या मांगरांत एकटीच राहात होती. प्रथम महिनाभर दत्तूची आई तिच्या शुश्रूषेसाठीं तिच्याजवळ होती, व त्या निमित्तानें दत्तूचीही सोबत तिला असे. तो कदाचित् आपल्या आईला घेऊन पुढेंही रघुनाथ सुटून येईतों तिच्या सोबतीला आईसह राहिला असता. पण लोक त्यांना थोडेच सुखानें राहूं देतात ? अनेकजण अनेक परींनीं त्यांच्याविषयीं निष्कारण बोलूं नये तें बोलूं लागले. दाजीबा, हरिबा, नारायणशेट व गंगाराम अशा सुखवस्तु वर्गांतील लोकही त्यांतच जमा. त्यांचा आणि बाबांसारख्यांचाही हेतु हा कीं, रघुनाथ तुरुंगांत गेल्यामुळें जमना ही बेवारशी स्त्री आहे, ती आपणाला वश व्हावी. त्या वशीकरणाला दत्तूची आडकाठी होऊं लागल्यामुळें ते लोक त्याला पाण्यांत पाहात होते. तो रघुनाथची जामीनकी पटविण्यासाठीं जिवापाड धडपडत होता, त्याचाही त्या लोकांना जितका राग आला नाहीं, तितका राग तो जमनावर वडील भावाच्या नात्यानें आपली मर्दानी छाया पसरून उभा असल्याबद्दल आला होता. हीं सर्व अशुभ लक्षणें पाहून दत्तूनें जमनाच्या बाबतींत मथूची पुनरावृत्ति होऊं नये म्हणून तिला अखेर समजावून सांगितलें, " जमना ! रघू सुटून येईतों तूं आपल्या माहेरींच जाऊन राहा कशी ! "

तीं सल्ला जमनाला पटली, व ती आतां एकदोन दिवसांतच माहेरीं जाणार होती. बाबांचा गडी रोज येऊन खंडाच्या पैशासाठीं तगादा करीतच होता, व तो धन्याच्या जोरावर शेफारून कधीं कधीं तिला दुरुत्तरेंही बोले. तोही त्रास टाळण्याला तिला माहेरीं जाऊन राहाण्याखेरीज दुसरा उपाय नव्हता. तोंच त्या दिवशीं सकाळीं तिला अपशकून करायला बाबा कधीं नव्हत्याचे तिथें हजर !

" जमना ! मुद्दाम तुझी विचारपूस करायला आलों मी. कसं काय चाललं आहे तुझं ? " बाबांनीं मांगरांत डोकावून पाहात जमनाला विचारलें.

" कसं चाललं आहे तें तुम्हांला माहीत आहेच. मला आतां इथें अगदीं पुरेवाट झाली आहे. मी उद्यां माहेरीं जाणार आहें. तुम्हांला सांगून ठेवत्यें, नाहीं तर म्हणाल कीं पळून गेली. " जमना उत्तरली. आपण बेपर्वाईनें धन्यांशीं बोलत असल्याची तिला जाणीव होती. पण तिचा तिरस्कार भीतीहून शिरजोर होऊन तिला आवरेनासा झाला होता. त्याला तिचा नाइलाज होता.

" पण माहेरीं जायचं कारण तरी काय ? " बाबांनीं कोडगेपणानें विचारलें.

" तर इथें राहून पोटांत काय कांटे भरूं ? " जमना उद्गारली.

" पण इतका त्रागा कां म्हणून ? काय तुझी अडचण आहे सांग मला. " जमनाला मिंधें करायची संधी आपणाला आतां लाभणार अशा आशेनें आशाळभूतपणें बाबा आंगणांतून दरवाजाच्या आंत पाऊल टाकीत म्हणाले, " तुझ्यासाठीं तूं काय सांगशील तें करायला मी तयार आहें. सांग, तुझ्या नवऱ्याला जामीन देऊन सोडवून आणूं का ? "

" त्यांना सोडवून आणाल तर तुमचे आमच्यावर मोठे उपकार होतील." ती जरा नरमाईनें उद्गारली.

" अग ! मग यापूर्वीच तूं माझ्याकडे येऊन कां नाहीं सांगितलंस ? " बाबा एक पाऊल पुढें सरकवीत म्हणाले, " महिन्या पंधरा दिवसांत त्याची सुटका होईल. त्यांत आहे काय एवढं मोठंसं ! त्याप्रमाणंच खंडाची बाकी द्यायला जर तुला इतक्यांत सवड नव्हती, तर मला येऊन सांगायचं कीं नाहीं ? "

"तें मागचं मागं राहूं दे. अगोदर त्यांची सुटका होऊन ते घरीं येऊं देत पाहूं!" ती खंबीरपणानें उत्तरली.

"पण तो तुझ्या घरीं येण्यापूर्वी तूं माझ्या घरांत आली पाहिजेस." बाबा जमनापासून वितीच्या अंतरावर–इतके लगट करीत जवळ येऊन लघळपणानें म्हणाले.

तेव्हां मात्र जमना मनांतून घाबरली. ती बाबांना तोडून टाकूंही शकत नव्हती, आणि त्यांच्या पापवासनेला बळी पडण्याची तर नुसती कल्पनाही तिच्या मनाला स्पर्श करणें शक्य नव्हतें. एका बाजूला सप्तपाताळाइतकी खोल दरी, आणि दुसऱ्या बाजूला आकाशाला भिडलेला पर्वताचा सुळका, यांमधून तिला तेव्हां वाट काढायची होती. म्हणूनच ती बाबांना कांहीं न बोलतां मुकाट्यानें मांगराबाहेर जाऊं लागली.

"कुठं चाललीस?" असें विचारीत बाबांनीं दरवाजा अडवून धरला.

"असं काय? मला जाऊंदे. हें बरं नाहीं." असें म्हणून जमना बाबांचा हात बाजूला सारून बाहेर जाण्याचा प्रयत्न करूं लागली.

"नाहीं बाहेर जायचं. इथं कुणी आपणाला पाहात नाहीं." असें म्हणून बाबांनीं तिच्या बाहूला स्पर्श करून निर्लज्ज वृत्तीनें तिला हळूच आंत लोटलें.

"नाहीं–नाहीं. त्यांची सुटका होईतों मी कांहींच कबूल करायची नाहीं. अगोदर ते सुटून घरीं येऊं देत." जमना पुन्हा म्हणाली.

बाबा त्या मांगराच्या दरवाजापाशीं उभे असलेले रघुनाथनें काजरघांटी उतरून येतांना पाहिले होते. तो संशयी वृत्तीनें मांगरापाशीं येऊन पोहोंचला, तेव्हां बाबा दरवाजांतून आंत गेले होते. त्याबरोबर त्याचा संशय अधिकच बळावला. आपली बायको बेइमानी आहे असेंच त्याला प्रथम वाटलें. आंतील त्या दोघांचें संभाषण ऐकण्यासाठीं मांगराच्या बंद असलेल्या खिडकीला कान देऊन तो आपल्याशीं मनांतल्या मनांत बोलूं लागला, 'तीन महिन्यांत इतकी जमना बहकली काय? कीं ती पूर्वीपासूनच बहकलेली आहे? मागें तिनें धन्यांविषयीं ओरड केली, तो फुकटचा कांगावाच होता काय?'

हें मनाशीं बोलतांनाच रघुनाथला जमना व बाबा यांचा त्याच्या सुटके-विषयींचा संवाद ऐकूं आला. त्याबरोबर त्याच्या मनोविचारांची गति किंचित् पालटली. जमना आपल्या सुटकेसाठीं बाबांना आळवते आहे, नवऱ्याची सुटका झाल्यावर त्या उपकारांची फेड करण्यासाठीं ती आपला देह त्या चांडाळाच्या स्वाधीन करायला तयार आहे! केवढा जबरदस्त स्वार्थत्याग करायला तयार आहे आपणासाठीं ही! हिचा आणि धन्यांचा पूर्वीचा संबंध असेल असा उगीचच संशय घेतला आपण तिच्याविषयीं असें वाटून त्यानें दोन्ही हातांनीं थोबाडींत मारून घेतल्या.

आंत त्या दोघांचें खारट तुरट बोलणें चाललेंच होतें.

"नाहीं. तूं माझी इच्छा पूर्ण केल्याखेरीज मी तुझ्या नवऱ्यासाठीं कांहींच करणार नाहीं." बाबा म्हणाले.

"तर मग त्यांची मुळींच सुटका झाली नाहीं तरी चालेल. असेल देवाची मर्जी तसं होईल. तुम्ही माझी वाट सोडा मुकाट्यानं." जमना अगदीं खवळून म्हणाली.

"नाहीं सोडणार वाट! तूं आतांच्या वेळीं तरी माझ्या शब्दाला होकार दिलाच पाहिजेस. नाहीं तर याद राखून ठेव! केलं वाटोळं हें कांहींच नव्हे, इतकं वाटोळं करून टाकीन तुमचं. उद्यांच्या उद्यां जप्ती आणतों तुझ्या ह्या खोपटावर, आणि हें खोपट होतं कीं नव्हतं करून टाकतों. मग पाहातों तूं कुठं जातेस ती! मग मला ठेवून घ्या असं पायां पडत सांगत येतेस कीं नाहीं पाहातों."

जमनाच्या प्रसंगावधानाची व धीटपणाची मनांतून वाखाणणी करीत प्राप्त प्रसंगाला तोंड देण्यासाठीं रघुनाथ पुढें गेला. आंत डोकावून पाहातो, तों बाबा जमनाचा पदर हातांत धरून तिला फरफरा ओढण्याच्या विचारांत होते. ते रघुनाथच्या तोंडची 'जमना' अशी हांक कानीं पडतांच माण-साची चाहूल लागतांक्षणीं लांडगा बावरून मागें वळून पाहातो तसे दर-वाजाकडे पाहूं लागले. रघुनाथच्या नजरेला नजर भिडतांच पाण्यांत टाक-लेलें ढेंकूळ विरघळतें तसे ते आंतल्या आंत विरघळून गेले.

रघुनाथला पाहातांच जमनाला कितीतरी धीर आला. ती एकदम हायसा उसासा सोडून ओरडली, "माझा देव माझ्या मदतीला धावून आला."

आणि खरेंच होतं तें. रघुनाथ तेव्हां तिथें गेला नसता, तर जमनाच्या स्त्री-जन्माची दुर्दशा व्हायला उशीर नव्हता. तिच्या रक्षणाला काजरघाटीवरची काजराई अथवा गांवांतला संगमनाथ या नांवानें ओळखले जाणारे ओबड-धोबड धोंडदेव थोडेच धावून येणार होते!

बाबा ओशाळून अर्धमेले झाल्यासारखे मुकाटपणें खालीं मान घालून बाहेर पडले. दरवाजाबाहेर पडेपावेतों त्यांच्या जीवांत जीव नव्हता. वाटलें, रघुनाथ आपल्या कमरेंत लाथ घालतो कीं काय? पण रघुनाथ समंजस होता. दरिद्री व गरजू मनुष्याचें अरेराव होऊन चालणार नाहीं हें त्याला माहीत होतें. तो रागानें पण राग आवरीत म्हणाला, "बाबा! धनी तुम्ही आमचे, तुम्हांला मीं तुमच्या पायाच्या चाकरानं काय बोलावं?"

जसजसें बाबांचें पाऊल दूर दूर पडत होतें, तसतसा त्यांना जास्त जास्त धीर येऊं लागला होता. पण किती जरी धीर आला, तरी त्यांची रघुनाथला उलटून बोलण्याची छाती कांहीं झाली नाहीं. धीर आला तो एवढ्यापुरताच 'रघुनाथला झाली तरी अब्रू आहेच कीं! तो कशाला बसला आहे बोभाटा करायला? पण हा असा अवेळीं कसा सुटून आला?'

याचा आतां पुन्हा बंदोबस्त कसा करावा हा प्रश्नही त्यांच्यापुढें उभा राहिला. ते घरीं जातां जातां आपल्या मनाशीं म्हणाले, "दरखास्त तर माझी आहेच याच्यावर! दोन दिवसांत ती बजावली जाईल अशी व्यवस्था करतों, आणि गुलामाला उभा जन्म गांवांतून उठवून लावतों."

जमना तशी फारच समजूतदार मुलगी होती. नवऱ्याचें मन कसें राखावें, तो त्रस्त झालेला असला म्हणजे त्याच्या मनाला अधिक अप्रसन्न करणाऱ्या गोष्टी कशा टाळाव्या, हें तिला चांगलें कळत होतें. आज रघुनाथ तीन महिने तुरुंगवास भोगून आलेला असल्यानें त्याला सुखी करण्यासाठीं ती जितकें कांहीं करती तितकें थोडेंच झालें असतें. रघुनाथ मनाचा अत्यंत कोंवळा होता. त्रासदायक भानगडी मन स्वस्थ नसतां ऐकूं आल्या कीं त्याला राग येई. इतकें सारें माहीत असूनही जमनाला त्या दिवशीं तेवढें-देखील भान राहिलें नाहीं. ती बाबा निघून जातांच रघुनाथला म्हणाली, "आतां यापुढं जगण्यांत देखील शोभा राहिली नाहीं. इथं कुणाची बाईल निर्धोक नाहीं, कुणाचं जिणं निर्धोक नाहीं, कीं कुणाचं घरदार निर्धोक

नाहीं. असल्या नरकलोकांत कशासाठीं म्हणून राह्यचं आपण? मामाजीनीं अखेरच्या वेळीं काय सांगितलं होतं आठवतं ना तुम्हांला?"

रघुनाथ यावर कांहीं तरी बोलेल म्हणून जमनानें कांहीं क्षण वाट पाहिली. तो कांहींच बोलत नाहीं असें पाहून, आकाशांतून कडाडणारी वीज खालच्या वृक्षावर पडावी तशी ती रागावून त्याला म्हणाली, "तुमच्या बायकोच्या अब्रू-वर वाटेल त्या सैतानानं दरोडा घालायला तुमच्या डोळ्यांदेखत पुढें यावं तरी त्याचा मुड्दा जर तिथल्या तिथें पाडायची छाती तुम्हांला नाहीं, तर मर्दाचं नांव सांगतां कशाला? मी यःकश्चित् बायकोमाणूस एकटीनं त्याच्या नरडीचा घोट घेतला असता. माझ्या जिवाचं पुढं कांहीं झालं असतं तरी बेहेत्तर होती."

यावर रघुनाथ एवढेंच म्हणाला, "जमना! स्वस्थ राह्य तूं! जे ते आपल्या कर्मानीं मरतात. त्यांना कुणी मारावं लागतं नाहीं. तूं एवढं पक्कं लक्षांत ठेव कीं, देवस्थानचा मंगेशराव कारकून जो गांवांत आला आहे, तो ह्या बाबाच्या मुळावरच आला आहे. आम्हीं त्याला नुसती मदत केली म्हणजे झालं. त्यानंच माझ्यासाठीं जामीन मिळवून देऊन माझ्यावर उप-कार केला आहे, त्याच्या उपकारांची फेड मला केली पाहिजे."

"म्हणजे? त्यानं का तुमचा जामीन पटविला? आणि म्हणून तुमची आज अचानक सुटका झाली का?"

"होय. पण हें कुणालाही कळतां कामा नये." एवढें रघुनाथ म्हणतो आहे, तोंच जणूं काय कुणींतरी बोलावणें पाठवल्यासारखा मंगेशरावाकडून चाकरीचा महार त्याला बोलवायला आला. त्यानें सांगितलें, "कारकून-साहेबांनीं तुला आतांच्याआतां सटवीच्या देवळांत बोलावलं आहे. आणखी बरेचजण आले आहेत तिथें."

आपल्या उपकारकर्त्याचें इतक्या निकडीचें बोलावणें येतांच रघुनाथ चाकरीच्या महाराला एका वाटेनें पाठवून आपण निराळ्या वाटेनें तिकडे जायला निघाला.

मंगेशरावानें इतर कुळांच्या आग्रहावरून आपल्या प्रत्यक्ष मेव्हण्याला रघुनाथसाठीं जामीन राहायला सांगितलें होतें, व मेव्हण्यानें तो शब्द पाळ-

लाही. गांवच्या शेतकऱ्यांचा पुढारी म्हणून तो अलीकडे मिरवूं लागला होता. लोकांनीं रोख शंभर रुपये वर्गणी आपसांत जमवून त्याच्याजवळ अनामत ठेवल्यामुळेंच त्यानें तरी तेवढी जबाबदारी घ्यायला आपल्या मेव्हण्याला सांगितलें. याचें कारण, बाबा, कुळकर्णी वगैरे दुष्टाचार्यांशीं दोन हात करायला त्याला कुळांची फौज पाठीशीं पाहिजेच होती.



त्या मंडळीला भेटून रघुनाथ दोन प्रहरच्या सुमारास माघारा आला, तेव्हां त्याची चर्या जमनाला पुष्कळच गंभीर दिसली. पण त्या वेळीं तिनें त्याला त्याचें कारण मात्र विचारलें नाहीं. रघुनाथनें जेवतांना आपण होऊनच तिला म्हटलें, " आज कुळकर्ण्यांनीं दत्तूच्या घरांतलीं भांडींकुंडीं जप्तींत बाहेर काढलीं, आणि त्यानं बेकायदा अडथळा केल्यामुळं पोलिसपाटलानं त्याला पकडून चावडीवर नेलं आहे. त्याची जामिनकीची रक्कम तर आतां जप्त झालीच समजायची. पण आणखी त्याला किती शिक्षा होते पाहावी. उद्यां देवगडाहून पोलीस येऊन त्याला घेऊन जातील. आपण आज बाबांना दुखवलं आहे, ते देखील असाच एखादा अवघड प्रसंग माझ्यावर आणायला कमी करायचे नाहीत. मला गांवाचीं एकंदर लक्षणं कांहीं ठीक दिसत नाहींत. आग भडकणार हें निश्चित. ती कधीं व कशी भडकणार एवढाच प्रश्न आहे. तशी वेळ आलीच तर तूं माहेरीं जाशील कांहीं दिवस ? "

जमनाच्या डोळ्यांतून लगेच आंसवांच्या पावसाच्या सरी कोसळूं लागल्या.

तो दिवस गेला. दुसरा दिवस उजाडला. पोलिस येऊन दत्तूला बेड्या ठोकून घेऊन गेले. सारा गांव त्याच्यासाठीं हळहळला. रघुनाथही हळहळला. जमनाचे डोळे पूर्व दिवशींच्या दुःखाश्रूंनीं ओले असतांनाच तिच्यावर आपल्या धर्माच्या पाठीराख्या भावासाठीं रडण्याचा प्रसंग आला.

दुसऱ्या दिवशीं तिच्याही घरावर दत्तूसारखाच प्रसंग बाबांनीं आणला. त्या दिवशीं दोनप्रहरीं बेलिफ व एक मदतीला पोलिस असे दोघेजण बाबा, गंगाराम देवळी, पोलिसपाटील चाकरीचा महार यांसह बाबांच्या दरखास्तीवरून रघुनाथच्या घरांतील जंगम माल जप्त करण्यासाठी यमदूतांसारखे तिथें येऊन थडकले.

तेव्हां रघुनाथ नुक्ता जेवायला पानावर बसला होता. जमना त्याला वाढीत होती. पहिला घांस रघुनाथच्या ओठीं गेलेला पोटीं उतरण्यापूर्वीच बेलिफानें कठोर आवाजांत बेगुमानपणें त्याला हांक मारली, " रघुनाथ रामजी राणे ? "

त्या हांकेसरसा रघुनाथ एकदम दचकला. त्याच्या हातांतला घांस गळून खालीं पडला.

जमना पुढें जाऊन पाहाते तों तो गिधाडांचा थवा पाहून तिची छाती दडपून गेली. तिला गंगारामनें विचारलें, " आहे कीं नाहीं रघू घरांत ? "

" जेवायला बसले आहेत." जमना भीतभीत उत्तरली.

" जेवतो आहे ? त्याला अगोदर बाहेर ये म्हणावं. इतके तुझे बाप बाहेर आले असतांना जेवतो आहे म्हणे ! " बेलिफ कडाडला.

जमना आंत गेली. रघुनाथ ते उद्गार ऐकून तसाच पानावरून उठला, व कधीं नव्हत्याचा त्या दिवशीं मोरींत हात धुवून बाहेर आला. बेलिफानें त्याला जंगमजप्तीचें वारंट वाजून दाखविलें. त्यानें तें स्तब्धपणें ऐकून घेतलें. लगेच बेलिफानें बाबांना विचारलें, " रावसाहेब ! दाखवून द्या काय काय माल जप्त करायचा तो. "

घराला आग लागतांच उंदीर बाहेर पडतात, तसा रघुनाथ आपल्या बायकोला घेऊन बाहेर पडला, व बाबा बेलिफाला घेऊन आंत घुसले.

शेतावर टोळधाड पडल्यावर पिकाची जशी हां हां म्हणतां वाताहात उडते, तशी रघुनाथ आणि जमना यांच्या डोळ्यांदेखत त्यांच्या मोडक्या तोडक्या गरिबीच्या संसाराची वाताहात झाली. घरांतलीं भांडींकुंडीं, जुने कपडे, गोठ्यांतली पाडी, भाताची एक मुडी होती ती,—बाबांनीं एकेक वस्तु दाखवून दिलीं व बेलिफानें जप्त केली. म्हारानें घरांत शिरून त्या जिनसा बाहेर काढल्या. सर्वांची मिळून किंमत पंचवीस रुपये देखील नसेल. तीही कांहीं वस्तु बेकायदा जप्त केल्या होत्या म्हणून ! तें सर्व सामान म्हाराच्या डोकीवर चढवण्यांत आलें. बेलीफ जातां जातां वर आणखी म्हणाला, " हीं कुळं लबाड असतात. माल दडवून ठेवतात. ह्या गुलामांच्या बायका—बहिणी जप्त करायचा कायदा सरकारनें केला पाहिजे. तरच हे वठणीवर येतील."

" तसं झालं पाहिजे खरं. " असें हंसत हंसत म्हणून बाबा इतर मंडळीबरोबर चालूं लागले.

जमना तेव्हां रडत होती. रघुनाथ सुन्न पाषाणासारखा निश्चल उभा होता.



पुढील तीन दिवसांत काजरोळी गांवांतील जनतारूपी महासागराच्या उदरीं तुंबळ हलकल्लोळ माजला होता. त्या गांवांतील गरीब शेतकऱ्यांच्या क्रोधाचा वडवानल धन्यांकडून होणाऱ्या असह्य जाचामुळें त्या महासागराच्या उदरीं भडकत होता. रघुनाथ व दत्तू यांच्यावर ओढवलेला प्रसंग पाहून प्रत्येक शेतकरी फांशीची शिक्षा झालेल्या व शिक्षेच्या अंमलबजावणीच्या दिवसाची वाट पाहात तिष्ठत बसलेल्या अभागी अपराध्यासारखा हवालदिल व बेभान झाला होता. धन्यांना वाटत होतें, 'कशी बसविली कुळांना दहशत! गुलामांनो! म्हणावं कसे वठणीला येत नाहीं पाहातों. कायम कुळं व्हायला हवें नाहीं का?'

त्या दिवशीं पुन्हा एकदां बाबा देसाई, कुळकर्णी, मिराशी वगैरे जमीन-दारांची देवळाच्या माडीवर खासगी बैठक झाली. तिथें सर्वांचा गुप्त विचार ठरला कीं, मामलेदारसाहेबांना लवकर गांवांत यायला विनंति करावी, आणि त्यांच्या धाकदपटशानें नाठाळ कुळांकडून भराभर कबुलायती करून घ्याव्या. त्या कामासाठीं दुसऱ्या दिवशीं सकाळींच भिणमिणतें न भिणमिणतें तों बाबा देवगडला जायला निघाले. त्यांच्याबरोबर कागदपत्रांचें व कपड्यांचें गाठोडें घेण्यासाठीं साबा सुर्वे हा वेठीचा गडी होता.

दोघेही नदी उतरून काजरघाटी चढून वर गेले. ज्या खटल्याच्या कामासाठीं आपण देवगडला चाललों आहों, त्या कामीं आपली फत्ते व्हावी, कुळांवर खोट्या कबुलायतींवरून केलेले दावे जसे खरे झाले तशीच सद्बुद्धि दरखास्त, जप्ती वगैरे बाबींत आपणाला उदार हस्तें कायदा-बेकायदा जशी जमेल तशी मदत करायच्या कामीं मामलेदार, कोतवाल यांना सुचावी, म्हणून बाबा पावलागणती संगमनाथाच्या नांवाचा जप करीत हातांतील जपमाळेचे मणी ओढीत होते. कोणतें कूळ नाठाळ आहे, त्याच्या घरादारावरून कसा साफ नांगर फिरवायचा वगैरे भयाण बेतांचा आगीचा

डोंब त्यांच्या डोक्यांत आजकाल तीनत्रिकाळ धडधड पेटत होता. तरी त्या भयाण आगींत त्यांच्या जिव्हाग्रीं संगमनाथाचें नामस्मरण मातीच्या मूर्तीवर चिकटवलेल्या सोनेरी वर्खासारखें खुलत होतें. रहाटगाडग्याच्या माळेसारखी त्यांच्या हातांतील जपमाळ एकेका मण्याच्या ओढीनें त्यांच्या चिमटींत चक्राकार सरकत होती.

दोघेही घाटी चढून काजऱ्याच्या राईपाशीं येतात, तोंच एका करवंदीच्या जाळीला अडकून बाबांच्या हातांतील जपमाळ गुरफटली गेली. अपशकुनाच्या जाणीवेनें अंतःकरण धडधडत असतांना ती सोडवून घेण्यासाठीं बाबा क्षणभर थबकले.

तों काळ्या कांबळ्याचा नखशिखान्त बुरखा घेतलेले एका मागून एक दहा बारा लोक दांडे घेऊन राईबाहेर धांवत आले. त्यांनीं त्या दोघांनाही घेरलें. अपशकुनांचा दाखला क्षणांत हातोहात पटला, ही दुःखवार्ता आपल्या मनाच्या तोंडून ऐकत बाबा ते यमदूत समोर आलेले पाहून घाबरून उभे राहिले. त्यांच्या हातापायांना भीतीनें कांपरें भरलें.

"कायरे बाबांनो! माझ्यावर कां इतका राग? बोला काय पाहिजे तुम्हांला? सांगाल तें देतों." बाबा सोज्वळपणानें उद्गारले.

पहिल्या बुरखेवाल्यानें त्यांना कांहीं उत्तर न देतां आपल्या हातांतील दांडा सांवरीत साबाला सांगितलें, "साबा! तुला बायकोपोरांसाठीं आपला जीव बचावायचा असेल तर मुकाटपणें घाटी उतरून घरच्या वाटेला लाग कसा!"

साबा काय ओळखायचें तें ओळखून चुकला, आणि मुकाटपणें दप्तर तिथेंच टाकून जीव मुठींत घेऊन घरच्या वाटेला लागला.

दांडा हातीं घेतलेल्या त्या पहिल्या बुरखेवाल्याचा आवाज ओळखून बाबा आपल्या मनाला म्हणाले, "हा तर रघुनाथ!..."

तोंच रघुनाथच्या हातांतील दांड्याचा जोराचा तडाखा बाबांच्या पायांवर पाठमोरा बसला. त्यासरसे ते तिरिमिरि येऊन खालीं कोसळले.

"अरे! मला मारूं नका. तुम्हांला काय पाहिजे सांगा. मी द्यायला तयार आहें. पण मला मारूं नका." बाबा दीनासारखे ओरडले.

"कायम कुळं आम्ही सारीं आहों असं नांवनिशीवार लिहून देतोस?" सखारामनें विचारलें.

"देतों ना! कायम कुळंच काय, तुम्ही म्हणाल तर तुमच्या घराखालच्या आणि नांगराखालच्या जमिनी तुम्हांला वंशपरंपरा लावणचिठीनं लिहून देतों. ह्या काजराईची शपथ घेऊन सांगतों. आणखी काय पाहिजे?" बाबा सात्विक संभावितासारखे म्हणाले.

तोंच घाकू म्हणाला, "अरे! हा हव्या तेवढ्या खोट्या आणाशपथा घेईल, आणि मग दगा देईल."

"नाहीं रे! हवी तर तुम्हांला पैसे न घेतां आतांच्या आतां प्रॉमिसरी नोट अथवा विसारपावती काय मागाल तें मागाल तसें लिहून देतों. माझ्यापाशीं तिकिटं आहेत, कागद आहे, दऊत लेखणी आहे, सगळं सामान आहे."

"दे तर लिहून." सखाराम म्हणाला. आपल्या प्राणांवर आलें होतें तें कागदावर निभावलें यांतच नशीब शिकंदर मानून बाबा खिशांतून कागद काढूं लागले. त्यांचें प्रसंगावधान जबरदस्त. आपण आज जरी वाटेल तें लिहून दिलें, तरी पुढें त्याच कागदाचा या आपल्या मारेकऱ्यांना खड्डयांत घालण्यासाठीं कसा उपयोग करायचा याविषयींचे बेत तेव्हांच त्यांच्या मनांत ठरूनसुद्धां गेले.

पण रघुनाथ त्या सर्वांत धूर्त होता. तो बाबांना चांगला ओळखीत होता. ह्या थराला गोष्टी आल्यावर आतां ह्याला जिवंत सोडलें तर हा आपणाला हर प्रकारांनीं पुरा नडल्याशिवाय राहाणार नाहीं, असें त्यानें आपल्या सर्व साथीदारांना समजावून सांगितलें व त्यांनाही तें पटलें.

"नाहीं रे! मी तसा बेइमान होणार नाहीं. हवं तर माझं सारं वतन मी तुम्हांला बक्षीस लिहून देतों. पण मला सोडा. ह्या काज़राईची शपथ घेऊन सांगतों.—" बाबा अगदीं काकुळतीला येऊन उद्गारले.

"काजराईची शपथ! संगनाथाला कच्चा चावून खाणारा तूं हरामखोर, आणि काजराईची शपथ घेतों म्हणे!" असें म्हणून रघुनाथनें हातांतील दांड्याचा भीमतडाखा बाबांच्या छातीवर हाणला. त्या एका

घावासरसे बाबा तिरमिर येऊन पडले. त्याबरोबर इतरांच्याही हातांतील दांड्यांचे त्यांच्यावर तडातड घाव पडले. बाबा विव्हळले, तळमळले, कांहीं तरी अडखळत बोलले, व पुढें त्यांना विव्हळतांही येईनासें झालें. त्यांचे डोळे नुसते गरगर फिरत होते. वाचा बंद पडली होती.

रघुनाथला आतां पुरा खून चढल्यासारखा झाला होता. त्यानें बाबांची बाहेर आलेली जीभ हांसडीत म्हटलें, "हीच–हीच जीभ माझ्या बायकोपाशीं हलकटपणाची गोष्ट बोलायला धजली नव्हे का?"–त्या हांसड्यासरसा त्यांच्या डोळ्यांना प्राणांतिक ताण बसल्यामुळें ते भकासपणें अधिकच गरगर फिरूं लागले. रघुनाथनें बंडीच्या खिशांतून एक लहानशी कुपी काढून उघडली व तिच्यांतला द्रव त्या डोळ्यांत ओतीत म्हटलें, "ह्याच हलकट डोळ्यांनीं तूं माझ्या बायकोकडे पाहात होतास नव्हे का?"

बाबांचा अर्धमेला जीव पुन्हा तापल्या रेतींत पडलेल्या मासोळीसारखा तडफडूं लागला. त्यांच्या जीवाची घरघर जोराजोरानें चालली होती.

बाटलींत तें तेजाब होतें. तुकाराम चिंदरकरानें तें फार दिवसांपासून अशाच उपयोगासाठीं आणून ठेवलें होतें. दोन दिवसांपूर्वी मंगेशरावाच्या हितोपदेशाप्रमाणें कांहीं वेंचक कुळांत छळवादी धन्यांवर सूड घ्यायचें ठरलें, तेव्हांच बाबांचा कांटा कायमचा काढून टाकण्याची जबाबदारी रघुनाथनें आपल्या शिरावर घेतली होती, व तेव्हांच ती तेजबाची बाटली त्याला मंगेशरावाकडून मिळाली होती.

रघुनाथनें मृत्यूच्या जबड्यांत तळमळत पडलेल्या बाबांच्या दोन्ही फुटक्या डोळ्यांत पुन्हा एकवार तेजाब ओतलें, व डोळ्यांच्या अगदीं खाचा करून टाकल्या. लगेच त्याच्या दप्तराला तिथल्या तिथें काडी पेटवून आग लावून आली, व चौघांनीं लागून मुड्दा फरकटत तिथून नेऊन काजऱ्याच्या राईच्या पलीकडे बराच खोल असा ओहोळ होता त्या ओहोळांत सहसा कोणाला दिसणार नाहीं अशा खबरदारीनें फेंकून दिला.



बाबा देसायांच्या खुनाच्या वार्तेनें एकटा काजरोळी गांवच नव्हे, तर पंचक्रोशींतलीं गांवें हादरून गेलीं. 'रत्नागिरी' वर्तमानपत्रांतून ही बातमी

वणव्यासारखी सगळीकडे पसरली. जिल्ह्यांत वर्तमानपत्र तेवढेंच जरा प्रमुख. तें बाबांच्याच एका दोस्त वकिलाच्या मालकीचें होतें. त्या पत्रानें जोरानें प्रचार सुरू केला कीं सरकारनें जर ह्या शेतकरी कुळांच्या आडदांड वृत्तीचा कठोरपणें वेळींच बंदोबस्त केला नाहीं, तर जिल्ह्यांत जमीनदारांना, खोतांना, वतनदारांना जगणें अशक्य होऊन बसेल व सरकारच ह्या शेतकऱ्यांच्या बंडाला अप्रत्यक्षपणें चिथावणी दिल्याबद्दल गुन्हेगार ठरेल.

ठिकठिकाणच्या इतर बहुतेक वृत्तपत्रांचाही सूर थोड्याफार फरकानें तसाच होता. जिल्ह्यांतल्या व पर ठिकाणच्या जमीनदारांचा, खोतांचा व जमिनी गहाणखरेदी करून गबर झालेल्या तसेंच होऊं घातलेल्या शेट-सावकारांचा सूर तसाच होता. जो तो सरकारला तारस्वरांत विनवूं लागला कीं जिल्ह्यांत अंकुरूं लागलेल्या ह्या बंडखोरीचा वेळींच बींमोड करा.

त्या गुन्ह्याचा रीतसर सरकारी तपास मग सुरू झाला. त्यापायीं काज-रोळी गांवीं दोन महिनेपावेतों यमपुरीचा कारभार सुरू होता. गुन्हेगारीच्या वहिमानें बरेचसे लोक वहिमावरून साऱ्या गांवाला निर्दय मारपीट झाल्या-वर पकडले गेले, व त्यांतले कांहीं गुन्हेगार म्हणून निवडून बाकीचे मग पोलिसांनीं सोडले. कांहीं निरपराधी गरीब शेतकरी जिवाच्या आशेनें ज्याला जसें शक्य झालें तसे पोलिसांचे हात ओले करून प्रथमच सुटले. त्यांत कुणाला नवल वाटलें नाहीं. पण तुकाराम, तात्याबा, मंगेशराव हे करून सवरून पुन्हा पैशाच्या जोरावर बेमालूम कसे सुटले याचें मात्र कांहींना नवल वाटलें.

खटला बरेच दिवस चालला व गाजला. जिल्ह्याच्या सेशन कोर्टांत रघु-नाथ, सखाराम व धाकू यांना फांशीची शिक्षा झाली. तिघांना काळें पाणी व बाकीच्यापैकीं सात जणांना दहा वर्षांपासून तीन वर्षांपावेतों सक्त मजुरीची शिक्षा झाली. त्यावर हायकोर्टांत अपील झालें. गांवच्या शेतकऱ्यांनीं गुपचुप करतां आली तेवढी पैशाची मदत पोटाला चिमटा घेऊन केली, म्हणून महागरा हायकोर्ट वकील आणि इतर खर्च भागला. पण उपयोग फारसा झाला नाहीं. कुणाकुणाच्या शिक्षा थोड्या कमी झाल्या; पण रघु-नाथ, सखाराम आणि धाकू यांची फांशी मात्र कायम झाली.

याप्रमाणें या खुनी खटल्याचा शेवट झाला खरा. पण तेवढ्यानें काज-रोळी गांवांतील कुळें आणि जमीनदार यांच्यांतली तेढ मिटली असें मात्र मुळींच झालें नाहीं. कुळांनीं आपला आततायीपणा परिस्थिति पाहून गनिमी काव्याच्या पवित्र्यानें अंमळ आवरता घेतला इतकेंच. धन्यांनींदेखील, जरी सरकार व न्यायदेवता त्यांची पाठीराखी होती तरी, गांवांत आपलीही बाबां-सारखीच गत होईल कीं काय या भीतीनें खऱ्या खोट्या फिर्यादीआर्यादींचे खोडे आणि दरखास्त–जप्तीचे वरवंटे जरा आवरते घेतले.

बाबांचा खून झाल्यानंतर थोड्याच दिवसांत तालुक्याच्या पोलिस सब–इन्स्पेक्टरनें पोलिसी दहशतीनें गांव आपल्या मतें सुतासारखा सरळ आणला. नंतर तालुक्याचे मामलेदार बंदोबस्ताच्या कडेकोट तयारीनें त्या गांवीं गेले. पंधरा दिवस त्यांचा मुक्काम गांवीं होता. तेवढ्यांत त्यांनीं गांवच्या जमीन-दारांचीं जितकीं म्हणून कुळें होतीं त्या सर्वांकडून जमीनदारांना हव्या तशा रीतसर कबुलायती व खंड देववून गांवांत शांतता व सुव्यवस्था स्थापन केली. पण केवळ कायद्याच्या आणि दंडुक्याच्या जोरावर खरी शांतता व सुव्यवस्था स्थापना करतां येती तर आणखी काय हवें होतें !

बाबांच्या खुनाच्या प्रकरणीं तपास करतांना आरोपी शोधून काढण्यांत दाजीबानें सरकारला बहुमोल मदत केल्यामुळें पुढील वर्षी तो रावसाहेब झाला. त्यापूर्वीच तो जिल्हा लोकल बोर्डांत निवडून येऊन मेहेरबानही झाला होता. तशीच कामगिरी केल्याबद्दल गौरवादाखल म्हणून कीं काय, हरिबा तालुका लोकल बोर्डांत सरकारतर्फे नेमला गेला. गंगाराम देवळी पोलिसपाटील पूर्वीपेक्षां जास्त सुखांत राहूं लागला. त्याचा दारूचा गुत्ताही जोरांत चालूं लागला. जोतीबा मात्र त्या वर्षी रावसाहेब झाला नाहीं. लोक म्हणत कीं तो रघुनाथला जामीन राहिला होता त्याचें प्रायश्चित्त त्याला मिळालें. मंगेशरावाच्या मेव्हण्याला रघुनाथबाबत शंभर रुपये रोख भरावे लागले खरे; पण ते मंगेशरावानें पूर्वीच कुळाकडून वर्गणी करून वसूल केले होते. बापटशास्त्र्याची सावकारी जोरांत चालली होती.

खुनाच्या खटल्यांत शिक्षा झालेल्यांच्या घरादाराची व बायकापोरांची दैना झाली. साऱ्या गांवाला त्या अरिष्टामुळें कितीतरी यातना भोगाव्या

लागल्या. जितक्या प्रकारांनीं सरकारी मदतीनें शेतकऱ्यांची पिळणूक व छळणूक करतां येण्याजोगी होती, तितक्या प्रकारांनीं जमीनदार धन्यांनीं त्यांना छळायचा सपाटा चालविला. पण अन्नदाता शेतकरी असा उपाशी राहिला कीं—स्वतःच्या कष्टांवर जगणारा व इतरांना जगवणारा तो; तो उपाशी कीं त्याचे धनीही उपाशीच !

आणि तसेंच झालें. त्या गांवीं शेतकरी व जमीनदार धनी यांच्यांतील वितुष्टाची आग जी भडकली, तिच्यांतून शेतकरी कसाबसा बचावून धन्यांशीं कधीं जनांत तर कधी मनांत पण सतत झगडतो आहे. हालअपेष्टा भोगतो आहे, गांवांत शेतीवर आपला आणि बायकामुलांचा गुरांवासरांचा निर्वाह झाला नाहीं तर दुसऱ्याची मोलमजुरी करतो आहे, मुंबई-सारख्या शहरीं गिरणी—कारखान्यांत जाऊन हाडें झिजवतो आहे, रक्त आटवतो आहे; धन्यांशीं चाललेल्या लढाईत कधीं हरतो आहे तर कधीं जिंततो आहे. पण अधिकाधिक एकजूट करून पुढें पाऊल टाकतो आहे.

पण धन्यांची अवस्था ? वडिलार्जित दौलतीवर आयातखाऊ ऐषआराम करणाऱ्या धन्यांच्या तोंडावर काय प्रेताची अवकळा पसरली आहे ! पांचशें, आठशें, हजार, बाराशें असा घसघशीत सरकारसारा भरणारे जमीनदार धनी ते, एका काळीं असे गांवचे गांव त्यांच्या मालकीचे. वाडे तरी केवढे टोलेजंग ! आणि इतमामाचा डोलारा तरी केवढा ऐसपैस ! पण त्यांच्याच वंशजांना कुळांकडून सरकारसारा भागण्याइतका देखील खंड गुण्यागोविंदानें वसूल व्हायला पंचाईत पडते म्हणून, पोटासाठीं आणि सरकारसारा वारून जमीनदारीचा डोलारा कोसळूं न देण्यासाठीं शहरांत जाऊन आचारी, वाढपी, चहाफराळाच्या दुकानांत नोकर, असल्या हलक्या नोकऱ्यांसाठीं गर्दी करावी लागते आहे. शेतकरी कुळांवर उन्मत्तपणें दडपशाहीनें मिळालेला विजय साखरेंत घोळलेल्या विषाच्या गोळीसारखा परिणामीं त्यांच्याच सर्वस्वाचा शापरूपी मरणलेख ठरत आहे.

काजरोळी गांवांतील जें 'वृंदावन' शेत एवढ्या अनर्थाला कारण झालें, तें आतां कुणाला हवें असल्यास मातीमोलानें विकत अथवा वेळीं फुकटही मिळण्याजोगें आहे. कारण तें बाबांच्या खुनाच्या वेळेपासून ओसाड

पडून राहिलेलें आहे. रामराव व रघुनाथ हे समंध होऊन तिथें वास्तव्य करीत आहेत असें गांवकरी म्हणतात. त्या पिशाच्चांच्या भयानें कोणीही शेतकरी तें शेत पिकवायला तयार नाहीं, अथवा कोणी तें विकतही घ्यायला तयार नाहीं. बाबांच्या कुटुंबांतील माणसांना तर तीं पिशाच्चें इतकीं बाधतात म्हणे, कीं त्या अनिष्टपरिहारार्थ तें जाईल त्या किंमतीला विकून टाकायची त्यांची तयारी आहे. उत्पन्न पैचें नाहीं, उलट हलाखीच्या दिवसांत सरकारसारा भरायचा! शिवाय आतां देवस्थानची दुभती म्हैसही त्यांच्या गोठ्यांत नाहीं!

आणखी थोड्या दिवसांत जर 'वृंदावन' मातीमोलानेंही विकलें गेलें नाहीं अथवा कुणी कुळही तें खंडानें घेणारें भेटलें नाहीं, तर बाबांच्या मुलानें आपल्या वृद्ध मातोश्रींच्या उत्तरक्रियेच्या वेळीं तें मातोश्रींच्या नांवानें एखाद्या पुण्यामुंबईच्या संस्थेला दान देऊन कीर्तिमान होण्याचा बेत केला आहे. त्यामुळें नांवापरी नांव होईल, आणि दरसाल पदरचा सरकारसारा भरण्याची त्यांच्या मागची ब्यादही टळेल!